श्रीसद्गुरुगंगाधर प्रसन्न.

# साहित्यकुसुमांजलि

अथवा

# छंदोऽलंकार.

( शाळा व कॉलेज यांतील प्रौढ विद्यार्थी, कवि वगैरे सर्व प्रकारच्या महाराष्ट्र काव्योपासकांच्या उपयोगासाठीं सर्व प्रकारचीं वृत्तें, रस व अलंकार वगैरेसह छंदस् व साहित्य या दोन्हीही भागांची सर्व माहिती एकत्र असलेला )

हा ग्रंथ

**गणेश विष्णु देशपांडे उर्फ श्रीगंगाधरदास, वडकशिवालेकर,**

वेदान्तपद्यमाला, श्रीकृष्णस्वामीविजय इत्यादि ग्रंथांचे कर्ते

यांनीं लिहून प्रसिद्ध केला.




मुद्रक—वासुदेव नारायण ठकार.

'श्रीसिद्धेश्वर' प्रिंटिंग प्रेस, कोल्हापूर.

शालीवाहन शके १८३४.
इसवी सन १९१२.

किंमत कापडी बाइंडिंग १। रु.
,, साधी बाइंडिंग १ रु.

श्रीगुरुगंगाधर प्रसन्न.

# साहित्यकुसुमांजलि.

अथवा

# छंदोऽलंकार.

सर्व प्रकारचीं वृत्तें, रस व अलंकार वगैरेसह छंदस्
व साहित्य या दोन्ही भागांची सर्व माहिती
एकत्र असलेला काव्यशास्त्रावरील ग्रंथ.

सुधा सुधा खारि रुचिर दिव्य ही काव्य-सुधा जगतांत ॥
रम्य सुर-सुधा परी काय ती भेटवील जग-तात ॥ १ ॥


लेखकः

श्रीगंगाधरदास—गणेश विष्णु देशपांडे,

[ वडकाशिवालेकर. ]

# सम्राट् पंचम जार्ज व महाराज्ञी मेरी.



साकी.—उदंड वर्षें नांदे भूवरी मेरीराज्ञी-सुत सह तूं ॥
शक्रासम करीं राज्य सुखानें पुरुनि मानिंचे हेतू ॥
धन्यचि जार्ज नृपा ॥ कारें चिर निज यश जगिं अमुपा ॥ १ ॥

[ चित्रशाळा प्रेस, पुणें. ]

श्री.

छंदः पादौ तु वेदस्य हस्तौ कल्पोथ कथ्यते ।
ज्योतिषामयनं नेत्रं निरुक्तं श्रोत्रमुच्यते ॥१॥
शिक्षा घ्राणन्तु वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतम् ॥
तस्मात् सांगमधीत्यैव ब्रह्मलोके महीयते ॥ २ ॥

शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छन्दस् व ज्योतिष हीं वेदांचीं सहा अंगें होत. वरील श्लोकांत हीं रूपकानें दाखविलीं आहेत. तात्पर्य छंद हें वेदाचें महत्वाचें अंग आहे.

नरत्वं दुर्लभं लोके विद्या तत्र सुदुर्लभा ॥
कवित्वं दुर्लभं तत्र शक्तिस्तत्र सुदुर्लभा ॥१॥

अगोदर मनुष्यजन्म दुर्लभ, तो मिळाला असतां विद्या प्राप्त होणें दुर्लभ, त्यांत काव्यरचना करणें दुर्लभ व त्याहून काव्यशक्ति–प्रतिभा–असणें अति दुर्लभ होय.

नैसर्गिकी च प्रतिभा श्रुतं च बहु निर्मलं ॥
अमंदाभ्यासयोगोस्याः कारणं काव्यसंपदः ॥१॥

प्रतिभा हीं नैसर्गिक असून तिचा अप्रतिहत योग असणें हेंच काव्य-संपदेचें कारण होय.

“सृष्टीचें सौंदर्य नेहमीं पडद्याआड झांकलेलें असतें. हा पडदा वर करून तें सौंदर्य प्रकाशांत आणण्याचें कार्य काव्य करितें. काव्य हें प्रतिभेनें नेहमीच्या परिचयांतील वस्तूंना उज्वल करून सोडतें. निसर्गावर प्रेम करणाऱ्या रसिकांच्या नेत्रांना सर्वत्र सौंदर्य भरून गेलेलें दिसतें, व त्यांच्या कानांना जिकडे तिकडे संगीताचा मंजु ध्वनि ऐकूं येतो. काव्यावर प्रेम करणाऱ्याला या श्रेष्ठ सुखाचा अनुभव मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

—लबॉक—

# प्रस्तावना.

" Poetry lifts the veil from the beauty of the World, which would otherwise be hidden, and throws over the most familiar objects the glow and halo of imagination. The man who has a love for poetry can scarcely fail to derive intense pleasure from nature, which to those who love it, is all beauty to the eye and music to the ear".

—*Lubbock*.—

काव्याचीं महती फार मोठी आहे. श्रीगंगाधरदासांनीं ह्मटल्याप्रमाणें काव्य हा शब्दच अति मधुर, रमणीय व पवित्र आहे. व्यक्ति, कुटुंब, ज्ञाति, समाज, राष्ट्र, धर्म व नीति या सर्वांचें तें जीवन आहे. गरीब, श्रीमान्, योगी अगर जिवास कंटाळलेला अभागी या सर्वांसही तें सारखेंच हंसवितें, रडवितें व बोलवितें. जीवन्मुक्तांचा ब्रह्मानंद व रसिकांचा काव्यानंद हे सहोदर होत. धर्म, नीति, व्यवहार इत्यादि कठीण व रुक्ष भासणारे विषय काव्यमाधुर्यानेंच प्रिय व पथ्यकर वाटतात. काव्यगंगा ही अतितर शुचि व हितपरिणामी असल्यानें, तिच्यांत निमज्जन करण्याकडे सर्वांची प्रवृत्ति होणें साहजिकच आहे! मराठी भाषेच्या बाल्यावस्थेंत, तिच्या पितृस्थानीं असणाऱ्या मुकुंदराज, ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, वामनपंडित, रघुनाथपंडित, श्रीधर, मोरोपंत वगैरे नामांकित प्रतिभाशाली सत्कविवरांनीं, आपल्या उज्वल काव्यवाणीचें मनोहर लेणें तिच्या अंगावर घालून, तिला चांगलेंच सजविलें. त्यामुळें तें तिचें गोजिरवाणें व रम्य बालस्वरूप व श्रुतिमनोहर बोबडे बोल यांनीं सर्वांचें चित्त तिच्याकडे ओढलें यांत काय नवल! संस्कृत पंडितांचा मराठी भाषेशीं उभा दावा, मुसलमानी व मराठेशाहीच्या वेळींहीं राजाश्रयाचा अभाव, विद्याप्रसाराचीं साधनें सर्वथैव कमी, अशा कालीं देखील, ज्या सत्कविरायांनीं

केवळ निःस्वार्थबुद्धीनें तिचें लालनपालन केलें त्यांची थोरवी किती वर्णावी! पुढें सुधारणेच्या शिखरास जाऊन पोहोंचलेल्या व विद्याप्रिय इंग्रजांचें राज्य येथें झाल्यापासून मात्र मुद्रणकलेचा व विद्येचा चहूंकडे प्रसार होऊं लागल्यामुळें तिच्यामध्यें नवीन जोम दिसूं लागला. कै. बाळशास्त्री जांभेकर, चिपळूणकर-द्वय, आगरकर, गुंजीकर वगैरे सारख्यांनीं मोठ्या हौसेनें तिच्या अंगावर नवे नवे अलंकार चढविण्यास सुरवात केली. कै० न्या० रानडे यांच्या अटोकाट मेहेनतीमुळें व विलक्षण चिकाटीमुळें विश्वविद्यालयांत तिचा प्रवेश झाला. पाश्चात्य लोकांच्या सहवासानें इतर गोष्टीप्रमाणें काव्यासंबंधीं निरनिराळे विचार-ही इकडे आमच्यांत मिसळले. कै० विठोबाअण्णा दफ्तरदार, कै. कृष्णाभटजी बांदकर, रे. टिळक, मोगरे, लेंभे, चंद्रशेखर, माधवानुज, रेंदाळकर व श्रीगंगाधरदास यांसारखीं जुन्या व नव्या विचारांचीं स्वयंभू कविरत्नेंही मधून मधून तिच्या मुखावर आपलें तेज पसरूं लागलीं. पौरस्त्य कवि आपल्या उच्च मनोवृत्तीस अनुसरून आत्मचिंतनांत जसा साहजिकपणें विलीन होतो, तसाच तो प्रसंगीं पाश्चात्य कवीप्रमाणें निसर्गदेवतेच्या सौंदर्यातिशयानें वेडावून तिच्यासाठीं देहभान विसरून दऱ्याखोरीं पालथींही घालतो, हेंही सर्वांच्या प्रत्ययास आलें. अशा स्थितींत जसे अनेक रमणीय गद्य व पद्य ग्रंथ नवीन तयार होऊन बाहेर पडत असून तिचें वैभव वाढत आहे, तसेंच काव्यासंबंधीं प्राचीन व अर्वाचीन कल्पनांचा योग्य विचार करून ज्यांत छंदस् व साहित्य, म्हणजे काव्यलक्षण, रस, कवीच्या अंगचे प्रतिभादि गुण, दोष, अलंकार वगैरे-संबंधीं विस्तृत पण सुलभ माहिती एकत्र संकलित केली आहे अशा ग्रंथाची सर्व प्रकारच्या काव्योपासकांना अत्यंत जरूरी होती. पण सुदैवानें श्रीयुत गणेश विष्णु देशपांडे ऊर्फ श्रीगंगाधरदास या प्रसिद्ध कवीनें 'छंदोलंकार' नांवाचें हें पुस्तक लिहून ती अडचण कांहीं अंशीं दूर केली, आणि महाराष्ट्र-भाषेच्या ग्रंथभांडारांत एका उपयुक्त ग्रंथाची भर घातली, याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. श्रीगंगाधरदास यांणीं रे. टिळक, माधवानुज,

चंद्रशेखर वगैरे आधुनिक कवीप्रमाणेंच आपला देह सर्वस्वी कवितादेवीला वाहिला आहे. वेदांतपद्यमाला व श्रीकृष्णस्वामीविजय हे त्यांचे पद्यात्मक सुरस ग्रंथ यापूर्वींच प्रसिद्ध झाले आहेत, व त्यायोगें मराठी वाचकांस त्यांची ओळख पूर्वींच झालेली आहे.

यापूर्वी मराठींत, छंदस् (Prosody) या विषयावर वृत्तदर्पण, वृत्तमंजूषा, वृत्तमणिमाला वगैरे, व अलंकारादि विषयांवर तळेकरकृत अलंकारदर्पण, लेलेकृत अलंकारप्रकाश, भागवतकृत अलंकारमीमांसा, राजवाडेकृत अलंकार-विवेक, रसकल्लोल, प्रधानकृत रसमाधव, माकोडेकृत रसप्रबोध व लेलेकृत साहित्यशास्त्र वगैरे लहानमोठे कांहीं ग्रंथ झालेले आहेत. यांपैकीं वृत्तदर्पण हें हल्लीं शाळाखात्यांत चालू आहे, हें सर्वांस माहीत आहेच. यांत कांहीं निवडक वृत्तांपलीकडे छंदःशास्त्राच्या कोणत्याहीं भागाची माहिती दिलेली नाहीं. मंजूषा व मणिमाला हे दोन्हीही लहानच व त्रोटक माहितीचे ग्रंथ आहेत. साहित्यावरील ग्रंथांपैकीं रसप्रबोध व अलंकारप्रकाश वगैरे ग्रंथ बरेच सरस आहेत. पण त्यांतही काव्यासंबंधीं सर्व विषय आलेले नाहींत. श्रीगंगाधर-दास यांच्या या एकाच ग्रंथांत छंदस् व साहित्य या दोन्हीं भागांचें विवेचन व कवि, काव्यव्यासंगी लोक, कॉलेजविद्यार्थी यांस जरूर लागणारी काव्या-संबंधीं सर्व प्रकारची माहिती एकेठिकाणीं मिळावी अशी योजना केलेली आहे. या पुस्तकांत छंदोगंगावरी व साहित्यलक्ष्मी असे दोन मुख्य भाग केलेले आहेत. यांसच पूर्वार्ध व उत्तरार्ध असें ह्मटलें आहे. पूर्वार्धांत वर्णप्रस्तारादि छंदोत्पत्तीच्या माहितीपासून तों थेट १ ते २६ अक्षरी वर्णसमवृत्तें, २६ अक्षरांहून जास्त अक्षरें असलेलीं जीं संस्कृतांत मधून मधून आढळतात अशीं दंडकवृत्तें, वर्णार्धसमवृत्तें, ओंवी, अभंग, घनाक्षरी वगैरे वर्णविषमवृत्तें, तसेंच हिंदी भाषेंत विशेष प्रसिद्ध असलेल्या दोहा, सोरठा, चौपाई, यांसह सर्व मात्रावृत्तें, आर्या व वैतालीयवृत्तें, आणि जे विशेष नियमबद्ध नाहींत असे फटका, कटाव, लावणी, पदें वगैरे प्राकृत छंद यासुद्धां निरनिराळया ४३४

हून अधिक वृत्तांची सलक्षण व सोदाहरण माहिती आली आहे. वृत्तदर्पणांत ही माहिती दिलेली नसून, त्यांतील वृत्तांची संख्या अवघी ८०पर्यंत आहे.

वर्णसमवृत्तांपैकीं निवडक व लोकांच्या विशेष परिचयांतील अशा ८१ वृत्तांची रचना पुढें लिहिल्याप्रमाणें केली आहे. संस्कृत छंदोमंजरीप्रमाणें ज्या जातीचें वृत्त त्याच जातीच्या एकाच ओळींत त्या वृत्ताचें नांव, त्यांत येणाऱ्या गणांचीं नांवें, व साधेल तेथें यति हीं दिलीं आहेत यामुळें वृत्त ध्यानांत ठेवण्यास सोपें झालें आहे. पुढें त्याच्याच खालीं, उदाहरणासाठीं त्याच गणलक्षणांनीं युक्त असा एक श्लोक नवीन रचून घातला आहे. त्यांत पुन्हां वृत्तलक्षण साधण्यासाठीं पहिल्या ओळींत वृत्ताचें नांव, दुसऱ्या ओळीचे आरंभीं गणांचीं अक्षरें व तिसऱ्या ओळींत वृत्ताची अक्षरसंख्या दर्शविणारे सोपे शब्द देऊन त्यांत श्लेष साधला आहे. ह्मणजे वृत्ताचें नांव, गण व अक्षरसंख्या यांचा विचार बाजूस ठेविला तरी, सर्व कवितेचा सुसंगत वर्णनात्मक असा एक अर्थ होऊं शकतो. कित्येक श्लोकांत कांहीं पौराणिक कथाभागही गोंविला आहे. कित्येक कवितांच्या अंतिम भागीं एखादें सुंदर सुभाषित गुंफिलें आहे. वृत्ताचें नांव, गणाक्षरें व अक्षरसंख्यादर्शक शब्द यांचा वृत्तलक्षणाशीं मेळ ठेऊन दोन भिन्न अर्थ सहज निष्पन्न करणें, हे कांहीं सुलभ कार्य नाहीं. छंदोमंजरींत उदाहरणाच्या श्लोकांत फक्त वृत्ताचें नांव साधलें आहे. यांत वरील अडचणी सोसूनही कांहीं श्लोक बरेच सरस बनले आहेत. व कांहींत अलंकारही साधले आहेत. उदाहरणार्थ, उमा, स्त्रग्विणी शिखरिणी, अंबुधारा व मंदारमाला हीं वृत्तें पहावी. भाग ९ ते १२ यांत मालावृत्तांच्या उदाहरणार्थी जे श्लोक घातले आहेत, त्यांत थोडक्यांत सुसंगत अशी श्रीरामकथा गुंफिली आहे. हाच या पूर्वार्धांत विशेष गुण आहे. यांत योजिलेल्या संख्यावाचक संस्कृत पारिभाषिक शब्दांचा एका स्वतंत्र प्रकरणांत दोहावृत्तांत पूर्ण संग्रह केला असून पुढें त्याचा सुबोध अर्थही दिला आहे. हीच

परिभाषा संस्कृत ज्योतिष, वैद्यक वगैरे ग्रंथांतही नेहमीं अढळून येत असल्या-कारणानें या माहितीचा वाचकांस अनेक ठिकाणीं उपयोग होणार आहे.

• उत्तरार्धांत, रूढ, यौगिक व मिश्र हे शब्दाचे तीन प्रकार, वाच्य लक्ष्य व व्यंग्य हे अर्थाचे तीन प्रकार; काव्यलक्षण हेतु व प्रकार; काव्यलेखन व काव्याचे वर्णनीय विषय यांपासून तों थेट रस, कोणत्या रसास कोणता रस विरोधी, रसपरत्वें अनकूल किंवा प्रतिकूल वृत्तें; गुण, रीति, वृत्ति व दोष, सर्व प्रकारचे शब्दालंकार व सर्व पोटभेदांसह सलक्षण व सोदाहरण सुमारें १२५ अर्थालंकार सदृश दिसणाऱ्या अलंकारांचें स्पष्टीकरण, कवीच्या अंगचे प्रतिभादि गुण, काव्यासंबंधीं उपयुक्त सूचना आणि कविसंकेत या सर्व विषयांचा समावेश मार्मिकपणें केलेला आहे. अर्थालंकारांच्या उदाहणासाठीं दिलेल्या प्राचीन श्लोकांची निवड चांगली केलेली आहे. संस्कृत साहित्यग्रंथांत आढळणारीं शृंगारिक उदाहरणें, यांत होतां होईतों टाळलीं आहेत यामुळें तरुण विद्यार्थ्यांनीं याचें अध्ययन करण्यास कांहीं हरकत नाहीं. कांहीं ठिकाणीं कर्त्यानें नवीन उदाहरणें रचून घातलीं आहेत तीं बरीं आहेत. उदाहरणार्थ, पर्यायोक्त पृष्ठ १५०; सूक्ष्म पृष्ठ १७० हे श्लोक पहा. कुवलयानंदांतील व भर्तृहरीच्या शतकत्रयांतील कांहीं श्लोकांचें नवीन समश्लोकी भाषांतर कर्त्यानें केलें आहे तेंही चांगलें साधलें आहे. उदाहरणार्थ, मालादीपक पृष्ठ १५८, परिवृत्ति पृष्ठ १६०, समुच्चय पृष्ठ १६१, प्रहर्षण पृष्ठ १६४ व विवृतोक्ति पृष्ठ १७१ पहा. प्रस्तुत कवीची कल्पनाशक्ति चांगली आहे, हें गंगाधरवृत्त पृष्ठ ६६ यावरून स्पष्ट दिसतें. तात्पर्य, हा भागही उपयुक्त असाच झाला आहे.

मराठी कवितेच्या वाढत्या गरजेस नवीन वृत्तें प्रचारांत आणणें अवश्यक आहे असें जर कांहीं आधुनिक कवींस खरोखर वाटत असेल तर माझ्या मतें त्यांनीं इंग्रजी Blank verse चें हेंगाडें अनुकरण करण्याऐवजीं यांत दिलेलीं संस्कृत व हिंदी भाषेंत प्रचारांत असलेलीं वृत्तेंच मराठींत आणणें अधिक इष्ट आहे.

या पुस्तकास काव्यसाधन किंवा A Poet's companion हें नांव योग्य होईल. ट्रेनिंग कॉलेजांतील विद्यार्थ्यांकरितां मुंबई विद्याशाळाखात्यानें हें पुस्तक मंजूर केल्यास त्यांना याचा पुष्कळ उपयोग होईल. मराठी वाचक या पुस्तकास आपला उदार आश्रय देऊन ग्रंथकारास मराठी भाषेची अशीच सेवा करण्यास उत्तेजन देतील अशी आशा आहे.

या पुस्तकाबद्दल ग्रंथकारास श्री० ना० **नारायणराव बाबासाहेब घोरपडे**, संस्थान इचलकरंजी, यांनीं उदार अंतःकरणानें चांगला आश्रय दिला आहे असें समजतें. हें दोघांसही अत्यंत भूषणास्पद आहे. या ग्रंथकारानें आपला देह महाराष्ट्र भाषेच्या सेवेस सर्वस्वी वाहिलेला असल्यामुळें इतर धानिक व राजेरजवाडे आपली कृपादृष्टि त्याजकडे अशीच वळवितील अशी आशा आहे.

बेळगांव. १२–८–१२.

**गोविंद रामचंद्र ओक,**
बी. ए., एल्एल्. बी., वकील.

---

## ग्रंथलेखकाचे दोन शब्द.

छंदस् व साहित्य या विषयावर ग्रंथ लिहिण्यास लागणारी पात्रता व अध्ययन हीं प्रस्तुत लेखकाचे अंगीं नाहींत हें निराभिमानपणें तो कबूल करित आहे. पण मराठी ७ वी, मराठी व इंग्रजी कॉलेजांतील प्रौढ विद्यार्थी व कवि वगैरे सर्व प्रकारच्या काव्यव्यासंगी लोकांस त्या दोन्हींही विषयांची सर्व माहिती एकत्र मिळावी असा प्रयत्न मराठी भाषेंत आजवर झालेला आढळण्यांत आला नाहीं. यास्तव 'अकरणात् मंदकरणं श्रेयः' या न्यायानें हा लहानसा प्रयत्न महाराष्ट्र देशबांधवांपुढें ठेविण्याचें तो धाडस करित आहे.

यांत **पूर्वार्ध**—भाग २ रा छंदांच्या उत्पत्तीचें स्वरूप; भाग ५ वा यांतील संक्षेपानें वर्णिलेलीं वर्णसमवृत्तें, दंडकवृत्तें, तसेंच वर्णविषम, मात्रासम, वैतालीय वगैरे वृत्तांचा संग्रह प्रसंगोपात्त आला आहे. भाग २ रा यानें छंदांच्या उत्पत्तीचें स्वरूप ध्यानीं येईल पण काव्य लेखनास त्यापासून तादृश फायदा नसल्यानें याच भागाचे शेवटीं पृष्ठ २३ यांत ह्मटल्याप्रमाणें 'छंदःशास्त्राच्या इतर उपयुक्त भागांकडे चांगलें लक्ष्य द्यावें हें बरें',

भाग ५ वा—यांत नवीन अशा कांहीं वृत्तांचा संग्रह दिला आहे. तीं बरींच प्रचारांत येण्यायोग्य अशीं आहेत. विद्यार्थ्यांस पाठास सुलभ जावें व वृत्तलक्षण सहज समजावें ह्मणून ज्या जातीचें वृत्त त्याच जातीच्या एकाच ओळींत त्या वृत्ताचे गण व नांव हीं दिलीं आहेत. प्रत्येक गणांत अक्षरें तीन असतात व **ल** ह्मणजे लघु व **ग** ह्मणजे गुरु हें ध्यानीं धरिलें असतां गणाक्षरांवरून वृत्ताक्षरसंख्या किती हें प्रौढ विद्यार्थ्यांस सहज समजणारें आहे. वृत्तलक्षणाच्या ओळीखालीं जे उदाहरणाचे श्लोक दिले आहेत त्यांत यद्यपि पृष्ठ ७।८ यांत सांगितल्याप्रमाणें वृत्तार्थ साधूनही एक सुसंगत असा कथाभाग साधतो. तथापि ते श्लोक केवळ उदाहरणें ह्मणूनच पाठ करणेचे आहेत. कौतुकानें वृत्तलक्षण सहज ध्यानीं यावें, अशासाठीं तशी व्यवस्था मुद्दाम केली आहे. व त्यास उपयुक्त असा संख्यासूचक शब्दकोश केवळ माहितीस्तव दिला आहे. अर्थात् तो पाठ केलाच पाहिजे असें नाहीं.

**उत्तरार्ध**—प्रचारांत नाहींत असे बरेच अलंकार यांत आहेत, तेही केवळ शास्त्र या नात्यानें आले आहेत. भाग ८ वा अलकारांतील सूक्ष्म भेद हे त्या त्या अलंकाराखालीं येणें योग्य आहे खरें पण प्रथमतः सर्व अलंकारांची ओळख होणें इष्ट असल्यानें ते शेवटीं दिले आहेत. तात्पर्य, यांतील कांहीं भाग केवळ विशेष माहिती या नात्यानें आला असल्यानें विद्यार्थी व कवि यांनीं आपणास जरूर असणाऱ्या तेवढ्या माहितीचा उपयोग करून घ्यावा अशी

त्यांस सूचना आहे. जेथें जेथें उदाहरणासाठीं दुसऱ्याचे श्लोक घेतले आहेत तेथें तेथें त्यांचीं नांवें दिलीं आहेत. बाकीचे कर्त्याचे आहेत असें समजावें.

हा ग्रंथ संस्कृत वृत्तरत्नाकर, छंदोमंजरी, हिंदी छंदःप्रभाकर वगैरे छंदोग्रंथ; साहित्यदर्पण, काव्यप्रकाश, रसगंगाधर, कुवलयानंद वगैरे संस्कृत साहित्यग्रंथ; कै. चिपळूणकर यांच्या निबंधमालेंतील मराठी कवितेवरील चर्चा, वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें यांत प्रसिद्ध झालेले वादविवाद यांच्या साहाय्यानें लिहिला आहे. शिवाय, साहित्यशास्त्र, रसप्रबोध, अलंकारप्रकाश वगैरे सुंदर मराठी साहित्यग्रंथांचेंही प्रसंगोपात्त साहाय्य झालें आहे. हें येथें कृतज्ञतापूर्वक लिहिणें योग्य आहे.

या ग्रंथाची हस्तलिखित प्रत पाहून प्रो. चिंतामण गंगाधर भानु, बी. ए. पुणें, प्रो. त्र्यंबक गंगाधर नातु, बी. ए. राजाराम कॉलेज, व गुरुवर्य वे. शा. सं. आत्मारामशास्त्री पित्रे मुख्याध्यापक संस्कृत पाठशाळा कोल्हापूर या विद्वान सद्गृहस्थांनीं कळकळीच्या योग्य सूचना केल्या. माझे विद्वान व सुशील मित्र श्री. रा. रा. गोविंद रामचंद्र ओक बी. ए., एल्‌एल्. बी. वकील बेळगांव यांनीं सवड नसतांही सुंदर प्रस्तावना लिहून दिली. श्रीसिद्धेश्वर प्रिंटिंग प्रेसचे मॅनेजर रा. रा. वासुदेव नारायण ठकार यांनीं छपाईचे कामीं उत्तम सवलत दिली. हें येथें कळवणें योग्य आहे.

श्रीकृष्णस्वामीविजय या ग्रंथास परम भाग्यशाली क्षत्रियकुलावतंस श्रीमच्छत्रपति शाहूमहाराज सरकार करवीर यांनीं जें बहुमोल साहाय्य दिलें त्यामुळेंच प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याची मला उमेद आली. अर्थात् त्याचीही या प्रसंगीं आठवण होणें साहजीक आहे. ईश्वर त्यांना सहपरिवार सदैव सुखी ठेवो!

हा ग्रंथ आमचे परम विख्यात राजाधिराज, पुण्यश्लोक सम्राट् पंचम जार्ज व महाराज्ञी मेरी यांच्या ११ डिसेंबर सन १९११ इसवी रोजीं भरतभूमीचें इतिहासप्रसिद्ध राजधानीनगर जें हस्तिनापुर त्या ठिकाणीं झालेल्या राज्या-

रोहणाच्या मंगल दिवशीं प्रसिद्ध व्हावयाचा होता. पण मध्यंतरीं नाना प्रकारच्या अडचणी, भयंकर संकटें व दुर्वास, कौशिकासारख्या कांहीं गुरुतुल्य मंडळीस द्यावी लागणारी निर्वाणीची कसोटी या कैचींतून पार पडावयाचें होतें. अशांतूनही श्रीगंगाधर महाराजांच्या अतुल कृपाप्रसादानें सुरक्षित पार पडलों हें कळविण्यास आनंद वाटतो. असो श्रीसमर्थांच्याच प्रेरणेनें मे. श्री. ना. नारायणराव ऊर्फ **बाबासाहेब घोपरडे चीफ् ऑफ् इचलकरंजी** यांनीं अत्यंत उदार अंतःकरणानें प्रोत्साहनपूर्वक उत्तम द्रव्यसाहाय्य दिलें यामुळेंच प्रस्तुत ग्रंथ आजच्या स्थितींत बाहेर येत आहे. याबद्दल त्या विद्या-विभूषित, सुशील, गुणग्राही व नीतिमान् प्रभूचे धन्यवाद गावे तेवढे थोडेच. ईश्वर त्यांना सदैव सुखी ठेवो. असो, श्री. **बाबासाहेब** यांनीं या पुस्तकांत आपला फोटो घालणेस व पुस्तक अर्पण करणेस परवानगी दिली याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

याशिवाय त्या प्रसंगीं रा. सा. **गोपाळराव** जोग बी. ए. एल्एल्. बी., प्रा. सेक्रेटरी संस्थान इचलकरंजी; रा. ब. **रामचंद्र** रघुनाथ शिरगांवकर बी. ए. एल्एल्. बी. सरसुभे, श्री. **सीताराम** रघुनाथ शिरगांवकर, श्री. **गणेश** विश्राम वायंगणकर वकील, श्री. **चिंतो** वामन ऊर्फ बाबा गुणे वैद्यराज, कोल्हापूर; श्री. रामचंद्र गणेश हरळीकर वकील गडहिंग्लज, ती० स्व० श्री. **सदाशिव** यशवंत देशपांडे, मासेवाडी वगैरे अनेक सद्गृहस्थांनीं अनेक प्रकारें मनःपूर्वक साहाय्य दिलें. यामुळें त्या सर्वांचेही आभार मानणें रास्त आहे. असो.

छापतांना वरील अनेक अडचणीमुळें बरींच अशुद्धे नजरचुकीनें राहून गेलीं आहेत. फोटोवरील कवितांतही तोच प्रकार झाला आहे. हें कळ-ण्यास मी दिलगीर आहें. या माझ्या अल्पज्ञ प्रयत्नांत कांहीं गुणलव आढळल्यास त्याचें श्रेय श्रीगुरूचरण व मातृतुल्य सुज्ञ वाचक यांजकडे आहे.

व कांहीं दोष आढळल्यास ते मजकडे आहेत हें लक्ष्यांत घेऊन माझे महाराष्ट्र देशबांधव पूर्वीप्रमाणेंच या माझ्या अल्पशा श्रमांचें सार्थक करतील अशी आशा धरून वाचकांची रजा घेतों.

मु० श्रीक्षेत्र करवीर.
ता० १५।८।१२

सर्वांचा नम्र सेवक,
गणेश विष्णु देशपांडे.

---

## 'छंदोऽलंकार' या पुस्तकावरील विद्वान् लोकांचे कांहीं अभिप्राय.

वे. शा. सं. नरहरी रंगनाथशास्त्री जगद्गुरुपाठशालाध्यापक मठ करवीर हे लिहितात.

सामोदं प्रदीयत इदमाशंसापत्रं श्रीमत्करवीरसिंहासनाधीश्वरजगद्गुरु श्रीविद्याशंकरभारतीस्वामिनामाज्ञामनुसरता मया। समागतः किलास्माकं नयन-पथं पुरातनाननर्घ्यनिबंधोद्धृतसारसंग्राहकः प्रायशः पद्यकाव्यस्य सोदाहरणानां विविधवृत्तलक्षणानामावेदकः। उपमोत्प्रेक्षाप्रभृतीनां काव्यालंकाराणांच स्तोकं स्वरूपावेदनपरः 'छंदोऽलंकारनामा' महाराष्ट्रभाषानूदितोग्रंथः। नूत्नेनानेनान्तर्बाह्यकाव्यस्वरूपमधिजिगांसूनामन्तेवासिनां बव्हायासमन्तरा झटिति स्यादाविर्भूतं काव्यस्वरूपमिति मन्महे। अयं च इदानींतन राजकीय पाठशालाप्रविष्टच्छात्राणामतीवोपकारकः स्यादित्यसंदिग्धमिति शिवम्। त्रय-स्त्रिंशदुत्तरअष्टादशशतशाकीयज्येष्ठासित १४ श्यां रवौ।

---

सुप्रसिद्ध ग्रंथकार व कवि वे. शा. सं. वासुदेव वामनशास्त्री खरे संस्कृत शिक्षक मिरज हायस्कूल हे लिहितात.

वि. वि. ' छंदोलंकार ' नामक ग्रंथ मी मधून मधून वाचून पाहिला. पुस्तककाराचा हा उद्योग पाहून कौतुक वाटलें व आनंदही झाला. कारण ' काव्य ' या विषयावरील सर्व प्रकारची माहिती ज्यांत एकत्र संकलित केलेली आहे असा ग्रंथ मराठींत आजपर्यंत नव्हता. ती उणीव या ग्रंथानें भरून काढिली आहे. या ग्रंथकाराची कविताशक्ति बऱ्यापैकीं आहेच पण त्यांतले-त्यांत श्लेषात्मक कविता करण्याची यांची हातोटी वाखाणण्याजोगी आहे. असें मला वाटतें. ता. २६–६–११.

---

वे. शा. सं. पंडित **हरीशास्त्री** पाटगांवकर मुख्याध्यापक संस्कृतपाठशाला इचलकरंजी हे लिहितात:—

वि. वि. छंदस् व साहित्य या दोन्ही विषयांची अशी सुबोध माहिती तुमच्या ' छंदोऽलंकार ' नामक मराठी ग्रंथांतच मला आढळली. काव्यव्यासंगी विद्यार्थी व कवि यांस या ग्रंथाचा पुष्कळ उपयोग होईल. तुमची कविताशक्ति व वृत्तें वर्णन करण्याची नवी टूम हीं चांगली आहेत. ता. २६–६–११.

---

वे. शा. सं. पंडित **बाळशास्त्री** हुपरीकर संस्कृत अध्यापक राजाराम कॉलेज कोल्हापूर हे लिहितात.

वि. वि. आपलें पुस्तक मधून मधून वाचून पाहिलें अशा तऱ्हेच्या नवीन प्रयत्नानें महाराष्ट्र वाङ्मयांत चांगल्या ग्रंथाची भर पडली आहे. कवि व शाळांतील प्रौढ विद्यार्थी यांना अत्युपयुक्त होईल, असें माझें मत आहे. ता. ९–८–१२.

---

वे. शा सं. पंडित **आत्माराम** शास्त्री पित्रे मुख्याध्यापक संस्कृत पाठशाला कोल्हापूर हे लिहितातः—

वि. वि. आपला ' छंदोऽलंकार ' नामक मराठी काव्यशास्त्रावरील ग्रंथ बराच वाचून पाहिला. छंदस् व साहित्य या दोन्हीही विषयांचें मार्मिक विवेचन या तुमच्या पुस्तकांत एकत्र मिळतें. वृत्तें वर्णन करण्याची तुमची शैली

उत्तम आहे वृत्तोदाहरणें देतांना त्यांत मधून श्रीरामकथा गुंफण्याचा यत्न स्तुत्य आहे. काव्यशास्त्राभ्यास करणाऱ्या छात्रांस याचा अत्युपयोग होईल. असा ग्रंथ मराठींत आजवर नव्हता. ती उणीव तुह्मी चांगल्या तऱ्हेनें भरून काढिली आहे असें माझें मत आहे. ता. १५–८–१२.

---

वे. शा. सं. पंडित श्रुतिशिरोभूषण कल्याणशास्त्री जनवाडकर कोल्हापूर हे लिहितात.

वि. वि. आपल्या देशावर विद्याप्रिय इंग्लिशांचें राज्य झाल्यावर इकडे अनेक महत्त्वाच्या सुधारणा होऊन पुष्कळ विद्याप्रसार झाला व त्याच बरोबर महाराष्ट्र भाषाही प्रौढ दशेस आली. प्रस्तुत उच्चस्थितीस पोहोंचलेल्या महाराष्ट्र विदग्धवाङ्मयांत तुमच्या 'छंदोऽलंकार' नामक काव्यशास्त्रावरील भरपूर व उपयुक्त माहितीच्या अत्युत्तम ग्रंथानें भर पडली आहे. महाराष्ट्रांग्ल-पाठशाळांतील प्रौढ विद्यार्थी व कवि यांस या ग्रंथाचा फार उपयोग होईल असें मला वाटतें. स्वीकृत विषय वर्णन करितांना मधून मधून श्रीरामकथा गुंफणें, स्वमतांना पुढें मांडणें, भाग्यशाली सम्राट् पंचम जार्ज व महाराज्ञी मेरी, श्रीमच्छ-त्रपति शाहूमहाराज व. श्री. ना. नारायणराव बाबासाहेब घोरपडे यांचेविषयीं प्रेमोद्गार काढून आपली राजनिष्ठा व्यक्त करणें वगैरेचा प्रकार स्तुत्य असून मूळ विषयास सोडून नाहीं ही विशेष संतोषाची गोष्ट होय. उत्तरार्ध भाग ९ वा यांतील विचार कविवर्गास व इतर काव्यजिज्ञासूंस फार उपयोगी आहेत. तुह्मी महाराष्ट्रकाव्यवाङ्मयाची केलेली ही सेवा अपूर्व असून तुमचें वय, परिस्थिति व अध्ययन हीं पाहतां फारच कौतुकास्पद आहे. ता. १८–८–१२.

---

रा. सा. त्र्यंबक गंगाधर नातु बी. ए. संस्कृत प्रोफेसर राजारामकॉलेज व माजी ए. इन्स्पेक्टर कोल्हापूर हे लिहितात.

वि. वि. संस्कृत साहित्यांतील वृत्तरत्नाकर, छंदोमंजरी, काव्यप्रकाश, साहि-त्यदर्पण वगैरे ग्रंथांचा परिपाक या तुमच्या नूतन कृतींत चांगला उतरला असून

यांतील वृत्तें, रस अलंकार, काव्यासंबंधीं सूचना वगैरेंचें विवेचन मार्मिकप
केलेलें आहे. वृत्तें वर्णन करण्याची तुह्मी योजिलेली नवी पद्धति बरी असून
तिनें वृत्तें ध्यानांत राहण्यास व पाठास सुलभता येईल. अशा तऱ्हेच्या
प्रयत्नाची महाराष्ट्र भाषेंत फारच उणीव होती ती तुह्मी चांगल्या तऱ्हेनें भरून
काढिली आहे. तुमची कविताशक्तिही प्रशंसनीय आहे मराठी व इंग्रजी
प्रौढ विद्यार्थ्यांस हा ग्रंथ उपयुक्त असल्यानें मुंबईविद्याशाळाखातें यास मंजूर
करील अशी आशा आहे. ता. २१–१८–१२.

---

रा. सा. प्रो. **अण्णा** बाबाजी लठ्ठे एम्. ए. ए०. इन्स्पेक्टर कोल्हापूर हे
लिहितात.

'**छंदोलंकार**' नांवाचें पुस्तक रा. रा. गणेश विष्णु देशपांडे यांचेकडून
आलेलें वाचून पाहिलें. पुस्तक मेहेनतीनें लिहिलें असून तें लिहिण्याची
पात्रता रा. देशपांडे यांचें आंगीं चांगलीच असावी असें वाटतें. या विषयाचा
अभ्यास करणाऱ्यांस हें पुस्तक फार उपयोगी होईल. ता. २२–८–१२.

---

रा. सा. **विनायक** सखाराम घाटे एम्. ए. संस्कृत प्रोफेसर डेक्कन कॉलेज
पुणें हे लिहितात.

सा. न. वि. वि. आपलें '**छंदोऽलंकार**' हें पुस्तक पोहोंचलें. त्याचे कांहीं
भाग मी वाचून पाहिले. पुस्तक एकंदरींत चांगलें साधलें आहे. माहिती
भरपूर असून यथार्थ आहे. कांहीं ठिकाणीं मराठी भाषा अमळ दुर्बोध
झाल्यासारखी वाटते, तरी एकंदरींत पुस्तक वाचनीय झालें असून यामुळें
मराठी वाङ्मयांत भर पडेल अशी माझी समजूत आहे. ता. २४–८–१२.

---

सुप्रसिद्ध कविशिरोमणी रे० **नारायण वामन टिळक** अहमदनगर, लिहितात.

सा. न. वि. वि. आपलें साहित्यकुसुमांजलि अथवा '**छंदोलंकार**' हें
पुस्तक काव्यविषयाचा पद्धतीनें अभ्यास करणारांस अत्यंत मोलाचें वाटण्या-

तरखें झालें आहे. असलें पुस्तक मराठींत पाहिजे होतें; आपण ही उणीव तऱ्हेनें चांगल्या रीतीनें भरून काढिली आहे कीं, काव्य–विषयाचा एक विद्यार्थी या नात्यानें मी आपले फार फार उपकार मानतों. ता. ५–९–१२.

---

प्रो. चिंतामण गंगाधर भानु बी. ए. फर्ग्युसन कॉलेज पुणें हे लिहितात.

सा. न. वि. वि. आपला ' छंदोलंकार ' नांवाचा ग्रंथ वाचून पाहिला. या पुस्तकांतील छंदःशास्त्राचा भाग चांगला झाला आहे. वृत्तें ओळखण्यासाठीं व वृत्तें समजण्यासाठीं ज्या पद्धतीचा स्वीकार केला आहे ती पद्धति मला फार आवडली. उदाहरणांतलि कवितांवरून आपली कविताशक्तिही प्रशंसनीय आहे. ध्वनि, व्यंग्यकाव्य, चित्रकाव्य, लक्षणावाच्यकाव्य, वृत्ति, रस, अलंकार वगैरे साहित्याची सुंदर चर्चाही यांत असल्यानें सर्वसाधारण वाचकांस व कॉलेजांतील विद्यार्थ्यांस हा ग्रंथ पुष्कळ उपयोगी पडेल. कवीच्या आंगचे गुण व काव्यासंबंधीं सूचना हा भागही बरा आहे. एकंदरीनें आपला उद्योग स्तुत्य आहे. यास चांगला आश्रय मिळून परमेश्वर आपणांस यश देवो !

---

सुप्रसिद्ध विद्वान् वे. शा. सं. वासुदेवशास्त्री अभ्यंकर संस्कृत अध्यापक, फर्ग्युसन कॉलेज पुणें हे लिहितातः—

रा. रा. गणेश विष्णु देशपांडे रा. कोल्हापूर यांचेकडून आलेला ' छंदोलंकार ' नांवाचा ग्रंथ मधून मधून बराच वाचून पाहिला. त्यामध्यें ग्रंथकारांनीं विषयाचें विवेचन चांगलें केलें आहे. हा ग्रंथ वाचिला असतां वाचकांस प्रस्तार वगैरे कठिण विषयांचें सुलभ रीतीनें ज्ञान होईल. व साहित्य शास्त्रामध्यें प्रथमतः प्रवेश करूं इच्छिणाऱ्यांस या ग्रंथाचा विशेष उपयोग होईल असें वाटतें.

श्रावण कृ० १२ शके १८३४.

---

## श्रीगंगाधरदासकृत चक्रबंध (पृ० १२१.)



यांत ४ व १० या घरांत "श्री रामातें ध्यानीं आणी" हीं अक्षरें साधलीं आहेत.

स्रग्विणी-वृत्त.

सर्वदा श्रीपती चिंतितो ध्यानिं रे ॥
हिंडसी रानिं कां शोध घे नीट रे ॥
सौख्य-धामा जरी इच्छितो आदृता ॥
ठेविं बा ते तुवां चित्तिं आणि अतां ॥१॥

चित्रबंधाचें उदा० नं० १.

## श्रीगंगाधरदासकृत शिबिका बंध.

(यांत शब्दालंकार विवाय न यीतस्त्रो. स, अप्रस्तुतप्रशंसा (गर्भित) व श्लेष.

हे अर्थालंकार हे आहेत. श्रीमन्नारायणा या कवींत श्लेष आहे.

स्रग्धरा-वृत्त.

श्रीमन्नारायणा वा अरि करि धारेवी दास हा सत्य-सन्धु ॥
ख्याती गाती अती जी रवधितधि रुचिरा सर्व ती होय सिद्ध ॥
वा मेघा शांत तृष्णा समाये करि सत्या-चातकी साधि पर्व ॥
ओं त्या धाडी न रिक्ता न तृण सम गणी, रक्षिती कीर्ति सर्व ॥ १ ॥



श्री... प्रेस, कोल्हापूर.

# आयुष्मन् विजयी भव.



**श्री. नामदार नारायणराव ऊर्फ बाबासाहेब**
**घोरपडे, सरकार सं. इचलकरंजी.**

**गीति**—चिंतामणि कल्पतरू घेउनि तशि कामधेनु सांगाती ॥
**नारायण**-भूपाला रचिली विधिनें तुझी धवल कीर्ति ॥ १ ॥

[ साहित्यलक्ष्मी १६३ पृ.

[ चित्रशाळा प्रेस, पुणें. ]

# साहित्यकुसुमांजलि

अथवा

# छंदोऽलंकार.

## भागानुक्रमणिका.

### पूर्वार्ध.

#### छंदोगंगाधरी.


| भाग. | नांव. | पृष्ठें |
|---|---|---|
| १ | परिभाषा. | २ |
| २ | छंदोत्पत्तीचें स्वरूप | ९ |
| ३ | वर्णशुद्धि व वर्णगण | २३ |
| ४ | संख्यासूचक शब्दकोश | २७ |
| ५ | वर्णसमवृत्तें | ३४ |
| | ,, संक्षेपवृत्तें | ६८ |
| | ,, दंडक वृत्तें. | ७२ |
| ६ | वर्णार्धसमवृत्तें | ७३ |
| ७ | वर्णविषमवृत्तें | ७६ |
| | ,, प्राकृतवृत्तें. | ७८ |
| ८ | अनुष्टुब् वृत्तें. | ८१ |
| ९ | मात्रासमवृत्तें | ८२ |
| १० | मात्रार्धसमवृत्तें | ८६ |
| ११ | मात्राविषमवृत्तें | ८७ |
| १२ | आर्या व वैतालीयवृत्तें | ८८ |
| १३ | फटके कटाव वगैरे | ९३ |


### उत्तरार्ध.

#### साहित्यलक्ष्मी.


| भाग. | नांव. | पृष्ठें. |
|---|---|---|
| १ | शब्दार्थविवेचन. | ९७ |
| २ | काव्यलक्षण, हेतु व प्रकार. | १०१ |
| ३ | काव्यलेखन व त्याचे वर्णनीय विषय. | १०३ |
| ४ | रस. | १०७ |
| ५ | रसविरोध वगैरे. | १२१ |
| ६ | गुण, वृत्ति वगैरे. | १२२ |
| ७ | अलंकार– | १२६ |
| | शब्दालंकार. ( बहुतेक ) | ,, |
| | अर्थालंकार | १३० |
| | रसवदादि अलंकार | १७७ |
| | अलंकारसंमेलन | १८१ |
| ८ | अलंकारविवेचन. | १८३ |
| ९ | कवींच्या अंगचे गुण व काव्यासंबंधीं सूचना | १८७ |
| १० | कवि–समय. | १९० |

# छंदोगंगाधरी.

## विषयानुक्रमणिका.


| विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|---|
| **अ-आ इ.** | | उमा | ५५ | चित्रा | ८३ |
| अनुष्टुब् | ८१ | उष्णिक् | २६ | चौपाई(१५मा.) | ८२ |
| अपरवक्त्र | ७५ | ओवी | ७९ | चौपाई(१६मा.) | ८३ |
| अपरान्तिका | ९२ | औपछंदसिक | ९१ | चौपाई(३०मा.) | ८५ |
| अभंग | ७८ | **क-ग घ** | | जलोद्धतगति | ४८ |
| अमृतध्वनि | ६४ | कटाव | ९४ | ताटंक | ८५ |
| असंबाधा | ५४ | कन्या | ३४ | तोटक | ४८ |
| अंजनीगीत | ८७ | कला | ३५ | त्रिभंगी (दंडक) | ७३ |
| अंबुधरा | ६२ | कामदा | ४० | त्रिभंगी (मा.) | ८५ |
| आपातलिका | ९१ | कौमुदी | ७५ | **द-ध.** | |
| आपीड | ३७ | गंगाधर | ६६ | दक्षिणांतिका | ९१ |
| आर्या | ८८ | गीति | ८९ | दिंडी | ८४ |
| आर्यागीति | ९० | घनाक्षरी | ७९ | दीपकमाला | ४१ |
| इंद्रवज्रा | ४२ | **च. ज त.** | | दोधक | ४३ |
| इंद्रवंशा | ४८ | चंद्रवृष्टिप्रयात | ७२ | दोहा | ८६ |
| **उ. ओ. औ.** | | चंद्रमौली | ६३ | द्रुतमध्या | ७५ |
| उद्गीति | ९० | चंद्रिका | ५१ | द्रुतविलंबित | ४७ |
| उदीच्यवृत्ति | ९१ | चपला | ८९ | नरहरी | ८४ |
| उपगीति | ९० | चंपकमाला | ३९ | नलिनी | ५६ |
| उपचित्रा [अर्धसम] | ७४ | चामर | ५५ | **प फ. ब भ.** | |
| ,, [मात्रिक] | ८३ | चारुहासिनी | ९२ | पंचचामर | ५७ |
| उपेंद्रवज्रा | ४२ | चित्रवृत्त | ५७ | पज्झटिका | ९ |

| विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ |
|---|---|---|---|---|---|
| पद | ९५ | मंदाकिनी | ४६ | वर्णनष्ट | ११ |
| पथ्या [ आर्या ] | ८९ | मंदारमाला | ६४ | वर्णपताका | १५ |
| पथ्यावक्र | ८१ | मध्यक्षामा | ५४ | वर्णमर्कटी | १६ |
| पादाकुलक | ८३ | मधुमति | ३६ | वर्णमेरु | १४ |
| पुष्पिताग्रा | ७५ | मनोरमा | ४१ | वर्णशुद्धि | २३ |
| पृथ्वी | ६० | मयूरी | ४१ | वर्णसूचि | १२ |
| प्रत्यापीड | ७७ | मल्लिका | ३७ | वसंततिलका | ५३ |
| प्रभावती | ५० | महामोदकारी | ६१ | वंशस्थ | ४७ |
| प्रमाणिका | ३७ | माणवक | ३७ | वानवासिका | ८३ |
| प्रवृत्तक | ९२ | मात्रागण | ८२ | विद्युन्माला | ३६ |
| प्रहर्षिणी | ५२ | मात्रासमक | ८३ | विद्युल्लेखा | ३६ |
| प्रहरणकलिता | ५३ | मालती | ५० | विपुला | ८९ |
| प्राच्यवृत्ति | ९२ | माल्यभारा | ७४ | विबुधप्रिया | ६० |
| प्रियंवदा | ४७ | मालिनी | ५५ | विभावरी | ५२ |
| फटका | ९३ | मुद्रिका | ३९ | वियोगिनी | ७४ |
| बिंब | ३८ | मेघविस्फूर्जिता | ४४ | विलासिनी | ४४ |
| भुजंगप्रयात | ४६ | मौक्तिकमाला | ४४ | विश्लोक | ८३ |
| भ्रमरविलसिता | ४५ | यूथिका | ५० | विष्णुपद | ८४ |
| **म. य. र. ल.** | | रथोद्धता | ४३ | वेगवती | ७३ |
| मंजुभाषिणी | ५१ | रमा | ५६ | वैताली | ९० |
| मंजुसौरभ | ७६ | रास(१७व२३ मा) | ८४ | वैश्वदेवी | ४९ |
| मणिमध्या | ३८ | ललित | ४२ | **श. स. ह.** | |
| मत्तमयूरी | ५२ | लावणी | ९५ | शशिवदना | ३५ |
| मत्ता | ४० | **व** | | शार्दूलविक्रीडित | ६१ |
| मदनललिता | ५७ | वक्र | ८१ | शालिनी | ४३ |
| मदिरा | ६६ | वर्णगण | २३ | शिखरिणी | ५८ |
| मंदाक्रांता | ५९ | वर्णोद्दिष्ट | १३ | सखी | ८३ |

| विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ |
|---|---|---|---|---|---|
| स्रग्धरा | ६३ | स्वागता | ४४ | सौख्य | ६७ |
| स्रग्विणी | ४९ | सुभद्रिका | ४५ | हरी | ३५ |
| सार्की | ८७ | सुलक्षण | ९२ | हारी | ३५ |
| साधारण | ७७ | सुंदरि | ६७ | हरिणी | ५९ |
| सार | ८५ | सुलोचना | ३८ | हरिणीप्लुता | ७४ |
| सारंग | ४६ | सोरठा | ८१ | हंसी | ३९ |


---

# साहित्यलक्ष्मी.


| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ – आ | | अनुमान | १७९ | आक्षेप | १५१ |
| अंगांगिभाव | १८२ | अन्योन्य | १५६ | उ–ए–ऐ–ओ. | |
| अतिशयोक्ति | १४३ | अनुज्ञा | १६६ | उर्जस्वित् | १७७ |
| अतद्गुण | १६८ | अपन्हुति | १३८ | उत्तर | १६९ |
| अंत्यनुप्रास | १२७ | अप्रस्तुतप्रशंसा | १४९ | उत्प्रेक्षा | १४० |
| अत्युक्ति | १७४ | अर्थांतरन्यास | १६२ | उदात्त | १७४ |
| अर्थश्लेष | १४९ | अर्थालंकार | १३० | उन्मीलित | १६९ |
| अद्भुत | ११७ | अल्प | १५६ | उपमा | १३१ |
| अधिक | १५६ | अवज्ञा | १६६ | उपमान | १७९ |
| अधिकार्थीलक्षणा | १०० | अश्ववाटीयमक | १२८ | उपमेयोपमा | १३३ |
| अनन्वय | १३२ | असम | १७६ | उपादानलक्षणा | ९९ |
| अनुगुण | १६८ | असंगति | १५३ | उल्लास | १६५ |
| अनुपलब्धि | १८० | असंभव | १५३ | उल्लेख | १३६ |
| अनुप्रास | १२६ | आत्मतुष्टि | १८० | एकावली | १५८ |
| अभंगश्लेष | १२९ | आवृत्तिदीपक | १४४ | ऐतिह्य | १८१ |
| अनुभाव | १०८ | आशीः | १७५ | ओज | १२३ |

| विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ |
|---|---|---|---|---|---|
| **क. ग. च. छ.** | | निरूढलक्षणा | १०० | प्रेयान् [अलं०] | १७७ |
| करुणरस | ११३ | **प. ब. भ.** | | प्रौढा | १२४ |
| कारकदीपक | १६१ | पर्याय | १५९ | प्रौढोक्ति | १६३ |
| कारणमाला | १५८ | पर्यायोक्त | १५० | बीभत्स | ११६ |
| काव्यलिंग | १६२ | परिकर | १४८ | भक्तिरस | ११९ |
| काव्यार्थापत्ति | १६२ | परिकरांकुर | १४९ | भयानकरस | ११५ |
| गुण | १२२ | परिणाम | १३६ | भंगश्लेष | १३० |
| गुणीभूतकाव्य | १०३ | परिवृत्ति | १६० | भावशबलता | १७८ |
| गूढोक्ति | १७० | परिसंख्या | १६० | भावसंधि | १७८ |
| गौडी | १२५ | परुषा | १२४ | भाविक | १७३ |
| गौणीलक्षणा | ९९ | पांचाली | १२५ | भावोदय | १७८ |
| चित्रबंध | १२९ | पिहित | १७० | भ्रांति | १३७ |
| चित्रकाव्य | १०३ | पुष्पयमक | १२८ | **म. य. र. ल.** | |
| चेतनगुणोक्ति | १७५ | पूर्वरूप | १६७ | मधुरा | १२४ |
| छेकानुप्रास | १२७ | प्रत्यनीक | १६२ | माधुर्य | १२२ |
| छेकोक्ति | १७२ | प्रत्यक्ष | १७८ | मालादीपक | १५८ |
| **त. द. ध. न.** | | प्रतिमा | १८० | मिथ्याध्यवसिति | १६४ |
| तद्गुण | १६७ | प्रतिषेध | १७४ | मिश्र | ९८ |
| तिरस्कार | १७६ | प्रतिवस्तूपमा | १४५ | मीलित | १६८ |
| तुल्ययोगिता | १५३ | प्रतीप | १३३ | मुद्रा | १६६ |
| दामयमक | १२८ | प्रयोजनलक्षणा | १०० | यथासंख्य | १५९ |
| दीपक | १४४ | प्रश्न | १७६ | यमक | १२८ |
| दृष्टांत | १४५ | प्रस्तुतांकुर | १५० | युक्ति | १७२ |
| दोष | १२६ | प्रसाद | १५४ | यौगिक | ९७ |
| निदर्शना | १४६ | प्रहर्षण | १६४ | रत्नावली | १६७ |
| निरुक्ति | १७४ | प्रेयान् (रस) | ११९ | रसवान् | १७७ |

| विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ |
|---|---|---|---|---|---|
| रीति | १२५ | विरोधाभास | १५१ | श्रुतिप्रमाण | १८० |
| रूढ | ९७ | विवृतोक्ति | १७१ | श्लेष ( शाब्दी ) | १२९ |
| रूपक | १३५ | विशेष | १५७ | सम | १५५ |
| रौद्र | ११५ | विशेषक | १६९ | समप्राधान्य | १८२ |
| ललित | १६४ | विशेषोक्ति | १५३ | समाधि | १६१ |
| लक्षणलक्षणा | ९९ | विषम | १५४ | समासोक्ति | १४८ |
| लक्ष्यार्थ | ९८ | विषादन | १६५ | समाहित | १७२ |
| लक्षितालक्षणा | १०० | वीररस | ११४ | समुच्चय | १६१ |
| लाटानुप्रास | १२७ | वृत्त्यनुप्रास | १२७ | ससंदेह | १३७ |
| लेश | १६६ | वृत्ति | १२४ | सहोक्ति | १४७ |
| लोकोक्ति | १७२ | वैदर्भी | १२५ | संदेहसंकर | १८२ |
| **व** | | व्यंग्यकाव्य | १०२ | संभावना | १६३ |
| वक्रोक्ति [शाब्दी] | १३० | व्यंग्यार्थ | १०० | संभोगशृंगार | ११० |
| ,, [अर्थी] | १७२ | व्यतिरेक | १४६ | संसृष्टि | १८१ |
| वत्सलरस | ११८ | व्यभिचारीभाव | १०८ | साध्यवसानीलक्षणा | ९९ |
| वाच्यार्थ | ९८ | व्याघात | १५७ | सामान्य | १६९ |
| विकल्प | १६१ | व्याजनिंदा | १५९ | सार | १५९ |
| विकस्वर | १६३ | व्याजस्तुति | १९० | सारोपालक्षणा | ९९ |
| विचित्र | १५६ | व्याजोक्ति | १७० | साहचर्यालक्षणा | १०० |
| विधि | १७४ | **श. स. ह.** | | सूक्ष्म | १७० |
| विनोक्ति | १४८ | शब्दप्रमाण | १७९ | स्थायभाव | १०७ |
| विपरीता | १०० | शब्दालंकार | १२६ | स्मृति | १३६ |
| विप्रलंभशृंगार | १११ | शांतरस | ११७ | स्मृतिप्रमाण | १७९ |
| विभाव | १०७ | शुद्धालक्षणा | ९९ | स्वभावोक्ति | १७३ |
| विभावना | १५२ | शृंगाररस | १०९ | हास्यरस | ११२ |
| विरुद्धगुणन्यास | १७५ | श्रुत्यनुप्रास | १२७ | हेतु | १७५ |

ॐ

सद्‌गुरुगंगाधराय नमः ।

अथ

# साहित्यकुसुमांजलि

अथवा

# छंदोऽलंकार.

## मंगलाचरण.

श्लोकः—अनुष्टुब्.

ॐ नमः परमानंद **गंगाधर** जगद्गुरो ।
त्वत्प्रसादादहं किंचित् विचरामीह वाङ्मये ॥ १ ॥
त्वद्ध्यानमग्नदासेन **श्रीमन्नारायणप्रभो** ।
पादयोरर्पितो भक्त्या **साहित्य-कुसुमांजलिः** ॥ २ ॥
भूयाद्भारतवर्षेऽस्मिन् भगवन्भवदाश्रयात् ॥
सूरिबालमनोहारी यत्सुगंधः सुखप्रदः ॥ ३ ॥

# पूर्वार्ध.

## छंदोगंगाधरी.

### भाग १ ला.

### परिभाषा.

छंदोलक्षण ( गीति ).

मात्राक्षरसंघ गड्या सार्थ दिसे जरि सुपद्ययुत चरणीं ॥
त्यासी छंद ह्मणे तद्गणयोगानें असंख्य भेद गणी ॥ १ ॥

**भावार्थः**—उघड आहे. छंद दोन प्रकारचे आहेत. १ **वैदिक** व २ **लौकिक**. वैदिक छंदांत गायत्री, उष्णिक्, अनुष्टुब्, बृहती वगैरे प्रकार असून ऋचा वगैरे त्या छंदांत आहेत. हे छंद रचणें फार दुर्घट असल्यानें व त्यांची येथें जरूरी नसल्यानें तत्संबंधीं माहिती येथें दिली नाहीं. लौकिक छंदांत अनुष्टुब्, विद्युन्माला, वसंततिलका वगैरे प्रकार आहेत. आमचे बहुतेक शास्त्रग्रंथ, पुराणें, काव्यें, नाटकें, चंपू वगैरे त्या छंदांत असून सर्व संस्कृत व प्राकृत कवींचा भर त्यांवर आहे. तशांत सर्व महाराष्ट्रकाव्यवाङ्मयाचा तो आत्माच असल्यानें सदर छंदांचें वर्णन या ग्रंथांत केलें आहे.

हे छंद मात्रा व अक्षरें यांच्या समुदायानें होतात. मात्रा ह्मणजे स्वरोच्चार करण्यास लागणारा काळ. हे स्वर चौदा असून ऱ्हस्व, दीर्घ व प्लुत असे त्यांचे भेद आहेत. ज्या स्वराचा उच्चार सहज अर्थात् लवकर होतो त्यास ऱ्हस्व ह्मणावें. ज्या स्वराचा उच्चार होण्यास त्याचे दुप्पट

वेळ लागतो त्यास दीर्घ ह्मणावें. आणि ज्या स्वराचा उच्चार होण्यास लघुस्वराच्या तिप्पट वेळ लागतो त्यास प्लुत ह्मणावें. प्लुत स्वर लौकिक छंदांत आढळत नाहीं. व्यंजनें चौतीस आहेत. त्यांचा उच्चार होण्यास स्वर साहाय्याची अपेक्षा असते. लघु स्वराचा उच्चार होण्यास जो काल लागतो त्याचा निम्मा काल व्यंजनाचा उच्चार होण्यास लागतो. ह्मणून स्वरावांचून त्यांचा पूर्ण उच्चार होत नाहीं. स्वरांच्या ऱ्हस्व-दीर्घ भेदानें तींही ऱ्हस्वदीर्घ होतात. ऱ्हस्व स्वराची एक मात्रा व दीर्घ स्वराच्या दोन मात्रा आणि व्यंजनाची अर्धी मात्रा मानितात. परंतु व्यंजनाचा उच्चार स्वरसाहाय्यानें पूर्ण होत असून, कोणताही स्वरोच्चार होण्यास जो वेळ लागतो तितकाच वेळ त्या स्वरासुद्धां—मग तें एक व्यंजन असो अथवा अधिक व्यंजनें असोत—त्याचा उच्चार होण्यास लागत असल्यानें व्यंजनांच्या निराळ्या मात्रा मानीत नाहींत. चौदा स्वर व चौतीस व्यंजनें यांना अक्षरें अथवा वर्ण ह्मणतात. लघु वर्णापुढें अनुस्वार-विसर्ग अथवा एकादें जोडाक्षर आल्यास त्यास गुरुत्व येतें. जसें संत, दुःख, भस्म इत्यादि. यांतील प्रथम वर्णास गुरुत्व आलें आहे. प्राकृत शब्दांत हा नियम तारतम्यानें येतो. ह्मणजे जेथें, उच्चारण्यांत मागील लघु-वर्णावर जोडाक्षराचा आघात झाल्यास लघुवर्णास गुरुत्व येतें; एरवीं येत नाहीं. जसें जेव, तेव, पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या इत्यादि शब्दांत पहिल्या लघु-वर्णास गुरुत्व येत नाहीं. मात्र 'तुह्मी' हा शब्द जेव्हां 'तु' वर आघात देऊन उच्चारिला जातो तेव्हां त्यास गुरुत्व येतें; एरवीं येत नाहीं.

अनुस्वार व विसर्ग यांच्या दोन दोन मात्रा असतां व्यंजनाप्रमाणेंच त्यांच्या येथें निराळ्या मात्रा मानित नाहींत. फक्त लघुवर्णास

त्यांपासून गुरुत्व येतें इतकेंच. चरणाचे शेवटीं, व्यंजन आल्यास त्याची मात्रा मानित नाहींत. चरणाचे शेवटीं जेथें स्पष्ट नियम सांगितला नसेल तेथें लघुवर्ण असला तरी त्यास गुरु मानावें. प्राकृतांत ऋ, ऌ वगैरे स्वर शब्दांच्या शेवटीं येत नाहींत. दोन मात्रांचा एक पिंड मानितात.

ऱ्हस्व आणि दीर्घ यांस लघु आणि गुरु अशीं अनुक्रमानें आणखी नांवें आहेत. लघु मात्रा अथवा वर्ण ( । ) या अथवा ( ˘ ) या चिन्हानें दाखवितात. गुरु मात्रा अथवा वर्ण ( ऽ ) या अथवा ( – ) या चिन्हानें दाखवितात.

मात्रा व अक्षरें यांच्या समुदायानें हे छंद होत असल्यानें लौकिक छंदाचे १ **मात्रा–जाति** व २ **वर्ण–वृत्त** असे दोन मुख्य भाग आहेत. त्यांना प्रत्येकीं चार चरण अथवा पाद असतात. १ **मात्रा–जाति** याच्या चारही चरणीं वर्णांचा लघु–गुरु–क्रम व त्यांची संख्या ह्यांविषयीं कांहीं नियम नसून केवळ मात्रांच्या संख्येनें चरणाची पूर्तता होते.

उदाहरण ( दिंडी ).

काव्यशास्त्रामृतपान करिति जे कीं । अमर होती जन्मुनी ते विलोकीं ॥
परी बाला ती सुलभ कशी प्राप्ति । ग्रंथरूपें पथ करित याच साठीं ॥१॥

यांत वर्णांचा लघु-गुरुक्रम व त्यांची संख्या यांचा मेळ नसून केवळ मात्रांनीं चरणाची पूर्तता झाली आहे. ह्मणून हा मात्राछंद समजावा. मात्राछंदांत चार मात्रांचा **गण** कल्पून त्यायोगें मात्रांची संख्या मोजतात. मात्राछंदाचे १ **मात्रा–सम,** २ **मात्रार्ध–सम** व ३ **मात्रा–विषम** असे तीन भेद आहेत. १ **मात्रा-सम** छंदाच्या चारही चरणीं मात्रांची संख्या सारखी असते. १ ते ३२ मात्रा–समछंदास **साधारण** व

त्यांपुढील मात्रासमछंदास **मात्रा-दंडक** असें ह्मणावें. २ **मात्रार्ध-सम-छंदाच्या** विषम ( १ व ३ ) व सम ( २ व ४ ) या चरणीं मात्रांची संख्या सारखी असते. व ३ **मात्रा-विषमछंदांत** चारही चरणीं याविषयीं कांहीं मेळ असत नाहीं.

२. **वर्ण-वृत्तः**—यांतील चरणाची पूर्तता वर्णांचा लघु-गुरु-क्रम व त्यांची संख्या यांनीं होते.

उ० श्लोकः—माणवक.

**माणवकक्रीडित तें । भूतलिं गा नंदसुतें ॥**
**दाखवितां गोपगणां । हर्षें, भजे तच्चरणां ॥ १॥**

यांत प्रत्येक चरणाची पूर्तता वर्णांचा लघु-गुरु-क्रम व त्यांची संख्या यांनीं झाली आहे. ह्मणून हें वर्णवृत्त ह्मणावें. वर्णवृत्ताचे १ **वर्णसम**, २ **वर्णार्धसम**, व ३ **वर्णविषम** असे तीन भेद आहेत. १ **वर्णसम**-वृत्ताच्या चारही चरणीं वर्णांचा लघु-गुरु-क्रम व त्यांची संख्या हीं सारखीं असतात. एक ते सव्वीस अक्षरीं वर्णसमवृत्तास **साधारण** व त्यांपुढील अक्षरीं वर्णसमवृत्तास **वर्णदंडक** ह्मणावें. २ **वर्णार्धसम**वृत्ताच्या विषम ( १ व ३ ) सम ( २ व ४ ) या चरणीं वर्णांचा सदर क्रम व संख्या हीं सारखीं असतात. आणि ३ **वर्णविषम**वृत्तांत चारही चरणीं असा कांहींच निर्बंध नसतो. वर्णवृत्तांत तीन अक्षरांचा एक **गण** कल्पून त्यायोगें ह्मणजे अक्षरगणांनीं वृत्ताचें लक्षण मानितात. छंद अथवा वृत्तें ह्मणतांना मध्यें कोठें थांबावें हें दाखविणाऱ्या स्थलास **यति**, **विराम** अथवा **अवसान** ह्मणावें.

कोणतीही मात्रासंख्या अगर वर्णसंख्या यांतील लघु-गुरु मात्रा अथवा वर्ण यांच्या अदलाबदलीनें निरानिराळे छंद अथवा वृत्तें कशीं व कितीं होतात

हें ज्यापासून समजतें त्यास **प्रस्तार** असें ह्मणावें. प्रस्तार हें छंदोत्पत्ति-दर्शक गणितशास्त्र आहे. त्याअन्वयें छंद अगर वृत्तें यांचे अगणित भेद कसे होतात व ज्याला आपण गद्य ह्मणतों तेंसुद्धां पद्यांत कसें येतें हें समजतें. तथापि छंद अगर वृत्तें यांना ताल व सूर यांचें साहाय्य पाहिजे असल्यानें प्रस्तारानें सिद्ध होणाऱ्या असंख्य वृत्तांपैकीं जीं वृत्तें ताल व सूर यांवर ह्मणतां येतील त्यांना **पद्य** ह्मणावें. आणि जीं तशीं सहसा ह्मणतां येणार नाहींत त्यांना **गद्य** ह्मणावें हें उत्तम. मग गद्यामध्यें सामान्यतः सरळ असणारी वाक्यरचना त्यांत असो वा नसो. वस्तुतः सूक्ष्मदृष्ट्या सारेंच वाङ्मय पद्यमय आहे. पण हा सूक्ष्मतर विचार सामान्यें-करून समजणें अशक्य असल्यानें रूढीकडे लक्ष्य देऊन वरील गद्य व पद्य याविषयींचे नियम ध्यानांत ठेवावेत. तात्पर्य, लघु–गुरूंची योग्य अदलाबदल, अथवा यति व गण यांची उत्तम योजना होऊन जीं वृत्तें ताल व सूर यांवर ह्मणतां येतात, त्यांना पद्य ह्मणावें. अशा रीतीनें कोणा कवीनें एखादा नवीन छंद प्रस्ताराच्या नियमान्वयें रचिल्यास त्यास **गाथा** ह्मणावें अथवा त्यानें त्यास दिलेलें नांव चालवावें. वृत्तांचें पूर्वीचें नांव कोणत्याही कारणानें बदलूं नये.

वर्णसमवृत्तें वर्णन करितांना पुढील तजवीज केली आहे. प्रथम वृत्ताचें नांव, त्यापुढें कंसांत त्याचे गण, पुढें कंसाबाहेर यति हीं दिलीं आहेत. त्याखालीं पाठ करण्यास सुलभ जावें ह्मणून जींत वृत्ताचें नांव व गण आणि साधेल तेथें यति आले आहेत अशी त्याच गणलक्षणानें युक्त असलेली एक ओळ दिली आहे. तिच्या खालीं उदाहरणासाठीं एक श्लोक दिला असून त्याखालीं त्याचा भावार्थ दिला आहे.

वृत्तें वर्णन करितांना **म य र स त ज भ न** हीं गणसंज्ञेचीं अक्षरें आणि लघु व गुरुदर्शक **ल** आणि **ग** हीं अक्षरें कोठें कोठें **मा ये रा ला गा** वगैरे तऱ्हेनें फरकानें आलीं आहेत. कधीं कधीं तीं जोडाक्षरांनीं युक्त अशीं आलीं आहेत. तेथें जोडाक्षराच्या उच्चाराप्रमाणेंच त्यांतील गणाक्षरांचा क्रम समजावयाचा. उदाहरणार्थ भ्रमरविलसिताचें लक्षण **माभ्ना लागा भ्रमरविलसिता** असें दिलें आहे. यांत **भ्ना** या जोडाक्षरामध्यें भचा प्रथम उच्चार होतो हें ध्यानीं घेतलें असतां **म भ न** हे गण १ लघु व १ गुरु यांनीं सदर वृत्त होतें असें जाणावें.

नमुन्यासाठीं प्रत्येक वृत्ताचा जो श्लोक दिला आहे. त्यापासून सुसंगत अशा एकाद्या अर्थाचा बोध तर होतोच, पण वृत्ताचें नांव, गणसंज्ञेचीं अक्षरें आणि संख्या दर्शविणारे शब्द यांमध्यें श्लेष साधला असल्यानें, **वृत्तदर्शीनें** पाहिलें असतांही वृत्ताचें संपूर्ण लक्षण सहज ध्यानीं येईल अशी व्यर्थी आणि सुलभ रचना केली आहे. ह्मणजे पहिल्या ओळींत वृत्ताचें नांव दिलें आहे. दुसऱ्या ओळींत **म य र स त ज भ न** या पिंगलसूत्रोक्त आठ अक्षरांपैकीं प्रत्येक श्लोकाचीं गणसूचक अक्षरें वृत्तदर्पणाप्रमाणें मध्यें कोठेंही न देतां प्रारंभींच दिलीं आहेत. मात्र यांत एक दोन ठिकाणीं **ग**च्या ठिकाणीं **घ** आणि **स**च्या ठिकाणीं **श** अशीं अक्षरें आलीं आहेत. उदाहरणार्थ **प्रहर्षिणी** व **अमृतध्वनि** हीं वृत्तें पहा. दुसऱ्या ओळींत गणाक्षरें कोणतीं व तद्भिन्न अक्षरें कोणतीं, यांचा संदेह राहूं नये ह्मणून गणाक्षरें संपलीं कीं त्यांपुढेंच तद्भिन्न असें एकादें अक्षर ठेविलें आहे. लघु–गुरुदर्शक **ल** आणि **ग** हीं अक्षरें कारणपरत्वें वृत्तलक्षणांत येतात; तीं गणाक्षरांपुढेंच येतील अशी व्यवस्था

केली आहे. यामुळें त्या **ल** आणि **ग** या अक्षरांपुढें व तसेंच गणां-नंतर येणाऱ्या भिन्न अक्षरांपुढें पुन्हां गणसूचक अक्षरें आलीं तर तीं गणाक्षरें नव्हेत असें समजावें. जेथें एकाच जातीचे गण आले असतील तेथें ते बहुधा संख्यावाचक शब्दांनीं दाखविले आहेत. जसें; नलिनीवृत्तांत पांच सगण आहेत तेथें **सुगति** या शब्दानें त्यांचा बोध केला आहे. येथें **सु** ह्मणजे सगण व **गति** ह्मणजे पांच असा अर्थ घेतला असतां त्यांचा बोध होतो. जेथें एकाच जातीचे **गण** येऊन त्यांपुढें लघु व गुरु आले असतां ल आणि ग हीं तद्दर्शक अक्षरें लागलींच येतील अशी व्यवस्था केली आहे. उदाहरणार्थ **उमा** व **सौख्य** हीं वृत्तें पहा. तिसऱ्या ओळींत संख्यासूचक शब्दांनीं वृत्ताची अक्षरसंख्या दर्शविली आहे. त्याशिवाय त्या चरणांत-आणखी संख्यासूचक शब्द नाहींत. बाकीच्या चरणांत प्रसंगोपात् संख्यासूचक शब्द आल्यास त्यांनीं वृत्ताक्षरसंख्येचा बोध घेऊं नये. अशा तऱ्हेनें त्या उदाहरणाच्या श्लोकांत वृत्तलक्षणही साधलें आहे. वृत्तलक्षणाची जी ओळ आरंभीं दिली आहे तींतील आणि उदाहरणांतील संख्यासूचक शब्दांचें ज्ञान होण्यासाठीं प्रारंभीं **दोहावृत्तात्मक** एक लहानसा सुलभ कोश दिला आहे तो कंठगत करावा. उदाहरणाच्या श्लोकांतील ही **श्लेषात्मकरचना** वाचतांना सहज ध्यानीं यावी ह्मणून वृत्ताचें नांव, गणाक्षरें व संख्यावाचक शब्द हीं जाड शब्दांत दाखविलीं आहेत संख्या-वाचक शब्दांतील संख्या व्यक्त होण्याकरितां त्यावर अंकही दिले आहेत. तसेंच यति, गण, लक्षण वगैरे शब्द य० ग० ल० अशा संक्षेपानें प्रसंगोपात् आले आहेत. याशिवाय जेथें नड पडेल तेथें धोरणानें जाणण्याची कृपा करावी.

---

## भाग २ रा.

### छंदोत्पत्तीचें स्वरूप.

एकाच वर्णसंख्येचीं निरानिराळीं वृत्तें लघुगुरूंच्या अदलाबदलीनें कशीं होतात व त्यांचें स्वरूप काय वगैरे ज्यापासून समजतें त्यास **प्रत्यय** ह्मणतात. हे **१ प्रस्तार २ नष्ट ३ उद्दिष्ट ४ सूचि ५ पाताल ६ मेरु ७ पताका** आणि **८ मर्कटी** असे आठ आहेत.

**१ प्रस्तारः**—कोणत्याही एका वर्णसंख्येचीं लघुगुरूंच्या अदलाबदलीनें निरनिराळया प्रकारचीं कितीं वृत्तें होतात हें ज्यापासून समजतें त्यास **वर्ण-प्रस्तार** ह्मणावें. वर्णप्रस्तारांतील प्रथम वृत्ताचें स्वरूप (ऽ) या गुरुदर्शक वक्ररेषेनें दाखवितात. प्रस्तार काढण्याची रीतिः—

साकी

प्रथम गुरुपदीं लघु रेषा ती सव्यांगीं प्रतिरूपा ॥
शून्यस्थलिं गुरु लिहि वामीं, क्रम धारि हा पुनरपि सोपा ॥
सर्वहि लघु अंतीं । येतां कार्य होय सुमती ॥ १॥

**भावार्थः**—आपणास ज्या वर्णसंख्येचा प्रस्तार काढावयाचा असेल तितकीं (ऽ)हीं गुरु चिन्हें ओळीनें लिहून त्यांतील प्रथम गुरूच्या खालीं (।) ही लघु रेषा लिहावी आणि उजवीकडे त्या लघुरेषेपुढें वरील चिन्हांची जशास तशी नक्कल करावी. पुन्हां दुसरी ओळ मुख्य धरून तींतील प्रथम गुरूच्या खालीं लघुरेषा आणि तीपुढें वरील चिन्हांची जशास तशी नक्कल करावी आणि प्रथम जी लघुरेषा येते तिच्या डाव्या बाजूस रिकामी स्थानें असतील तर तीं गुरुचिन्हांनीं भरावींत. पुन्हां ती ओळ मुख्य धरून

वर सांगितलेल्या नियमाप्रमाणें करावें. असें शेवटीं सर्वही चिन्हें लघु येईपर्यंत करीत जावें. याप्रमाणें जितका वेळ चालेल तितकीं त्या त्या प्रकारचीं लघु–गुरु—वर्णात्मक अशीं त्या वर्णसंख्येचीं वृत्तें होतात असें जाणावें. आणि त्या वृत्तसंख्येस त्या वर्णसंख्येचा **छंदांक** असें ह्मणावें ह्मणजे त्या छंदांकावरून त्या वर्णसंख्येची लघुगुरूंच्या अदलाबदलीनें तितक्या प्रकारचीं निरनिराळीं अशीं वृत्तें होतात असें दिसून येईल. वर्णप्रस्तारांतील १ लें वृत्त सर्व गुरु अक्षरांचें आणि शेवटलें वृत्त सर्व लघु अक्षरांचें असतें असें जाणावें. उदाहरणार्थ वरील प्रस्ताराच्या रीतीनें २ व ३ या वर्ण-संख्यांचीं लघुगुरूंच्या अदलाबदलीनें निरनिराळ्या प्रकारचीं कितीं वृत्तें होतात हें खालीं दाखवितों.

**२ वर्णांचा प्रस्तार.**

| प्रकार. | रूप. | उदाहरण. |
|---|---|---|
| १ | ऽ ऽ | कांता. |
| २ | । ऽ | सदा. |
| ३ | ऽ । | देव. |
| ४ | । । | यश. |

**३ वर्णांचा प्रस्तार.**

| प्रकार. | रूप. | उदाहरण. | प्रकार. | रूप. | उदाहरण. |
|---|---|---|---|---|---|
| १ | ऽ ऽ ऽ | मायावी. | ५ | ऽ ऽ । | ताराप. |
| २ | । ऽ ऽ | यशोदा. | ६ | । ऽ । | जनास. |
| ३ | ऽ । ऽ | राधिका. | ७ | ऽ । । | भारत. |
| ४ | । । ऽ | सुमती. | ८ | । । । | नमन. |

वरील उदाहरणांवरून लघुगुरूंच्या अदलाबदलीनें २ व ३ या वर्ण-संख्यांचीं निरनिराळ्या प्रकारचीं ४ व ८ अशीं अनुक्रमें वृत्तें होतात असें सिद्ध झालें. यावरून २ व ३ या वर्णसंख्यांचे छंदांक अनुक्रमें ४ व ८ हे होत. याप्रमाणें इतर वर्णांचेंही जाणावें. वर्णसमप्रस्तारांत अंकक्रमानें छंदांकही दुप्पट होत जातो. यावरून १, २, ३ व ४ या वर्णसंख्यांचे छंदांक अनुक्रमें २, ४, ८ व १६ होतात असें दिसेल. आपणास ज्या वर्णसंख्येचे छंदांक काढावयाचे आहेत त्या वर्णांच्या पूर्वींच्या छंदांकाची

दुप्पट करावी ह्मणजे झालें. याशिवाय याच्या आणखी कांहीं रीती आहेत त्यांची व छंदांकांहून मूळ वर्ण जाणण्याची रीति व तसेंच एकंदर छंदांकांची बेरीज जाणण्याची रीति यांची तादृश गरज नसल्यानें तत्संबंधीं येथें विवेचन केलें नाहीं.

२ **वर्णनष्ट**:— कोणत्याही वर्णसंख्येच्या प्रस्तारांतील अमुक एका-प्रकारच्या वृत्तांतील लघुगुरूंची मांडणी कशी आहे हें ज्यापासून समजतें त्यास **वर्णनष्ट** ह्मणावें.

**रीति**:—आपणास ज्या वर्णसंख्येच्या प्रस्तारांतील कोणत्याही एका प्रकारच्या वृत्ताचें स्वरूप पहावयाचें असेल त्या वर्णसंख्येइतक्याच लघु-रेषा लिहून त्यांचेवर त्या वर्णसंख्येच्या छंदांकाची निम्पट क्रमानें लिहावी. नंतर आपणास ज्या प्रकारचें वर्णनष्ट पहावयाचें असेल तो इच्छांक त्या वर्णसंख्येच्या छंदांकांत वजा करावा आणि बाकी राहिलेल्या शेषांकांत लघुरेषांवरील अंकांपैकीं उजवीकडून डाव्या बाजूस जो जो अंक वजा जाऊन बाकी शून्य येईल त्या त्या अंकांचीं स्थानें गुरुवर्णात्मक असून बाकीचीं लघुवर्णात्मक आहेत असें समजावें.

उदाहरण :—५ वर्णसंख्येच्या प्रस्तारांतील ७ वा प्रकार अगर वृत्त कोणत्या स्वरूपाचें आहे हें पाहूं. आतां वरील नियमाप्रमाणें :—

| १ | २ | ४ | ८ | १६ |
|---|---|---|---|---|
| । | । | । | । | । |

अशा लघुवर्णदर्शक मात्रा लिहून त्यांवर ५ वर्णसंख्येच्या छंदांकांची निम्पट क्रमानें लिहिली. नंतर ५ वर्णांचा मूळ छंदांक जो ३२ त्यांत इच्छांक ७ हा वजा देतां २५ आले. हा शेषांक होय. यांत उजवी-कडून क्रमानें १६ वजा देतां बाकी ९ राहिले, त्यांत ८ वजा देतां बाकी

१ राहिला, व त्यांत १ वजा देतां बाकी शून्य राहिली. अर्थात् १६, ८ व १ या संख्यांच्या स्थानीं असणारे वर्ण गुरु होत व २ व ४ या संख्यांच्या स्थानीं असणारे वर्ण लघु होत. अर्थात् ५ वर्णसंख्येच्या प्रस्तारांतील ७वें रूप ( S I I S S ) असें आहे. **व साधु यशाला** हें त्याचें उदाहरण होय असें जाणावें. याच्या आणखी बऱ्याच रीती आहेत पण येथें त्यांची तादृश गरज नाहीं.

३ **वर्णोद्दिष्टः**—दिलेल्या वृत्तरूपावरून तें त्या वर्णसंख्येच्या प्रस्तारांतील कितवें वृत्त आहे, हें ज्यापासून समजतें; त्यास **वर्णोद्दिष्ट** ह्मणावें.

**रीतिः**—आपणास ज्या वर्णसंख्येचा रूपप्रकार पहावयाचा असेल त्या वर्णसंख्येच्या छंदांकाची निम्पट त्याच्या रेषात्मकवृत्तरूपावर क्रमानें लिहावी व लघुरेषांवरील अंकांचे बेरजेंत १ मिळवावा ह्मणजे येईल तें उत्तर होय. उदाहरण-५ वर्णसंख्येच्या प्रस्ताराचा ( S I I S S ) साधुयशाला हें रूप कितवा प्रकार होईल हें आपण पाहूं. तर वरील नियमाप्रमाणें त्याचें रेषात्मकवृत्तरूप मांडून

| १ | २ | ४ | ८ | १६ |
|---|---|---|---|---|
| S | I | I | S | S |

त्यावर ५ वर्णसंख्येच्या छंदांकाची निम्पट क्रमानें लिहिली. आतां लघु रेषांवरील अंक २ व ४ यांच्या बेरजेंत १ मिळविल्यानें ७ झाले. अर्थात् साधुयशाला हें रूप ५ वर्णसंख्येचा ७ वा प्रकार आहे असें झालें. याप्रमाणें आणखी जाणावें. याच्या आणखी कांहीं रीती आहेत, पण येथें त्यांची तादृश गरज नाहीं.

४ **वर्णसूचिः**—ज्यापासून वर्णवृत्तसंख्येचें स्पष्टीकरण, तिचे प्रकार, तसेंच आदिलघु व अंत्यलघु अशीं किती वृत्तें आणि आदिगुरु व अंत्यगुरु अशीं किती वृत्तें वगैरेची संख्या विदित होते त्यास **वर्णसूचि** ह्मणावेंवें

**रीतिः**--आपणास जितक्या वर्णांची सूचि तयार करावयाची असेल तितकीं कोष्टकें एक उभी अगर आडवी रेषा ओढून करावींत व त्यांत क्रमानें छंदांक लिहावेत. शेवटील अंक हा त्या वर्णप्रस्तारांतील आद्य गुरु व अंत्य गुरु आणि तसेंच आद्यलघु व अंत्यलघु ह्यांचा दर्शक होय. आणि छंदांकापासून ३ रा अंक आदि व अंत्यगुरु आणि तसेंच आद्य व अंत्यलघु ह्यांचा दर्शक होय ह्मणजे तितक्या प्रकारांनीं आद्यगुरु वा अंत्यगुरु वगैरे वृत्तें होतात असें समजावें. उदाहरणार्थ ५ वर्णांची सूचि आपण पाहूं.

५ वर्णांची सूचिः-- छंदांक ३२ संख्या.
आद्य वा अंत्य गुरु १६ आद्य लघु वा अंत्य लघु.
आद्य वा अंत्य गुरु ८ आद्य लघु वा अंत्य लघु.
४
२

या सूचीवरून असें दिसेल कीं ५ वर्णांचे छंदांक अगर एकंदर वृत्त-संख्यांक ३२ असून त्यांत प्रत्येक १६ वृत्तें अशीं आहेत कीं ज्यांचे आरंभीं किंवा अंतीं गुरु किंवा लघु वर्ण आहे. तसेंच प्रत्येक ८ वृत्तें अशीं आहेत कीं ज्यांचे आरंभीं किंवा अंतीं गुरु अथवा लघु वर्ण आहे. याप्रमाणें इतरही समजावें.

५ **वर्णपातालः**—प्रस्तारानें सिद्ध झालेल्या छंदांकांतील अथवा वृत्तांतील आद्य गुरु वा लघु, अंत्य गुरु वा लघु अशीं वृत्तें, सर्व गुरु, सर्व लघु वगैरे प्रत्येक वर्णवृत्तसंख्येचें ज्ञान ज्यापासून समजतें, त्यास **वर्णपाताल** असें ह्मणावें.

**रीतिः**—प्रथम आडव्या ५ रेषा काढून जितक्या वर्णांचें पाताल पहा-वयाचें असेल तितकीं घरें करावीत. नंतर १ ल्या सर्व घरांत १ पासून

अंक भरावेत ते वर्णसंख्या दर्शक होत. २ ह्यांत छंदांक लिहावेत. ते वृत्तसंख्यादर्शक होत. ३ ह्यांत त्यांची निम्पट लिहावी. ती आद्य गुरु व आद्यलघु वगैरेची दर्शक होय आणि चवथ्यांत पहिल्या व तिसऱ्या घरांतील अंकांचा गुणाकार लिहावा. हा सर्व गुरु व लघु ह्यांचा दर्शक होय. खालीं ३ पासून ६ वर्णांचें पाताल दाखविलें आहे.

| ६ वर्णांचें पाताल :—वर्णसंख्या | ३ | ४ | ५ | ६ |
|---|---|---|---|---|
| वृत्तसंख्या | ८ | १६ | ३२ | ६४ |
| आदिगुरु, अंत्यगुरु, आदिलघु, अंत्यलघु | ४ | ८ | १६ | ३२ |
| सर्वगुरु, सर्वलघु, | १२ | ३२ | ८० | १९२ |

या पातालावरून असें दिसेल कीं ६ वर्णांची वृत्तसंख्या ६४ असून त्यांत प्रत्येक ३२ वृत्तें अशीं आहेत कीं, ज्यांचे आरंभीं गुरु अथवा लघु, किंवा ज्यांचे अंतीं गुरु अथवा लघु वर्ण आहे व सर्व वृत्तें मिळून १९२ गुरु व तितकेच लघु वर्ण होतील. असें आणखी जाणावें.

६ **वर्णमेरुः**—वर्णांचीं एकंदर वृत्तें व त्यांच्या प्रकारांतील गुरु व लघु वगैरेची संख्या ज्यापासून समजतें त्यास **वर्णमेरु** ह्मणावें.

**रीति :**—प्रथम दोन कोष्टकें मध्यभागीं लिहून त्यांचे खालीं इष्ट संख्येपर्यंत प्रत्येकीं १।१ कोष्टक जास्ती वाढवीत जावें. नंतर दोन्ही बाजूंच्या घरांत वरून शेवटपर्यंत क्रमानें १।१ अंक भरावा. डावीकडील २ऱ्या घरांत क्रमानें तो अंक १।१नें जास्त वाढवून भरावा. बाकीचीं घरें शीर्षांक व त्याचा उपांत्य अंक यांच्या बेरजेनें भरावींत ह्मणजे वर्णमेरु तयार होतो. त्यांत शेवटच्या प्रथम घरांतील अंक हा त्या वर्णांचा सर्व गुरुवृत्तांचा दर्शक होय. व त्याचे पुढील अंक क्रमानें जास्त लघु अस-

लेशीं वृत्तें यांचा दर्शक होय असें जाणावें. खालीं ६ वर्णांचा मेरु दिला आहे.

**वर्णमेरु.**

१ १

१ २ १

१ ३ ३ १

१ ४ ६ ४ १

१ ५ १० १० ५ १

१ ६ १५ २० १५ ६ १

SSSSSS ISSSSS IISSSS IIISSS IIIISS IIIIIS IIIIII

या मेरूवरून पाहतां ६ वर्णांचीं वृत्तें ६४ प्रकारचीं आहेत. त्यांत १ वृत्त सर्व गुरु वर्णांचें आहे. बाकीचीं क्रमानें १।१ जास्त लघुवर्णांचीं आहेत. याप्रमाणें सर्व जाणावें. याचे आणखी कांहीं प्रकार आहेत. पण येथें त्यांची फारशी गरज नाहीं.

७ **वर्णपताका:**—मेरूच्या योगें लघुगुरूंचे जे प्रकार सिद्ध होतात त्यांचीं स्थानें ह्मणजे कितव्या प्रकारांत तीं रूपें आहेत हें ज्यापासून समजतें त्यास **वर्णपताका** असें ह्मणतात.

**रीतिः**—प्रथम जितक्या वर्णांची पताका बनवावयाची असेल त्या वर्णसंख्येला १ अधिक इतकीं घरें तयार करून त्यांत मेरूनें सिद्ध झालेलें त्यांचें रूप मांडावें. त्यापुढें क्रमानें वरून खालीं त्या वर्णांचे छंदांक लिहावेत. नंतर त्या छंदांकांत ( खालून वर ) त्याचे वरील अंक सोडून बाकीचे वरचे अंक क्रमानें वजा देत जावेत. अशारीतीनें वजा देऊन जे शेष

अंक येतील ते वजा न देतांना जो अंक सोडला असतो त्याचे पुढें क्रमानें मांडावेत ह्मणजे पहिली पताका तयार झाली. याचप्रमाणें पुन्हां करित जावें ह्मणजे पहिल्या पताकेंतील प्रत्येक अंकांत त्या पताकेच्या १ ल्या अंकाचे वरचा अंक सोडून बाकीचे वरचे अंक क्रमानें वजा देऊन शेषांक त्या पताकेच्या १ल्या अंकाचेवर जो अंक खालच्याप्रमाणें वजा न देतां सोडला असतो त्याचे पुढ क्रमानें मांडावेत. याप्रमाणें दुसरी पताका तयार होते. पुढेंही असेंच करावें. मात्र एकदां वजा दिलेला अंक पुन्हां येत असेल तर तो सोडून द्यावा हें लक्षांत ठेवलें ह्मणजे झालें. खालीं चार वर्णांची पताका दिली आहे.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ऽ ऽ ऽ ऽ | १ | | | | | |
| । ऽ ऽ ऽ | २ | ३ | ५ | ९ | | |
| । । ऽ ऽ | ४ | ६ | ७ | १० | ११ | १३ |
| । । । ऽ | ८ | १२ | १४ | १५ | | |
| । । । । | १६ | | | | | |

या पताकेवरून असें दिसेल कीं, ४ वर्णांच्या प्रस्तारांत पहिला प्रकार सर्व गुरुवर्णांचा २, ३, ५ व ९ हे प्रकार १ लघु व ३ गुरुवर्णयुक्त; ४, ६, ७, १०, ११ व १३ हे प्रकार २ लघु व २ गुरु वर्णयुक्त; ८, १२, १४ व १५ हे प्रकार ३ लघु व १ गुरु वर्णयुक्त आणि १६ वा प्रकार सर्व लघुवर्णयुक्त आहे. याप्रमाणें सर्व जाणावें.

८ **वर्ण मर्कटी**— वर्ण वृत्तांचीं संख्या आद्य गुरु वा लघु, अंत्य गुरु वा लघु, सर्व वर्ण, गुरु लघु, सर्व मात्रा व पिंड वगैरे ज्यापासून समजतें त्यास वर्णमर्कटी असें ह्मणावें.

**रीतिः**— ज्या वर्णांची मर्कटी तयार करावयाची असेल त्यांचे पुढें त्यांचा छंदांक लिहावा. तो त्याची वृत्तसंख्यादर्शक होय. नंतर त्यापुढें त्या

छंदांकाची निम्पट लिहावी ती आद्य गुरु वा लघु, अंत्य गुरु वा लघु ह्यांची संख्यादर्शक होय. नंतर वर्णसंख्या व वृत्तसंख्या ह्यांचा गुणाकार लिहावा. तो सर्व वर्णांच्या संख्येचा दर्शक होय. नंतर त्याची निम्पट लिहावी. ती गुरुलघूंची संख्या होय. नंतर सर्व वर्णसंख्या व गुरुलघु संख्या ह्यांची बेरीज लिहावी. ती सर्व मात्रांची संख्या होय. नंतर त्या मात्रांची निम्पट लिहावी. ती पिंडसंख्या होय. याप्रमाणें वर्णमर्कटी तयार होते. खालीं ३ ते ६ वर्णांची मर्कटी दिली आहे.

### वर्णमर्कटी.

| वर्णसंख्या. | वृत्तसंख्या. | आद्यगुरु वा लघु, अंत्य गुरु वा लघु. | सर्व वर्ण. | गुरु लघु. | सर्व मात्रा. | पिंड. |
|---|---|---|---|---|---|---|
| ३ | ८ | ४ | २४ | १२ | ३६ | १८ |
| ४ | १६ | ८ | ६४ | ३२ | ९६ | ४८ |
| ५ | ३२ | १६ | १६० | ८० | २४० | १२० |
| ६ | ६४ | ३२ | ३८४ | १९२ | ५७६ | २८८ |

वरील मर्कटीवरून सहा वर्णांची वृत्तसंख्या ६४ असून त्यांत प्रत्येक ३२ वृत्तें अशीं आहेत कीं, ज्यांचा आदि वर्ण गुरु अथवा लघु आहे. व प्रत्येक ३२ वृत्तें अशीं आहेत कीं, ज्यांचा अंत्य वर्ण गुरु अथवा लघु आहे. एकंदर ३८४ वर्ण असून त्यांत १९२ गुरु व तितकेच लघु आहेत. सर्व ५७६ मात्रा आहेत व २८८ पिंड आहेत. याप्रमाणें आणखी जाणावें.

---

## २ वर्णार्धसमप्रस्तार.

ज्याचे विषम ( १--३ ) चरण व सम ( २--४ ) चरण यांतील वर्णांचा क्रम व त्यांची संख्या सारखी असते त्यास **वर्णार्धसमवृत्त**

ह्मणावें. वर्णसमवृत्ताप्रमाणें यासही प्रस्तार वगैरे प्रत्यय आहेत. येथें प्रस्तार मात्र सांगतो.

**रीति पाहिली :**—चारही चरणांतील संख्या समान असेल तर पहिल्या चरणांतील अक्ष संख्येच्या छेदांकाचा वर्ग करून त्यांत तो छेदांक अगर त्या वर्गसंख्येचें वर्गमूळ वजा द्यावें; ह्मणजे शेष जी संख्या राहील तितके त्याचे; प्रकार होतील. छंदांक वजा देण्याचें कारण इतकेंच कीं, वर्णसमाप्रमाणें चारही चरणांतील वर्ण सारखे येणारे प्रकार वर्णार्धसमाच्या व्याख्येप्रमाणें वर्णार्धसमांत येऊं शकत नाहींत.

**रीति दुसरी :**—पहिल्या व दुसऱ्या चरणांतील वर्णसंख्येची बेरीज करून तिचा प्रस्तार काढावा व त्यांत पाहिले चरणांतील वर्णसंख्येचा छेदांक अगर आलेल्या प्रस्ताराचें वर्गमूळ वजा द्यावें ह्मणजे येईल तें उत्तर. जसें:—चारही चरणांत वर्णसंख्या सारखी असलेले २ वर्णसंख्येचें वर्णार्धसमवृत्त आहे. तर त्याचे लघुगुरुभेदानें किती प्रकार होतील हें आपण पाहूं. पाहिले चरणांतील वर्णसंख्या २ आहे. तिचा छेदांक ४ असून त्याचा वर्ग १६ आला. त्यांत तो छेदांक अगर १६ या वर्गसंख्येचें मूळ ४ हा अंक (त्या वर्गसंख्येंत) वजा देतां बाकी १२ राहिले हें उत्तर. किंवा दुसऱ्या रीतीप्रमाणें पाहिल्या व दुसऱ्या चरणांतील वर्णसंख्येची बेरीज ४ आली. तिचा प्रस्तार १६ आला त्यांत १ ले चरणांत वर्णसंख्या २ आहे तिचा छेदांक ४ हा अगर प्रस्तारांक जो १६ त्याचें वर्गमूळ ४ हा अंक वजा देतां बाकी १२ राहिले हें उत्तर. ह्मणजे २ समाक्षरी वर्णार्धसमवृत्ताचे लघुगुरुभेदानें १२ प्रकार होतात असें झालें. प्रस्ताराचें वर्गमूळ पाहिले चरणांतील वर्णसंख्येच्या छेदांकाइतकेंच असतें. ज्या वर्णार्धसमांतील विषम व सम

चरणांतील वर्णसंख्या भिन्न आहे त्याचा प्रस्तार काढावयाचा तो येणेंप्रमाणें:— विषम चरणांतील वर्णांचा छंदांक व सम चरणांतील वर्णांचा छंदांक यांचा गुणाकार करावा. अगर विषम व सम चरणांतील वर्णांच्या बेरजेनें जी संख्या येईल तिचा प्रस्तार अगर छंदांक तोच त्याचें उत्तर होय. जसें:— विषम [१ व ३] चरण यांत प्रत्येकीं ४ वर्ण आहेत व सम [२ व ४] चरण यांत प्रत्येकीं ५ वर्ण आहेत आणि ४ व ५ यांचे अनुक्रमें १६ व ३२ हे छंदांक असल्यानें त्या दोहोंचा गुणाकार ५१२ आला हें उत्तर. अथवा दुसऱ्या रीतीप्रमाणें विषम चरणांतील वर्णसंख्या ४ व सम चरणांतील वर्णसंख्या ५ यांची बेरीज ९ आली आणि ९ चा छंदांक ५१२ च आहे. अर्थात् ५१२ हेंच उत्तर होय.

---

### ३ वर्ण–विषम–प्रस्तार.

वर्ण–विषम–वृत्ताच्या चारही चरणांतील वर्णसंख्या सारखी असेल तर त्याचा प्रस्तार काढण्याची रीतिः— चारही चरणांतील वर्णांची बेरीज करून तिचा प्रस्तार काढावा व त्यांत त्या प्रस्ताराचें वर्गमूल वजा द्यावें. किंवा प्रथम चरणांतील वर्णसंख्येचा चतुर्घात करून त्यांत त्या चतुर्घाताचें वर्गमूल वजा द्यावें. जसें:—प्रत्येक चरणीं २ वर्ण असलेलें समाक्षरीं विषमवर्णवृत्त असून त्याचा प्रस्तार काढावयाचा आहे; तर, पहिल्या रीतीप्रमाणें त्याच्या चारही चरणांतील वर्णांची बेरीज ८ झाली आणि ८ या वर्णसंख्येचा प्रस्तार २५६ हा असल्यानें त्यांत त्याचें वर्गमूल १६ हा अंक वजा देतां २४० आले. किंवा दुसऱ्या रीतीप्रमाणें १ ल्या चरणांतील वर्णसंख्या २ ही असल्यानें तिचा ४ हा आहे. अर्थात् त्याचा ४ × ४ × ४ × ४ चतुर्घात

२५६ हा आला, त्यांत त्याचें वर्गमूळ १६ हा अंक वजा देतां २४० आले, यास्तव प्रत्येक चरणीं २ वर्ण असलेले समाक्षरी विषमवर्णवृत्ताचे प्रस्तारानें ह्मणजे लघु-गुरूंच्या अदलाबदलीनें २४० प्रकार होतात असें जाणावें.

आतां प्रतिचरणीं भिन्नवर्णसंख्या असलेल्या वर्ण-विषम-वृत्ताचा प्रस्तार काढणें झाल्यास चारही चरणांतील वर्णांची बेरीज करून जी संख्या येईल तिचा प्रस्तार काढावा ह्मणजे झालें. जसें:–प्रत्येक चरणीं अनुक्रमें १, २, ३ व ४ असे वर्ण असलेल्या वर्ण-विषम वृत्ताचा प्रस्तार काढणें आहे, तर त्याच्या चारही चरणांतील वर्णांच्या बेरजेची संख्या १० आली, आणि १० चा प्रस्तार १०२४ आहे. अर्थात् लघु-गुरूंच्या अदलाबदलीनें त्याचे तितके प्रकार होतात असें जाणावें.

---

### ४ मात्रासमछंद-प्रस्तार.

वर्णवृत्तांप्रमाणेंच मात्राछंदांचेही प्रस्तार वगैरे प्रत्यय आहेत. त्यांपैकीं नुसते प्रस्तार मात्र येथें सांगतों.

**रीतिः**—आपणाला ज्या मात्रासंख्येचा प्रस्तार काढावयाचा असेल ती विषम अगर सम आहे हें पाहावें. विषम असल्यास १ ली मात्रा लघुरेषात्मक लिहून बाकीच्या मात्रा गुरुरेषात्मक लिहाव्या. आणि सम असेल तर त्या मात्रा गुरुरेषात्मक लिहाव्या. नंतर वर्णसमप्रस्ताराच्या रीतीप्रमाणें त्यांचा प्रस्तार काढावा. मात्र वर्ण-सम-वृत्त व मात्रासमछंद यांच्या प्रस्ताराच्या रीतींत एवढाच भेद आहे कीं, वर्णसमवृत्ताच्या प्रस्ताराच्या रीतींत ज्या संख्येचा प्रस्तार काढावयाचा असतो त्या संख्येइतकीच स्थानें त्याच्या प्रत्येक प्रकारांत आलीं पाहिजेत. आणि मात्रासमछंदाच्या प्रस्तारांत स्थानांऐवजीं मात्रासंख्या भरली पाहिजे. याकरितांच प्रसंगोपात्

डावीकडील रिकामीं स्थानें गुरु अथवा लघु रेषांनीं भरून मात्रासंख्या पूर्ण करावी लागते. खालीं ३ व ४ मात्रांचा प्रस्तार दिला आहे.

३ (विषम) मात्रांचा प्रस्तार.

| प्रकार. | रूप. | उदाहरण |
|---|---|---|
| १ | ।ऽ | रमा |
| २ | ऽ। | नाथ |
| ३ | ।।। | चरण |

४ (सम) मात्रांचा प्रस्तार.

| प्रकार. | रूप. | उदाहरण |
|---|---|---|
| १ | ऽऽ | देवा |
| २ | ।।ऽ | सुदया |
| ३ | ।ऽ। | करोनि |
| ४ | ऽ।। | सत्वरें |
| ५ | ।।।। | भवहर |

वरील उदाहरणांवरून ३ व ४ या मात्रांचीं लघु-गुरुमात्रांच्या अदला-बदलीनें निरनिराळ्या प्रकारचीं अनुक्रमें ३ व ५ अशीं मात्रावृत्तें होतात, असें सिद्ध झालें. याचप्रमाणें आणखी जाणावें.

आतां छंदःशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यास अगर जिज्ञासूस प्रस्तार वगैरे प्रत्ययांबद्दल एवढेंच सांगावयाचें आहे कीं, लघु-गुरुमात्रा अगर वर्ण यांच्या अदलाबदलीनें निरनिराळीं असंख्य वृत्तें कशीं उत्पन्न होतात, याची थोडीशी कल्पना येण्यासाठीं येथें किंचिन्मात्र विवेचन केलें आहे. वस्तुतः या प्रस्तारविद्येचा पार लागणें फार कठीण काम आहे. नुसत्या १ ते २६ वर्णसमवृत्तांचेच एकंदर १३,४२,१७,७,२६ इतके निरनिराळे प्रकार होतात. याशिवाय दंडकवृत्तें, वर्णार्धसमवृत्तें, वर्णविषमवृत्तें, सर्व प्रकारचीं मात्रावृत्तें या सर्वांचे मिळून किती प्रकार होतील हें एक त्या मूळ शास्त्रकर्त्या महात्म्या **पिंगलऋषीलाच ठाऊक!** आतां मागें पृष्ठ ६ यांत सांगितल्याप्रमाणें ज्यास आपण गद्य ह्मणतों, तेंसुद्धां पद्यांत कसें येतें हें प्रस्तारप्रक्रियेनें खालीं सिद्ध करून दाखवितों. जसें:—**'वचनें दोन आहेत'** (दा. कृ. ल. व्या.) ही गद्य गणली जाणारी

ओळ पद्यांत कशी येते हें पहा. या ओळींत ८ वर्ण असून आठ वर्णांचा, प्रस्तारानें सिद्ध झालेला छंदांक २५६ हा आहे. तेव्हां त्यांत याच प्रकारचा, वर्णांचा लघु–गुरु-क्रम असलेला एकादा प्रकार आहे कीं काय हें पाहूं. तर वर्णोद्दिष्टांत सांगितल्याप्रमाणें त्यांचे लघु–गुरूंच्या अनुरोधानें

| १ | २ | ४ | ८ | १६ | ३२ | ६४ | १२८ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| । | । | ऽ | ऽ | । | ऽ | ऽ | । |

असें रेषात्मकरूप लिहून त्यावर आठ वर्णांच्या छंदांकाची निम्पट क्रमानें लिहिली आणि नियमाप्रमाणें लघु रेषांवरील अंकांच्या बेरजेंत १ मिळविला, तेव्हां १४८ आले. अर्थात् सदर ओळींतील वर्णांच्या लघु–गुरु–क्रमा-प्रमाणेंच अष्ट–वर्णवृत्ताच्या प्रस्तारांतील १४८ व्या प्रकारांतील वर्णांचा लघुगुरुक्रम आहे असें जाणावें. आतां अष्टवर्णसंख्येच्या प्रस्तारांतील १४८व्या प्रकारांतील वर्णांचा लघु-गुरु-क्रम कसा आहे हें आपणास माहित नाहीं असें मानून त्या प्रकारांतील वर्णांचा क्रम वरील गद्य ओळींतील वर्णांच्या लघुगुरुक्रमाप्रमाणें आहे किंवा नाहीं हें पाहूं ह्मणजे झालें. तर, वर्णनष्टांत सांगितल्याप्रमाणें आठही

| १ | २ | ४ | ८ | १६ | ३२ | ६४ | १२८ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| । | । | । | । | । | । | । | । |

लघु रेषा लिहून त्यांवर ८ वर्णांच्या छंदांकाची निम्पट क्रमानें लिहिली व प्रश्नांक १४८ ह्यास, छंदांक २५६ यांत वजा देतां १०८ राहिले; हा शेषांक होय. यांत उजवीकडून क्रमानें ६४, ३२, ८ व ४ हे अंक वजा जाऊन बाकी शून्य आली. अर्थात् त्या त्या अंकांचीं स्थानें गुरुवर्णात्मक असल्यानें त्यांतील वर्णांचा लघुगुरुक्रम ।।ऽऽ।ऽऽ। असा आहे व ते

'वचनें दोन आहेत' या गद्य ओळींतील वर्णक्रमाप्रमाणेंच आहे, सबब अष्ट-वर्णांचीं लघुगुरूंच्या अदलाबदलीनें जीं निरनिराळ्या प्रकारचीं २५६ प्रकारचीं वृत्तें होतात त्यांतील १४८ व्या प्रकारचें स्वरूप व सदर ओळीं-तील वर्णांच्या लघुगुरुक्रमाचें स्वरूप हीं एकच होत. यावरून सारेंच वाङ्मय पद्यात्मक आहे हें प्रस्तारविषयक गणितशास्त्रदृष्ट्या कसें सिद्ध होतें हें स्पष्ट दिसून येईल. आतां ही ओळ प्रस्तारप्रक्रियेनें जरी वृत्तात्मक होऊं शकते व हींत स, र हे गण व १ गुरु व १ लघु हीं आहेत तथापि ताल व सूर यांस अनुसरून ही ह्मणतां येत नसल्यानें हिला वृत्त न ह्मणतां गद्यच ह्मणावें हें उत्तम. याकरितांच प्रस्तारप्रक्रियेनें जरी अनंत वृत्तें होतात व सारेंच वाङ्मय पद्यात्मक आहे, तथापि गद्य व पद्य याविषयीं साधारणपणें पृष्ठ ६ यांत दिलेले नियम ध्यानांत ठेवावेत हें बरें. तसेंच प्राचीन सर्वमान्य ग्रंथकारांच्या मतानेंसुद्धां ही प्रस्तारविद्या केवळ कौतुकमय असल्यानें तिच्या नादीं लागून बुद्धि व काळ यांचा अपव्यय करण्यापेक्षां छंदःशास्त्राच्या इतर उपयुक्त भागांकडे चांगलें लक्ष्य द्यावें हें बरें.

---

## भाग ३ रा.

### वर्णशुद्धि व वर्णगण.

१ वर्णशुद्धिः—प्राचीन ग्रंथकारांनीं कोणते वर्ण शुभ व कोणते अशुभ, तसेंच कोणते वर्ण वृत्ताचे आरंभीं यावेत व कोणते वर्ण येऊं नयेत, व ते आल्यास काय करावें, ह्यासंबंधीं बरीच माहिती दिली आहे, तिचें येथें प्रसंगानुसार थोडक्यांत सार दिलें आहे.

वर्णांपैकीं सारे स्वर आणि क ख ग घ च छ ज ड त थ द ध न य श आणि स हे वर्ण शुभ होत. व ङ झ ञ ट ठ ढ ण प फ ब भ म र ल व ष ह क्ष आणि ज्ञ हे वर्ण अशुभ होत. त्यांतही झ भ र ष ह हे वर्ण दग्ध मानिले आहेत. अशुभ वर्ण वृत्तांचे आरंभीं येऊं देऊं नयेत. निदान दग्ध वर्णास तरी आरंभीं येऊ देऊं नयेत. व ते आलेच तर गुरु, देवता अथवा मांगल्यवाचक करावेत ह्मणजे दोष टळेल.

उ०:—झ आर्या गीति. ( मोरोपंत. )

झाला ययाति कविचा जामाता तीच सत्कथा परिसा ।
या चरितामृतपानें या लोकीं सर्व रसिक हो हरिसा ॥ १ ॥

यांत प्रारंभीं 'झ' हा दग्ध वर्ण आहे. पण गुरु असल्यानें दोषमुक्त आहे.

उ०:—भ उपजाति. ( नरहरि. )

भागीरथी कां इजला ह्मणावें । कशी वदा जान्हवि नांव द्यावें ॥
आश्चर्य मातें बहु होत आहे । हीनार्थ जी भूवरि माय वाहे ॥ १ ॥

यांत प्रारंभीं 'भ' हा दग्ध वर्ण आहे पण गुरु असल्यानें दोषमुक्त आहे.

उ०:—र वसंततिलका. ( रघुनाथ पंडित. )

रागेजली अरुणकांति विराजवीते । हे एकली सुतनु चंद्रकला तशी ते ॥
गेली हळूच कलहंस समीप केला । कांहीं पुढें फडकला अवलोकिजेला ॥१

यांत आरंभीं 'र' हा दग्ध वर्ण आहे पण गुरु असल्यानें दोषमुक्त आहे.

उ०:—ष भ्रमरविलसित.

षष्ठाध्यायीं रघुविरचरितें । वर्णालीं ज्यां मन बहु रमतें ॥
सेवावा तो प्रभुवर सुमनीं । ऐसें वाटे मजसि निशिदिनीं ॥ १ ॥

यांत आरंभीं 'ष' हा दग्ध वर्ण आहे पण गुरु असल्यानें दोषमुक्त आहे.

उ०:—ह मालिनी. ( वामन पंडित. )

हरिपण हरिनामें धातुमूर्तीस आलें । हरिमय हरिनामें विश्वसंतासि जालें ।
भवभय हरिनामें साधकांचें पळालें । वद वद वद जिव्हे रामनामें रसाले ॥ १

यांत आरंभीं 'ह' हा दग्ध वर्ण आहे पण देववाचक असल्यानें दोषमुक्त आहे.

**२ वर्णगण:**—वर्णवृत्ताचें लक्षण अक्षरगणांनीं जाणितात. ३ वर्णांचा १ गण होतो, आणि ३ वर्णांच्या प्रस्ताराचे लघुगुरूंच्या अदलाबदलीनें ८ प्रकार होतात हें मागें पृष्ठ १० यांत दाखविलेंच आहे. अर्थात् हे गणही याच प्रकाराच्या लघु-गुरु-क्रमाचे सूचक असून यति व ताल यांस अनुसरून वृत्तांमध्यें लघुगुरूंची योग्य अदलाबदल यावयास ह्या ३ अक्षरी गणांचा फार उपयोग होतो. आणि याच दृष्टीनें ३ अक्षरांनीं गण मोजण्याची वहिवाट छंद:शास्त्रकर्त्यांनीं घातली आहे ती युक्त आहे. हे गण पुढें दिल्याप्रमाणें आहेत:—

### साकी.

**म य र स त ज भ न** हे गण तेवीं **गा** गुरु **ला** लघु पाही ।
त्रिलोकिं हरि जें, वर्ण-वृत्ति बहु करिति तशी नवलाई ॥
येतां फिरफिरुनी । वृत्तें असंख्य कोण गणी ॥ १ ॥

तात्पर्य; ३ वर्णांच्या प्रस्ताराचीं लघु-गुरूंच्या अदलाबदलीनें जीं ८ प्रकारचीं रूपें सिद्ध होतात, त्यांस छंद:शास्त्रकर्त्यांनीं **म य र स त ज भ न** अशीं अनुक्रमें नांवें दिलीं आहेत. याशिवाय कित्येक वेळां आणखी गुरु व लघु अशा अक्षरांचें साहाय्य लागतें त्यास अनुक्रमें **ग** आणि **ल** अशा संज्ञा आहेत. प्रत्येक गणांचा लघु-गुरुक्रम कसा आहे हें ध्यानांत राहण्यासाठीं पुढें दिलेली साकी कंठगत करावी.

### साकी.

आदि, मध्य, शेवटीं क्रमें ये लघु **य र ता**, गुरु **भ ज सा** ।
सकलहि गुरु **मा**, सकल लघु **न** तो, **गा** गुरु **ल** लघू ऐसा ॥
कथिला क्रम तुज हा । त्यातें सुविचारें पाहा ॥ १ ॥

**भावार्थ:**—गणामध्यें ३ वर्ण असतात त्यांत क्रमानें आदि, मध्यें व शेवटीं ज्यांचे वर्ण लघु आहेत त्यांना त्याच क्रमानें **यगण, रगण** आणि **तगण** ह्मणावें. आणि त्याच क्रमानें ज्यांचे वर्ण गुरु आहेत त्यांस अनुक्रमें **भगण, जगण व**

**सगण** ह्मणावें. तसेंच ज्याचे सर्व वर्ण गुरु आहेत त्यास **मगण** व ज्याचे सर्व वर्ण लघु आहेत त्यास **नगण** असें ह्मणावें. व गुरु-लघु- वर्णदर्शक **ग** आणि **ल** हे वर्ण अनुक्रमें जाणवित. स्पष्टीकरणार्थ खालीं उदाहरण देतों, तें कंठगत करावें.

### साकी.

'य' **यशोदा** तशि 'र' **राधिका** ती आणि 'त' **तारापति** तो ॥
तोहि 'भ' **भारत** 'ज' **जनास** हि कीं पाहि 'स' **सुमती** बा तो ॥
जाण 'म' **मायावी** । 'न' **नयन** चिरसुख दावी ॥ १ ॥

**भावार्थः**—उघड आहे, खालीं गणांची रेषात्मकस्वरूपें, नांवें, उदाहरणें, स्वामी व फळ यांची माहिती ध्यानांत येण्यासाठीं एकत्र दिली आहे.

| गणांचीं नांवें:- | मगण, | यगण, | रगण, | सगण, | तगण, | जगण, | भगण, | नगण. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्वरूपें:- | SSS, | ISS, | SIS, | IIS, | SSI, | ISS, | SII; | III. |
| उदाहरणें :- | मायावी, | यशोदा, | राधिका, | सुमती, | ताराप, | जनास, | भारत, | नयन. |
| स्वामी:- | पृथ्वी, | जल, | अग्नि, | पवन, | अंबर, | सूर्य, | शशि, | स्वर्ग. |
| फळ:- | संपत्ति, | आयुष्य, | दाह, | परदेश, | शून्य, | रोग, | यश, | सुख. |

याशिवाय प्राचीन ग्रंथकारांनीं गणांचा शुभाशुभ विचार, संयोग, फळ वगैरे-संबंधीं अनेक तऱ्हेनें माहिती दिली आहे; तिचा तादृश उपयोग नसल्यानें तत्संबधीं येथें विवेचन केलें नाहीं.

वर्णसमवृत्तांत १ ते २६ अक्षरी वृत्तांस **साधारण** व त्यांपुढील वर्णसम-वृत्तांस **वर्णदंडक** ह्मणतात हें मागें सांगितलें आहे. त्यांपैकीं साधारणवृत्तांचे १ ते २६ पर्यंत जे प्रकार आहेत त्या प्रकारास एक मुख्य नांव असून लघु-गुरूंच्या अदलाबदलीनें प्रत्येकीं निरानिराळीं अनेक वृत्तें होतात व त्यांस शास्त्रकर्त्यांनीं निरानिराळीं नांवें दिलीं आहेत. खालीं वर्णसंख्या, लघुगुरूंच्या अदलाबदलीनें प्रत्येकीं कितीं वृत्तें होतात हें व त्यांचीं मुख्य नांवें यासंबंधीं माहिती दिली आहे.

| वर्णसंख्या. | प्रकार. | नांवें. | वर्णसंख्या. | प्रकार. | नांवें. |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | उक्ता. | १४ | १६३८४ | शक्करी. |
| २ | ४ | अत्युक्ता. | १५ | ३२७६८ | अतिशक्करी. |
| ३ | ८ | मध्या. | १६ | ६५५३६ | अष्टि. |
| ४ | १६ | प्रतिष्ठा. | १७ | १३१०७२ | अत्यष्टि. |
| ५ | ३२ | सुप्रतिष्ठा. | १८ | २६२१४४ | धृति. |
| ६ | ६४ | गायत्री. | १९ | ५२४२८८ | अतिधृति. |
| ७ | १२८ | उष्णिक्. | २० | १०४८५७६ | कृति. |
| ८ | २५६ | अनुष्टुभ्. | २१ | २०९७१५२ | प्रकृति. |
| ९ | ५१२ | बृहती. | २२ | ४१९४३०४ | आकृति. |
| १० | १०२४ | पंक्ति. | २३ | ८३८८६०८ | विकृति. |
| ११ | २०४८ | त्रिष्टुप्. | २४ | १६७७७२१६ | संस्कृति. |
| १२ | ४०९६ | जगती | २५ | ३३५५४४३२ | अतिकृति. |
| १३ | ८१९२ | अतिजगती. | २६ | ६७१०८८६४ | उत्कृति. |

---

## भाग ४ था.

## संख्यासूचक शब्दकोश.

परिभाषेंत (पृष्ठ ८ यांत) सांगितल्याप्रमाणें वृत्तलक्षणाच्या ओळींतील यति सुचविणारे संख्यावाचक शब्द व त्याचप्रमाणें उदाहरणाच्या श्लोकाच्या ३ ऱ्या ओळींतील (श्लेषात्मक रचनेनें अर्थ साधण्याकरितां योजिलेले) वृत्ताचा अक्षरसंख्या सुचविणारे शब्द नीट ध्यानांत रहावेत ह्मणून खालीं दोहावृत्तात्मक एक लहानसा कोश दिला आहे. तो कंठगत केल्यास प्रत्येक वृत्ताचें उदाहरण ह्मणून जो श्लोक दिला आहे त्यांतील श्लेषात्मक अंक ध्यानांत येतील व विविध माहितीहि पदरांत पडेल. एवढेंच नव्हे, ज्योतिष व वैद्यक या व अशा कांहीं ग्रंथांत या प्रकारची परिभाषा प्रसंगोपात् आली असून ती सलग, सार्थ व विस्तृतपणें दिलेली कोठें आढळत नाहीं; करितां या माहितीचा पुष्कळ उपयोग होईल.

## दोहा–वृत्त.

चंद्र, एक. भुज, अयन, पद, पक्ष, द्विज, दो, नेत्र ।
राम, ताप, गुण, तीन, ते त्रिपुटि, काल, हरनेत्र ॥ १ ॥
श्रुति, युग, विधिमुख, वर्ण, पथ, भक्त, पाद, पुरुषार्थ, ।
गुरु, तनु, वाक्, खनि, शब्द, घे अन्न चार चित्तांत ॥ २ ॥
प्राण, गव्य, शर, देवतरु, पांडव, कन्या, भूत ।
यज्ञ, इंद्रियें, गति, विषय, पंच अवस्था स्पष्ट ॥ ३ ॥
शास्त्र, राग, रस, चक्र, ऋतु, षट्पद, रिपु, वेदांग ।
प्रमाण, कर्महि, करण, गुह, सहा गणी या चांग ॥ ४ ॥
पाताल, स्वर, ताल, गिरि, लोक, अश्व, मुनि, वार ।
सिंधु, चिरंजिव, पुरि, अनिल, ईति, धातु, उच्चार ॥ ५ ॥
द्वीप, छंद, आणि रंग हे सप्त. अष्ट ते योग ।
भाव, सिद्धि, दिक्पाल, वसु, याम, लग्न, गण, भोग ॥ ६ ॥
दिग्गज, योगिनि, मूर्ति ते तवी प्रकृती बर्ग ।
अंक, रंध्र, भूखंड, निधि, भक्ति, ग्रह, नव नाग ॥ ७ ॥
दिशा, दशा, अवतार, दश दोष, तसा तो शेष ।
एकादश हर, चिंतितां पाप हरे निःशेष ॥ ८ ॥
मास, राशि, रवि, पुत्र, तप, घे द्वादश चित्तांत ।
त्रिदश, किरण, नदि, कांतिही प्रदोष सुखवा शांत ॥ ९ ॥
भुवन, रत्न, मनु, चतुर्दश, विद्या, इंद्रहि जाण ।
तिथी, पौर्णिमा, पंचदश मनीं सर्वदा आण ॥ १० ॥
चंद्रकला, शृंगारही षोडश हे संस्कार ।
सूक्ष्मतत्व बघ सप्तदश करि चित्तांत विचार ॥ ११ ॥
पुराण अष्टादश जयहि विंशति नखहि विकार ।
वृत्ताक्षरसंख्येंत बघ अनुसंधान विचार ॥ १२ ॥

वरील शब्दांत **चंद्र** याजबद्दल **शशि**, व **सूर्य** याजबद्दल **रवि** याप्रमाणें कोणत्याही एका शब्दाचा दुसरा पर्याय शब्द आला तरी चालतो, मात्र त्यापासून त्यांत गर्भित असलेल्या संख्येचा बोध झाला ह्मणजे झालें. वृत्ताक्षर-संख्या दर्शविण्यासाठीं प्रसंगोपात् एकाहून अधिक शब्द आले आहेत तेथें त्यांच्या बेरजेनें वृत्ताक्षरसंख्या जाणावी. कित्येक संख्यासूचक शब्दांपासून भिन्न भिन्न संख्यांचा एकाच वेळीं बोध होतो. जसें, **रस** या शब्दापासून ६ व ९ आणि **समुद्र** या शब्दापासून ४ व ७ या संख्यांचा बोध होतो. अशा ठिकाणीं संदेह न रहावा ह्मणून सोयीसाठीं कोशामध्यें जी एकच संख्या मानिली आहे तिचाच बोध घ्यावा. एक दोन ठिकाणीं कथाभाग साधण्यासाठीं शब्दार्थापासूनही संख्येचा बोध केला आहे पण अशीं स्थळें क्वचित् असून तीं लवकर ध्यानांत येतील अशींच आहेत. तथापि त्यांवर अंक टाकिले असल्यानें तेथें संदेह राहणार नाहीं.

संख्यासूचक शब्दांतील संख्यांचा बोध व्हावा व वाचकांना बहुश्रुतपणा यावा यासाठीं खालीं तत्संबंधीं स्पष्टीकरण केलें आहे.

१ **चंद्रः**— या शब्दापासून १ या संख्येचा बोध होतो.

२ **भुजः**—हात. **अयनः**—दक्षिणायन व उत्तरायण. **पदः**—चरण. **पक्षः**—शुक्ल व कृष्ण. **द्विजः**—ब्राह्मणादि ३ वर्ण व दांत. या शब्दांनीं २ या संख्येचा बोध होतो.

३ **रामः**—परशुराम, दाशरथीराम व बलराम. **तापः**—आधिभौतिक, आधि-दैविक व अध्यात्मिक. **गुणः**—सत्व, रज व तम. **त्रिपुटिः**—ध्येय, ध्याता व ध्यान वगैरे तीन अवस्था. **कालः**—भूत, भविष्य व वर्तमान. **हरनेत्रः**—शंकराला तीन डोळे आहेत. याशब्दांपासून ३ या संख्येचा बोध होतो.

४ **श्रुतिः**—( वेद ) ऋक्, यजुः, साम व अथर्वण. **युगः**—कृत, त्रेता, द्वापार व कलि. **विधिमुखः**—ब्रह्मदेवाला चार तोंडें आहेत. **वर्णः**—ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य व शूद्र. **पथः**—प्रज्ञानब्रह्म ( ऋग्वेदांतील ), तत्वमसि ( साम-छांदोग्यांतील ), अयमात्माब्रह्म ( अथर्वण ) आणि अहंब्रह्मास्मि (यजुःशाखा)

**भक्तः**-आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू व ज्ञानी. **पादः**-छंदाच्या चार चरणांपैकीं एक. **पुरुषार्थः**-धर्म, अर्थ, काम व मोक्ष. **गुरुः**-गुरु, परमगुरु, परात्परगुरु व परमेष्ठिगुरु. **तनुः**-स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण. **वाक्ः**-( वाणी ) परा, पश्यंति, मध्यमा व वैखरी. **खनिः**-जारज, स्वेदज, अंडज व उद्भिज. **शब्दः**-घोष, ध्वनि, नाद व ॐकार. **अन्नः**-भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य या शब्दांपासून ४ या संख्येचा बोध होतो.

५ **प्राणः**-प्राण, अपान, व्यान, उदान व समान. **उपप्राणः**-नाग ( जांभई देणें ), कूर्म ( शिंकणें ), कृकर ( भूक उत्पन्न होणें ), देवदत्त ( उचकी येणें ). घनंजय. ( शरीर फुगविणें ) **गव्यः**- दूध, दहीं, तूप, गोमय आणि गोमूत्र मिळून. **शरः**-कमळ, निळें कमळ, आम्रपुष्प, अशोकपुष्प व मल्लिकापुष्प हे मदनाचे पांच बाण होत. **देवतरुः**- मंदार, पारिजात, संतान, कल्पवृक्ष व हरिचंदन. **पांडवः**- धर्म, भीम, अर्जुन, नकुळ व सहदेव. **कन्याः**- अहिल्या, द्रौपदी, तारा, सीता व मंदोदरी. **भूतः**-पृथ्वि, आप, तेज, वायु व आकाश. **यज्ञः**- ब्रह्म, देव, पितृ, भूत व मनुष्य यांविषयीं यज्ञ. **इंद्रियेंः**- ज्ञानेंद्रियें ( मन, बुद्धि, कान, डोळे व त्वचा ) अथवा कर्मेंद्रियें ( हात, पाय, तोंड, शिश्न व गुद ). **गतिः**- ज्योतिषशास्त्रांत. **विषयः**- शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध. **अवस्थाः**- जागृति, स्वप्न, सुषुप्ति, तुरिया आणि उन्मनी. या शब्दांपासून ५ या संख्येचा बोध होतो.

६ **शास्त्रः**- व्याकरण, न्याय, ज्योतिष, वैद्यक, धर्म व अलंकार किंवा सांख्य, योग, न्याय, मीमांसा वगैरे. **रागः**-सहा मनोविकार. **रसः**- मधुर, कटु, कषाय, आम्ल, क्षार व तिक्त. **चक्रः**- आधार, लिंग, नाभि, हृदय, तालुमूल व ललाट. **ऋतुः**- वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद्, हेमंत व शिशिर्. **षट्पदः**- भ्रमर ( ह्यास सहा पाय असतात ). **रिपुः**- काम, क्रोध वगैरे सहा मनोविकारास ह्मणतात. **वेदांगः**- शिक्षा, कल्प, व्याकरण, छंद, ज्योतिष व निरुक्त. **प्रमाणः**- शब्द, अनुमान, उपमान, प्रत्यक्ष, अर्थापत्ति व अनुपलब्धि.

**कर्म**:– यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान व प्रतिग्रह. **करण**:—कर्ता, कर्म, करण, संप्रदान वगैरे. **गुह**:– कार्तिकस्वामी (ह्यास सहा तोंडें आहेत). या शब्दांपासून ६ या संख्येचा बोध होतो.

**७ पाताल**—अतल, वितल, सुतल, महातळ, रसातल, तलातल व पाताल. **स्वर**:—षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद. **ताल**:–सात ताल पुराणांत प्रसिद्ध आहेत. **गिरि**:—महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, गंधमादन, विंध्य व पारियात्र. **लोक**:—भूः (मृत्युलोक), भुवः (पृथ्वीपासून सूर्यापर्यंतचा भाग. येथें मुनि, सिद्ध वगैरे राहतात.) स्वः (स्वर्गलोक–स्वर्गमंडळापासून ध्रुवमंडळापर्यंतचा भाग), महः (सूर्यगोल व तेजस्वी जो भाग तो), जनः (येथें ब्रह्मदेवाचे पुत्र राहतात.), तपः (येथें तपस्वी लोक राहतात) आणि सत्य (येथें ब्रह्मा व ऋषि हे राहतात. हा भूर्वादि सहा लोकांच्या वर आहे). **अश्व**:—सूर्याच्या रथाला सात घोडे आहेत. **मुनि**:—कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि आणि वसिष्ठ; किंवा मरीचि, अत्रि, आंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि वसिष्ठ हे आकाशांत दृग्गोचर होणारे तारे. **वार**:—रवि, सोम वगैरे. **सिंधु**:—क्षार, क्षीर, दधि, घृत, इक्षुरस, मद्य व स्वादुजल. **चिरंजीव**:—अश्वथामा, बलि, व्यास, हनुमान्, बिभीषण, कृप व परशुराम. **पुरि**:—अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंती आणि द्वारका. **अनिल**:—(वायु) भूवायु, आवह, प्रवह, उद्वह, संवह, सुवह आणि परावह. **ईति**:–(अरिष्टें) अतिवृष्टि, अनावृष्टि, टोळ, उंदीरघुशी, स्वसैन्य, परसैन्य व कीटक यांपासून होणारा त्रास. **धातु**:—(शरीरांतील) रक्त, मांस, मज्जा, अस्थि, शुक्र, मेद आणि रस. **उपचार**:–(वैद्यकांत) पाचन, रेचन, क्लेशन, शमन, मोहन, स्तंभन आणि वर्धन. **द्वीप**:—जंबु, कुश, प्लक्ष, शाल्मली, क्रौंच, शाक व पुष्कर. **छंद**:– गायत्री, उष्णिक, अनुष्टुब्, बृहती, पंक्ति, त्रिष्टुप् आणि जगती. **रंग**:—तांबडा, निळा वगैरे. या शब्दांपासून ७ या संख्येचा बोध होतो.

८ **योगः**—यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि. **भावः**—( सात्विक ) स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, कंप, वैवर्ण्य, अश्रुपात व प्रलय. **सिद्धिः**—अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशिता आणि वशिता. **दिक्पालः**—शक्र ( आदित्य ), अनल ( वसु ) यम ( सूर्यपुत्र ), निर्ऋति ( रुद्र ), वरुण ( आदित्य ), अनिल ( वसु ), वैश्रवण ( कुबेर ), आणि ईश्वर ( रुद्र ). **वसुः**—धर, ध्रुव, लोम, विष्णु, अनिल, अनल, प्रत्यूष व विभावसु. **यामः**—आठ प्रहर. **लग्नः**—( विवाह ) ब्राह्म, गांधर्व, राक्षस, दैव, आर्ष, प्राजापत्य, शुल्क, आणि पैशाच. **गणः**—( वर्णवृत्तांत ) म य र स त ज भ न. **भोगः**—हे आठ प्रकारचे आहेत. **दिग्गजः**—ऐरावत, पुंडरीक, वामन, कुमुद, अंजन, पुष्पदंत, सार्वभौम व सुप्रतिक. **योगिनिः**—मंगला, पिंगला, धन्या, भ्रामरी, भद्रिका, उल्का, सिद्धा व संकटा. **मूर्तिः**—पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, सूर्य, चंद्र व सोमयाजी. **प्रकृतिः**—पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि व अहंकार. **वर्गः**—( औषधीसमूह ) ऋषभ, जीवक, मेद, महामेद, ऋद्धि, वृद्धि, काकोली व क्षीरकाकोली. या शब्दांपासून ८ या संख्येचा बोध होतो.

९ **अंकः**— ९ आंकडे. **रंध्रः**— दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, तोंड व दोन गुह्य इंद्रियें मिळून **भूखंडः**—भरत, किन्नर, हरि, कुरु, हिरण्मय, रम्यक्, भद्राश्व, केतुमाल व इलावृत्त. **निधिः**—महापद्म, पद्म, शंख, मकर, कच्छ, मुकुंद, कुंद, नीळ हे कुबेराचे नऊ द्रव्याचे सांठे आहेत. **भक्तिः**—श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन. **ग्रहः**—रवि सोम वगैरे. **नागः**—अनंत, वासुकी, शेष, पद्मनाभ, कंबल, शंखपाल, धृतराष्ट्र, तक्षक व कालिय. या शब्दांपासून ९ या संख्येचा बोध होतो.

१० **दिशाः**—दहा आहेत. **अवतारः**—मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बौद्ध व कलंकी. तसेंच दशा, दोष व क्षेप या शब्दांपासून १० या संख्येचा बोध होतो.

११ **हर ( रुद्र ):**—महादेव, वीरभद्र, शंभु, गिरीश, अजैकपात्, अहिर्बुध्न्य, पिनाकी, अपराजित, भुवनाधीश्वर, कपाली, आणि भव. या शब्दापासून ११ या संख्येचा बोध होतो.

१२ **मासः**—चैत्र, वैशाख वगैरे १२ महिने. **राशिः**—मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धन, मकर, कुंभ आणि मीन. **रविः**—विवस्वान्, अर्यमा, पुषा, त्वष्टा, सविता, भग, धाता, विधाता, वरुण, मित्र, शक्र, व उरुक्रम. **पुत्रः**—औरस, क्षेत्रज, दत्तक, कृत्रिम, गूढोत्पन्न, अपविद्ध, कानीन, सहोढ, क्रीत, पौनर्भव, स्वयंदत्त व शौद्र. **तपः**—तपाचा काल १२ वर्षे मानितात. या शब्दांपासून १२ या संख्येचा बोध होतो.

१३ **किरण, नदी, कांति व प्रदोष** या शब्दांपासून १३ या संख्येचा बोध होतो.

१४ **भुवनः**—सातलोक व सात पाताळें मिळून. **रत्नः**—लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, सुरा, धन्वंतरी, चंद्र, कामधेनु, ऊच्चैःश्रवा, अमृत, शंख, रंभा, ऐरावत, अवदशा आणि हालाहल. **मनुः**—स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम, तापस, रैवत, चाक्षुष, वैवस्वत, सावर्णि, दक्षसा०, ब्रह्मसा०, रुद्रसा०, देवसा०, इंद्रसा०, आणि धर्मसावर्णि. **विद्याः**—४ वेद, ६ वेदांगें, पुराणें, मीमांसा, न्याय, व धर्मशास्त्र हीं ४ मिळून १४ विद्या. **इंद्रः**—प्रत्येक मन्वंतरांत १ इंद्र असतो. या शब्दांपासून १४ या संख्येचा बोध होतो.

१५ **तिथि** व **पौर्णिमा** या शब्दांपासून १५ या संख्येचा बोध होतो.

१६ **चंद्रकलाः**—चंद्रास १६ कला असतात. **शृंगारः**—हे १६ प्रकारचे वर्णितात. **संस्कारः**—गर्भाधान, पुंसवन, अनवलोभन, विष्णुबलि, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, सूर्यावलोकन, अन्नप्राशन, चूडाकर्म, उपनयन, महानाम्न्य, समावर्तन, विवाह व स्वर्गारोहण. या शब्दांपासून १६ या संख्येचा बोध होतो.

१७ **सूक्ष्मतत्त्वः**—पंचकर्मेंद्रियें, पंचज्ञानेंद्रियें, पंचविषय, मन व बुद्धि मिळून १७ तत्वें. या शब्दापासून १७ या संख्येचा बोध होतो.

१८ पुराणः-ब्रह्म, पद्म, ब्रह्मांड, अग्नि, विष्णु, गरुड, ब्रह्मवैवर्त, शिव, लिंग, नारद, स्कंद, मार्कंडेय, भविष्य, मत्स्य, वराह, कूर्म, वामन व भागवत. व तसेंच जय या शब्दांपासून १८ या संख्येचा बोध होतो.

२० नखः-( ज्योतिषशास्त्रांत ) मनुष्यांचीं हातांपायांचीं बोटें. विकारः-बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, उत्पत्ति, विनाश, भय, अभय, अहिंसा, समता, संतोष, तप, दान, यश व अपयश. या शब्दां- पासून २० या संख्येचा बोध होतो.

याशिवाय अनेक संख्यासूचक शब्द आहेत. पण नित्य परिचयांत ते फारसे येत नसल्यानें तत्संबंधीं येथें विस्तारभयास्तव विवेचन केलें नाहीं.

---

## भाग ५ वा.

### वर्णसमवृत्तें. †

४ प्रतिष्ठा ( चतुर्वर्ण-४ अक्षरी-वृत्तें ).

१ कन्या ( म ग ).

ल०—मा गा कन्या ॥ १ ॥

उदाहरण.

**कन्या** तो ही । **मागे** पाही । धन्या **वाणी** । ही ऐकोनी ॥ १ ॥

**भावार्थः**-कोणा एका कन्येचें सुंदर भाषण ऐकून कोणी एकानें तिची मागणी केली.

---

† यांत १ ते ३ अक्षरी वृत्तें न देतां पुढें संक्षेपानें जीं वृत्तें वर्णन केलीं आहेत त्यांत दिलीं आहेत.

२ कला ( भ ग ).

ल०—भा ग कला ॥ १ ॥

उदाहरण.

ज्ञानकला । भाग भला । पंथ तरो । हाचि धरी ॥ १ ॥

भावार्थः—ज्ञानरूपकला असणें हें उत्तम असल्यानें त्याच्या प्राप्तीविषयीं यत्न कर.

५ सुप्रतिष्ठा (पंचवर्ण ५ अक्षरी वृत्तें).

३ हरी ( स ल ग ).

ल०— स ल गा हरी ॥ १ ॥

उदाहरण.

तुजसी हरी । सलगी करी । मन इंद्रियीं । सुख व्हावया ॥ १ ॥

भावार्थः—कवि ह्मणतो. 'हे हरि, मी मन व इंद्रियें यांना सुख होण्यासाठीं तुझ्याशीं भक्तिरूप सलगी करीत आहें.

४ हारी ( त ग ग )

ल०—ता गा ग हारी ॥ १ ॥

उदाहरण.

संतापहारी । तो गा गुणारी । भूतांसि देई । जो सौख्य पाही ॥ १ ॥

भावार्थः—जो सकल प्राणिमात्रांना सुख देतो अशा निराकार व संतापहरण करणाऱ्या प्रभूचें चिंतन कर.

६ गायत्री ( षड्वर्ण-६ अक्षरी-वृत्तें )

५ शशिवदना ( न य ) य. से.

ल० —शशिवदना न्या ॥ १ ॥

उदाहरण.

शशिवदना ही । नयि अनुनीहा । सुखरसें मानीं । पतिपादीं जाणी ॥ १ ॥

**भावार्थः**–ही चंद्रमुखी विनयी असूनही पतिचरणीं सर्वदा सुख मानिते.

**६ विद्युल्लेखा** ( म म ) य. शे.

**ल०**—मा मा विद्युल्लेखा ॥ १ ॥

उदाहरण.

विद्युल्लेखाकांति । **मा मोहें** देखे ती । ज्या **शास्त्रें** वानीती । चिंतोनी ती मूर्ति ॥

**भावार्थः**–ज्या ईशमूर्तीला ( विष्णूला ) शास्त्रें वर्णितात तिचें चिंतन करीत होत्साती लक्ष्मी विद्युल्लेखेप्रमाणें असणारी तिची दिव्य कांति पाहून मोहित झाली.

**७ उष्णिक्** ( सप्तवर्ण-७ अक्षरीं-वृत्तें ).

**७ मधुमति** ( न न ग ) य० शे०

**ल०**—मधुमति न न गे ॥ १ ॥

उदाहरण.

**मधुमति** सुखदा । **न नग**पति कदा ॥
**सुजनिं** विसरवी । तव पदिं विनवी ॥ १ ॥

**भावार्थः**—हे नगपति श्रीशंकरा सुखप्रद अशा सुबुद्धीचें सुजनाला विस्मरण करूं नको असें तुझ्या चरणीं मी विनवीत आहें.

**८ अनुष्टुब्** ( अष्टवर्ण- ८ अक्षरीं-वृत्तें ).

**८ विद्युन्माला** [ म म ग ग ].

**ल०**:— मा मा गा गा विद्युन्माला ॥ १ ॥

गर्जे **विद्युन्माला** पाही । **मा मागे गा** विश्रांती ही ॥
**हस्ती** शुंडीं फेंकी पाणी । जावें आतां कीं येथोनी ॥ १ ॥

**भावार्थ**:—कोणी एक आपल्या मित्रास ह्मणतो, गड्या ही विद्युन्माला मोठ्यानें कडकडाट करीत असून, दिग्गज आपल्या सोंडेनें पाणी फेंकीत आहे, तर आतां येथून जावें हें बरें.

९ माणवक ( भ त ल ग ) य. शे.

ल०—भा त ल गा माणवकं ॥ १ ॥

उदाहरण.

माणवकक्रीडित तें । भूतलिं गा नंदसुतें ॥
दाखवितां गोपगणां । हर्ष, भजे तच्चरणां ॥ १ ॥

भावार्थ:—नंदकुमार श्रीकृष्ण यानें केलेली अद्भुत अशी बालक्रीडा पाहून गोकुलवासी लोकांना फार आनंद होई. अशा त्या प्रभूच्या चरणांचें चिंतन कर.

१० मल्लिका (र ज ग ल) य. शे.

ल०—रा ज गा ल मल्लिका हि ॥ १ ॥

उदाहरण.

मल्लिका सुपुष्पमाळ । रोज गौळणी दयाळ ॥
कृष्णकंठिं भावयुक्त । अर्पुनी सुधन्य होत ॥ १ ॥

भावार्थ:—नित्यशः गौळणी मोगरीच्या फुलांची सुंदर माळ प्रेमभावानें दयाळू अशा श्रीकृष्णाचे कंठीं अर्पण करून धन्य होत असत.

११ प्रमाणिका ( ज र ल ग ) य. शे.

ल०— ज रा ल गा प्रमाणिका ॥ १ ॥

उदाहरण.

श्रुति प्रमाणिका मनीं । जरी लगेंच जाणुनी ॥
सुसिद्धि होय वागतां । जगांत तूज तत्वता ॥ १ ॥

भावार्थ:—प्रमाणभूत हा वेदार्थ ध्यानांत आणून जर वागशील तर खरोखर तुला यशःसिद्धि होईल.

## ९ बृहती–(नववर्ण–९अक्षरी–वृत्तें.).

### १२ मणिमध्या—( भ म स ) य० शे०.

ल०—ही मणिमध्या भा म सि वा ॥ १ ॥

उदाहरण.

जैं **मणिमध्यें** दिव्य हिरा। भीम सुशोभे भूपि खरा ॥
कीर्तिनिधिं प्रख्यात पहा। क्षत्रनभीं सद्भानु अहा ॥ १ ॥

**भावार्थ**–कीर्तिरूपी प्रख्यात निधि व क्षत्रियरूपी आकाशांतील दैदिप्यमान सूर्य असा भीम, रत्नांमध्यें जसा दिव्य हिरा शोभावा तसा सर्व राजांमध्यें शोभता झाला.

### १३ सुलोचना (न ज र) य० शे०.

ल०—न ज र पदीं सुलोचना ॥ १॥

उदाहरण.

भुजगसुता **सुलोचना**। न जरि हि देवअंगना ॥
पतिपदिं नित्य रंगते। नच गणि जाति शील तें ॥१॥

**भावार्थ**—नागकन्या सुलोचना ही जरी देवकन्या नसली तथापि आपल्या पतीच्या चरणीं एकनिष्ठ आहे. यावरून शील हें जातीवर असत नाहीं हें उघड आहे. (प्रस्ताराचे नियमान्वयें हें नवीन वृत्त रचिलें आहे).

### १४ बिंब (न स य) य० शे०.

ल०—न स य पदिं बिंब तेव्हां ॥ १ ॥

उदाहरण.

रुचिर शशिबिंबकांति। न सयि बव देत शांति ॥
दुःखनिधिं कधीं पतीतें। बाविन नच धीर मातें ॥ १ ॥

**भावार्थ**—कोणी एक स्त्री आपल्या सखीस ह्मणते. हे सखि सुखाचा ठेवा असा ( प्रवासांत असलेला ) माझा पति मी केव्हां पाहिन बरें? त्याच्या विरहानें ही रम्य अशी चंद्रकांति फारच तापदायक होत आहे.

१५ मुद्रिका ( र न र ) य. शे.

ल०—रा न रा बघ सुमुद्रिका ॥ १ ॥

उदाहरण.

**मुद्रिका** बघुनि ती पुढें । **रे नरा** धरणिजा रडे ॥
चिंति **रामपद** वर्णुनी । पाहि ये चहुंकडे कुणी ॥ १ ॥

**भावार्थः**—हे मनुष्या! [ श्रीरामनामांकित अशी ] आंगटी आपल्यापुढें पडलेली पाहतांच श्रीरामवियोग असह्य होऊन जानकी रडूं लागली आणि त्याचे पाय मनांत आठवून ही आंगटी घेऊन येणारा कोण असावा असें चहूंकडे निरखून पाहूं लागली.

१० पंक्ति ( दशवर्ण—१० अक्षरी—वृत्तें ).

१६ चंपकमाला ( भ म स ग ) य. शे.

ल०—भा म स गा तें चंपकमाला ॥ १ ॥

उदाहरण.

नित्य सुगंधी **चंपकमाला** । **भीम** सुगानें अर्पि विभूला ॥
**भाव पहा** तो पाहुनि भारी । सत्सुख दे त्या कृष्ण मुरारी ॥ १ ॥

**भावार्थ**—भीम नित्य, स्तवनपूर्वक सुगंधयुक्त अशी चंपकमाला प्रभूला अर्पण करी. त्याचा तो सद्भाव पाहून मुरारी श्रीकृष्ण त्याला उत्कृष्ट सुख देतां झाला.

१७ हंसी ( म भ न ग ) य. ४, ५, ६.

ल०— भो रा हंसी म भ न ग युता ॥ १ ॥

उदाहरण.

लागे हंसी नळपदिं झणीं । मा भी ने गे स्वपति सुगुणी ॥
बोले राजा सुखपद गणी । हंसी तेव्हां स्तवन करुनी ॥ १ ॥

भावार्थः—( आपल्या पतीस–कलहंसास नळानें धरिलें आहे हें पाहून ) हंसी त्याच्या पाया पडूं लागली, तेव्हां राजा तिला ह्मणाला हे सुगुणी भिऊं नको तूं आपला पति घेऊन जा. तेव्हां ती त्याची स्तुति करित होत्साती सुख मानिती झाली.

१८ कामदा ( र य ज ग ) य. ५,५.

ल०—रा य जा ग दोबांणिं कामदा ॥ १ ॥

उदाहरण.

कामदा प्रभूकीर्ति ऐकुनी । राय जागृती ठेवि चिंतनीं ॥
भाव तत्पदीं राखि, तारि तो । दीनबंधु जो क्लेश वारितो ॥ १ ॥

भावार्थ—हे राजा मनोवांच्छितपूर्वक अशी प्रभूकीर्ति श्रवण करून तच्चिंतनांत दक्ष रहा, त्याच्या चरणीं भाव ठेव, जो दीन जनांचा कैवारी क्लेश निवारण करितो तोच तुला तारील.

१९ मत्ता ( म भ स ग ) य. ४, ६.

ल०—चौ सीं छिन्ना म भ स ग मत्ता ॥ १ ॥

उदाहरण.

चित्तोर्मी ह्या वदुं किति मत्ता । मा भू संगें ताशि करिं सत्ता ॥
त्याहीमाजी तरुणदशा ती । औद्धत्याला मग नच रीति ॥ १ ॥

भावार्थः—अगोदर चित्तलहरी उच्छृंखल, त्यांत लक्ष्मी व राज्य यांची जोड, हातांत सत्ता, आणि त्यांतही तरुणदशा मग औद्धत्याला मर्यादा कशी राहील बरें?

२० **मनोरमा** ( न र ज ग ) य. शे.

ल०—न र जगा पहा मनोरमा ॥ १ ॥

उदाहरण.

कृति **मनोरमा** अशी जरी । **नर जगीं** अहा न तो करी ॥
जननिशीण **दोषं**[९] ये जया । बुध न मानिती कदा तया ॥ १ ॥

भावार्थः—मनुष्यानें जन्मास येऊन योग्य असें वर्तन न केलें तर त्यानें मातेला प्रसववेदनेचा व्यर्थ शीण मात्र दिला असा त्याला दोष येऊन ज्ञाते लोक केव्हांही मानणार नाहींत.

२१ **दीपकमाला** [ भ म ज ग ] य. शे.

ल०:—दीपकमाला भा म जा ग जैं ॥ १ ॥

उदाहरण.

**दीपकमाला** लावुनी बरा । **भीम जगीं** तो उत्सवा करी ॥
सर्व **दिशीं**[१०] जो राज्य जोडुनी । स्थापित सत्ता शौर्य दावुनी ॥ १ ॥

भावार्थः—भीमानें आपल्या पराक्रमानें सर्वही दिशांना राज्य जोडून आपली सत्ता स्थापित केली, आणि स्मरणार्थ दीपोत्सव केला.

२२ **मयूरी** [ म म म ग ] य. ४, ६.

ल०:—मा मा मा गा बर्हीं चौ सा छिन्ना ॥ १ ॥

उदाहरण.

श्रीशा शोभा **बर्हीं**पिच्छें देतीं । **मा मा मागे** स्पर्धी येना श्री ती ॥
कंसा ऐसा कां होसी दिङ्[११]मूढ । छद्में सिद्धी ना तो सेवी गूढ ॥ १ ॥

भावार्थः—हे कंसा त्या श्रीकृष्णालाच मयूरपिच्छें शोभतात. तूं त्याची मूढपणें स्पर्धा न करितां कापट्यानें यश येत नसतें हें ध्यानीं धरून त्या गूढ अशा परमात्म्याची भक्ति कर.

## ११ त्रिष्टुप् ( एकादश वर्ण-११ अक्षरी-वृत्तं ).

### २३ ललित [ र ज स ल ग ] य. ५।६.

ल०:—रा ज सा ल गा ललित पंचें र्सी ॥ १ ॥

उदाहरण.

ऐकुनी प्रभू ललितवृत्त तें । राजना लगेच मन अर्पितें ॥
हेतु सिद्धि तो सुगुण लाहुनी । होय केधवां झुरत रुक्मिणी ॥ १ ॥

**भावार्थः**—भीमककन्या रुक्मिणी श्रीकृष्णाचा मनोहर वृत्तांत ऐकून त्याला आपलें मन अर्पिती झाली आणि तो परमात्मा आपल्याला कधीं प्राप्त होईल म्हणून झुरूं लागली.

### २४ इंद्रवज्रा [ त त ज ग ग ] य. शे.

ल०:—ता ता ज गा गा पदिं इंद्रवज्रा ॥ १ ॥

उदाहरण.

जों इंद्रवज्रा धरिना कराला । तों ते जगीं गा छळिती जनाला ॥
उन्मत्तखोणी गिरिनाश जेव्हां । त्या इंद्रवज्रां सुखि लोक तेव्हां ॥ १ ॥

**भावार्थः**—जोंपर्यंत इंद्रानें आपल्या हातीं भयंकर वज्र धरिलें नव्हतें तोंपर्यंत ते उन्मत्त झालले पर्वत लोकांना फार त्रास देत होते; परंतु त्या इंद्रवज्रानें त्यांचा नाश झाल्यावर लोक सुखी झाले.

### २५ उपेंद्रवज्रा [ ज त ज ग ग ] य० शे०.

ल०: — ज ता ज गा गा हि उपेंद्रवज्रा ॥ १ ॥

उदाहरण.

उपेंद्रवज्रें वध राक्षसां तो । जिणो जगीं गा नच ठेवितां तो ।
रणांत ये रावण रुद्रघोषें । करींद्रसा चाऊत सावकाशें ॥ १ ॥

भावार्थः–श्रीराम जेव्हां आपल्या वज्रानें राक्षसांचा वध करूं लागला तेव्हां मोठ्यानें गर्जना करीत व माजलेल्या हत्तीप्रमाणें सावकाश डुलत असा रावण रणांगणीं येतां झाला.

२६ शालिनी [ म त त ग ग ] य० ४-७.

ल०:— मा ता ती ग्गा शालिनी वेदें लोकीं ॥ १ ॥

उदाहरण.

धन्या जीची शालिनी चित्तवृत्ति । माता तीगा गंभिरा सत्वमूर्ति ॥
बाळातें जी सौख्यखाणी त्रिलोकीं । मातें ऐसी देवता नाहिं लोकीं ॥१॥

भावार्थ–कोणी मनुष्य आपल्या मित्रास ह्मणतो कीं, बाबा, जिची चित्तवृत्ति उदार, केवळ सत्वाची गंभीर मूर्ति आणि मुलांना जी सौख्याची खाण अशी आई मोठी धन्य होय. अहाहा! आईसारखें या जगांत दुसरें दैवत नाहीं.

२७ दोधक [ भ भ भ ग ग ] य. शे.

ल०:— दोधक तीन भ दोन ग येतां ॥१॥

उदाहरण.

कृष्ण सदोध कदंबतळीं तो । का त्रयभागें गुणें सुखवीतो ॥
भक्तजनां बहु कौतुकशाली । गोपशिशूंसह जो करि केली ॥ १ ॥

भावार्थ–तिन्ही लोकांना सुख देणारा व भक्तांना अनेक लीला दाखविणारा श्रीकृष्ण ( गोकुळांत यमुनातटीं ) गाई व वासरें घेऊन गवळ्यांच्या मुलांसह कदंबवृक्षाखालीं क्रीडा करीत असे.

२८ रथोद्धता [ र न र ल ग ] य० शे०.

ल०:—रा न रा ल ग रथोद्धता तरा ॥ १ ॥

उदाहरण.

धूळि थोर पसरे रथोद्धता । रे नरा लगबगें निघे अतां ॥
जानकीश (ईश) अजि ये वनांतुनी । लोकबंधु नयनीं बघूं क्षणीं ॥१॥

**भावार्थ**--कोणी एक ( अयोध्यानगरवासी जन ) दुसऱ्यास म्हणतो, आज सीतापति श्रीराम वनांतून यावयाचा असल्यानें त्यास पाहण्यास जाणाऱ्या लोकांच्या रथांनीं उधळलेली धूळ केवढी पसरलेली आहे पहा. तर हे मनुष्या लवकर जाऊन तो लोकबंधू डोळ्यांनीं पाहूं चल.

२९ **स्वागता** ( र न भ ग ग ) य० ७, ४.

ल०:— स्वागताचरणिं रा न भ गा गा ॥ १ ॥

उदाहरण.

**स्वागतार्थ** सुख तें जनचित्ता। **रानिं भोगगति** भोगुनि **येतां** ॥
**रामचंद्र** उदयाद्रि ( अद्रि ) सुखावें। लोकसिंधु भरती बहु पावे ॥ १ ॥

भावार्थः—वनवासभोग संपून परत आयोध्येस (श्रीराम) आले असतां त्यांचें स्वागत करण्यास लोकांना फार सुख वाटलें. एवढेंच नव्हे, रामरूपी चंद्र उदयपर्वतावर प्रगट झालेला पाहून लोकरूपी सिंधूस मोठी भरती आली.

३० **विलासिनी** ( ज र ज ग ग ) य० शे०.

ल०—विलासिनी ज रा ज गा ग येतां ॥ १ ॥

उदाहरण.

**विलासिनी** स्थिती न योग्य बा ही । **जरी जगीं गुणें** मिळे रमा ही ॥
**धरीच एक शब्द** हा **प्रमाण** । **कुणी न चंचला रमेसमान** ॥ १ ॥

**भावार्थः**— बाबारे यद्यपि तुला तुझ्या गुणाच्या योगानें ही लक्ष्मी प्राप्त झाली आहे, तथापि ही विलासिनी स्थिति केव्हांही बरी नव्हे, लक्ष्मीसारखी चंचल कोणीच नाहीं हा माझा शब्द प्रमाण मान.

३१ **मौक्तिकमाला** ( भ त न ग ग ) य० ५, ६.

ल०—भा त न गा गे मौक्तिकमाला ॥ १ ॥

उदाहरण.

**मौक्तिकमाला** असुनि गळां ती । **भीति नगीं गे** काशि न तुला ती ॥
येरु वदे तैं मज **शिव** भोळा । रक्षिल चिंता, अघ जगपाळा ॥ १ ॥

भावार्थः— कैलासपर्वतीं शिवदर्शनार्थ जाणाऱ्या कोणा स्त्रीस तिची सखी ह्मणते गडे, त्या पर्वतावर ही मौक्तिकमाला जवळ असल्यानें तुला भीति कशी वाटत नाहीं! तेव्हां ती उत्तर करितेः— मला तो श्रीशिवच रक्षण करील. त्या जगपालाला त्याची काळजी आहे.

३२ **सुभद्रिका** ( न न र ल ग ) य० शे०.

**ल०—न न र ल गिं सुभद्रिका पहा ॥१॥**

उदाहरण.

न समजुनि **सुभद्रिकागती । न नर लगबगें** त्यजी मती ॥
विबुधजनपथा मनीं धरी । त्यज कुमति सख्या न ती बरी ॥ १ ॥

भावार्थः—चांगल्या गोष्टीचा शेवट कसा गोड होतो हें न पाहून बाबारे तूं लगबगीनें बुद्धिभ्रष्ट होऊं नको. सज्जनप्रणीत मार्गानें जा. वाईट बुद्धीनें हित होत नसल्यानें तिचा त्याग कर.

३३ **भ्रमरविलसिता** ( म भ न ल ग ) य० ४, ७.

**ल०—मा भ्रा ला गा भ्रमरविलसिता ॥ १ ॥**

उदाहरण.

पाहोनी त्या **भ्रमरविलसिता । मा भी नेली गजगमनि** अतां ॥
प्राज्ञा मी पौरवें जॅनिं असतां । कोणा मुग्धा छळणिं मुनिसुता ॥ १ ॥

भावार्थ—( शकुंतला भोंग्याच्या त्रासानें भ्यालेली पाहतांच हीच वेळ पुढें होण्यास बरी आहे असें पाहून दुष्यंत पुढें होऊन ह्मणतो, ) अगे गजगामिनी त्या भोंग्याच्या चेष्टेला पाहून तूं आतां भिऊं नको. त्यास मारून तुझी भीति नाहींशी

केलीच पहा. मी पौरव राजा प्रत्यक्ष विद्यमान असतां भोळ्या अशा मुनि-कन्यांना त्रास देण्यास कोणाची प्राज्ञा आहे?

१२ जगती ( द्वादशवर्ण १२ अक्षरी -वृत्तें ).

३४ सारंग ( ४ तगण ) य० शे०.

ल०—ता चार येतांचि सारंग तूं जाग ॥ १ ॥

उदाहरण.

सारंग बैसोनि आम्रावरी जाण । तो चारें खाई सुखें तें करी पान ॥
जें आळवी पंचमा सुस्वरें गान । राहे न त्या ऐकतां लेशही भान ॥१॥

भावार्थ—हा कोकिल आम्रवृक्षावर बसून संतोषानें चारा खातो, पाणी पितो. ज्यावेळीं तो सुस्वर असा पंचमालाप काढून गायन करितो त्यावेळीं तें ऐकतांना लेशही भान राहत नाहीं.

३५ मंदाकिनी ( न न र र ) य० ७, ५.

ल०—न न र र मुनि वागि मंदाकिनी ॥ १ ॥

उदाहरण.

अघुनिहि अवनारि मंदाकिनी । न नर रुपवयीं गडे मोहुनी ॥
धरुनि पथें तिचा सुयोगीं झणी । वश करि सखया जलीं मज्जुनी ॥१॥

भावार्थ—हे मनुष्या पापनाशक अशी गंगा नदी वाहत असतां तूं रूप अगर वय याचा विचार करून मोहांत पडूं नकोस, बाबा तिचा मार्ग धर, आणि तिच्या स्नानानें पवित्र होतमाता चित्तशुद्ध्यर्थ योगाभ्यास कर.

३६ भुजंगप्रयात ( ४ यगण ) य० ६, ६.

ल०—य चौ; शास्त्र रागें भुजंगप्रयातं ॥ १ ॥

उदाहरण.

भुजंगप्रयातोपम बुद्धि सोडी । यशा श्री सख्या चौगुणें चित्तिं जोडी ॥
सुमार्गें सदां वर्ततां सिद्धि होई । सुधा सेवितां सांग कां मृत्यु येई? ॥१॥

भावार्थ—बाबा ही नागमोडी सारखी बुद्धि सोडून यशस्वी बुद्धि चौपटीनें चित्तांत धर. सन्मार्गानें वागतांना यश आलेंच पाहिजे. अरे अमृतपान केल्यावर मरण कसें येईल सांग पाहूं?

३७ वंशस्थ (ज त ज र) य० शे०.

ल०—पहा सु वंशस्थचि कीं ज ता ज रा ॥१॥

उदाहरण.

सुधन्य वंशस्थचि पार्वतीसती। जनीं जरी श्रीशिव पाहि मानि तीं ॥
पतीस भावें तनु अर्पि सेवुनी। पतिव्रतारीति अशीच हो जनीं ॥ १ ॥

भावार्थ—ही पार्वती सुकुलोत्पन्न असल्यानें आपला नवरा जरी गोसावडा असला तरी त्यास आनंदानें मानून व त्याची सेवा करून भावयुक्त त्यास आपला देह अर्पण करिते. लोकांमध्यें पतिव्रतेची रीति अशीच असते.

३८ द्रुतविलंबित (न भ भ र) य० शे०.

ल०—द्रुतविलंबित जाण न भा भ रे ॥ १ ॥

उदाहरण.

द्रुतविलंबित कांहिं न हें कळे। नभिं भरे घन तो दिसतो गळे ॥
रवि दडे तम अंजनसें भरें। चहुंकडे, तरि जाउं गृहा त्वरें ॥ १ ॥

भावार्थ—आकाशांत पर्जन्याचे ढग आले असून पाऊस आतां अगर थोड्या अवकाशानें लागेल याचा भरंवसा नाहीं. ढगांत सूर्य दडला असून चहूंकडे काजळाप्रमाणें काळोख पसरला असल्यानें घराला लवकर जाणेंच योग्य. तर जाऊं चल.

३९ प्रियंवदा (न भ ज र) य० ४, ४, ४.

ल०—न भ ज रा प्रति पदें प्रियंवदा ॥ १ ॥

उदाहरण.

सतत वाणि करि ही **प्रियंवदा** । **न भज रे** खलजनांसि तूं कदा ॥
जरि छळे [१२]**रविस केतु** तो अहा । तरि न सोडित कधीं प्रभा पहा ॥ १ ॥

**भावार्थ**—तूं सर्वदा मधुर वाणी कर, खल जनांची संगति केव्हांही धरूं नको. जरी केतु सूर्यास छळतो तरी तो आपली कांति टाकित नाहीं. हें ध्यानांत ठेव.

### ४० इंद्रवंशा ( त त ज र ) य० शे०.

**ल०**—ती इंद्रवंशा त त जा र पादिं जैं ॥ १ ॥

उदाहरण.

जो **इंद्रवंशा** ध्वज वीर अर्जुन । **ता ता जरी** इच्छिसि तत्सवें रण ॥
रे **सूतपुत्रा** [१२] **शलभा** वृथा अहा । त्या पार्थदीपीं पतसी पळे पहा ॥१॥

**भावार्थ**—( शल्य कर्णास ह्मणतो ) इंद्रवंशाला ध्वजभूत असा जो वीर अर्जुन त्यावरोबर बाबा तूं जर युद्धाची इच्छा करतोस तर हे सूतपुत्रा शलभा त्या पार्थरूपी दीपावर फुकट उडी घेतोस असेंच ह्मटलें पाहिजे. बाबा ऊठ आणि लवकर पळ.

### ४१ तोटक ( ४ सगण ) य० शे०.

**ल०**—स चतुष्टयसंगति तोटक तें ॥१॥

उदाहरण.

हरिचिंतन **तोटक** होय जरी । सुचतुष्टय अर्थहि देइ तरी ॥
**रवि** [१२] सानहि दीपित विश्व करी । **गुण आकृतिमाजि न गोष्ट खरी** ॥१॥

**भावार्थ**—रवि जरी लहान असला तथापि तो जसा सर्व विश्व प्रकाशित करितो. तद्वत श्रीहरिचिंतन जरी थोडेंच घडलें तथापि तें धर्म, अर्थ, काम व मोक्ष या सुंदर अशा अर्थचतुष्टयास प्राप्त करून देतें यावरून "गुण हा आकृतिमानावर असत नाहीं हेंच खरें."

### ४२ जलोद्धतगती ( ज स ज स ) य० ६, ६.

**ल०**—जलोद्धतगती ज सा ज स रसें ॥१॥

उदाहरण.

**जलोद्धतगती** मिळे गिरिहुनी । **जसी जिस,** तसी वहे बघ झणीं ॥
तयांत यमुनागती भालि **जनीं** । जिचा सुसहवास कृष्णचरणीं ॥ १ ॥

**भावार्थ**—जलानें उद्धत अशा अनेक नद्या पर्वताहून आपापल्यागतीनें वाहतात. त्यांत श्रीकृष्णपादस्पर्शानें पुनीत झालेली 'यमुना' धन्य होय.

४३ **स्रग्विणी** ( ४ रगण ) य० शे०

**ल०**—चौ र पादीं पहा स्रग्विणी शोभते ॥ १ ॥

उदाहरण.

**स्रग्विणी** श्रीहरीमूर्ति भामे घरीं । **चौर**दृष्टी बघे रुक्मिणी सुंदरी ॥
होय **संताप ये राग** तात्**काल** तो । **भाव सापत्न कोणा रुचे स्त्रीस** तो ॥

**भावार्थ**—माला धारण केलेली अशी श्रीहरिमूर्ति सत्यभामेच्या येथें आहे असें रुक्मिणीनें न्याहाळून पाहतांच तिला राग आला व तात्काल ती संतप्त झाली. बरोबरच आहे "सापत्नभाव कोणा स्त्रीला खपेल काय?" कधींही नाहीं.

४४ **वैश्वदेवी** ( म म य य ) य० ५, ७.

**ल०**—कन्यो लोकीं मा मा य या वैश्वदेवी ॥१॥

उदाहरण.

एका विष्णूची भक्ति ही **वैश्वदेवी** । **मायाद्वैताला*** सारुनी चित्तिं ठेवी ॥
पावे अन्यातें **शास्त्रही** दे **प्रमाण** । **ये सिंधूमाजीं जैं नदीतोय जाण** ॥

**भावार्थ**—ज्याप्रमाणें समुद्रामध्यें नदीच्या पाण्याचा समावेश होतो, त्याप्रमाणें **वसुधैवकुटुंबकम्** अशा तऱ्हेची एका विष्णूची भक्ति केली असतां ती इतर देवांनाही पावते; असें शास्त्रसुद्धां प्रमाणपूर्वक सांगत असल्यानें तूं मायामोहाला दूर करून त्याची भक्ति कर.

* [ मायाद्वैत, मगण व यगण दोन दोन म्हणजे म म य य गण हा वृत्तार्थ. अर्थपक्षीं मायामोह. ]

४५ **मालती** ( न ज ज र ] य० ५, ७.

**ल०**— शरैं मुँनिनें न ज जा र मालती ॥ १ ॥

उदाहरण.

बघुनि लता डुलतां सुमालती । निज जरि हेतुहि गुप्त राखि ती ॥
गुणनिधि पाहिन मी कधीं पती । तरुवरि नेइ मनोज्ञ वायु ती ॥ १

भावार्थः—मी गुणनिधि व अनुरूप असा पति कधीं पाहीन असा आपला हेतु जिनें गुप्त ठेविला आहे अशी मालती लता डुलतांना पाहून मनोगत जाणणारा वायु तिला तरुसंनिध नेतां झाला.

४६ **यूथिका** ( र न भ र ) य० ३, ९.

**ल०**—रांम, भक्ति र न भा र हि यूथिका ॥ १ ॥

उदाहरण.

यूथिकापरिमळें सुख होतसे । रानिं भार तिजला बहु येतसे ॥
कोकिलागण तसा रमवी स्वनें । दे वसंत सुख, तापहि दूर ने ॥ १ ॥

भावार्थ—ह्या जुईला बागेमध्यें मोठा बहार आला असून तिच्या परिमळानें सुख होतें, कोकिलेचा पंचम स्वर लोकांना रमवितो, आणि वसंत सुख देऊन ताप दूर नेतो.

१३ अतिजगति ( त्रयोदशवर्ण-१३ अक्षरीं-वृत्तें ).

४७ **प्रभावती** ( ज भ स ज ग ) य० ४, ९.

**ल०**—श्रुति ग्रहें ज भ स ज गा प्रभावती ॥ १ ॥

उदाहरण.

मधुस्वनें रमवुनिया प्रभावती ।
जि भूस जागवि सकला सुखें अति ॥
सुराग आळवि किति सुस्वरें अहा ।
[illegible]रीं धरोनि तिज सुरर्षि तो पहा ॥ १ ॥

**भावार्थ**—जिच्या मधुर नादानें सर्व लोकांना झोंपेचा विसर पडतो अशी ती प्रभावती (वीणा) हातीं घेऊन देवर्षि नारद सुस्वरानें राग आळवित आहे पहा.

४८ **चंद्रिका** (न न त त ग) य० ७, ६.

ल०–सँगिरि रँस न ना ता त गा चंद्रिका ॥ १ ॥

उदाहरण.

धवल रुचिर ही **चंद्रिका** ये जरी ।
**ननु तति गमते** ती सुमांची बरी ॥
**स्वगुण** विसरुनी **भृंगँ** गुंजारँव ।
करि नलिनसुधापान हर्षें नव ॥ १ ॥

**भावार्थ**—परमरम्य व शुभ्र असें चांदणें पडलें असतां ही पुष्पपंक्ति किती शोभत आहे बरें! त्या प्रशांत चांदण्यांत भ्रमर आपला गुंजारव बंद करून हर्षभरानें फुलांतील मधुप्राशन करण्यांत गुंग होतो आहे पहा.

४९ **मंजुभाषिणी** (स ज स ज ग) य० ५, ८.

ल०—सु ज सा ज्ग वाणँ वर्तु मंजुभाषिणी ॥ १ ॥

उदाहरण.

रसना गड्या करुनि **मंजुभाषिणी** ।
**सु जसा जगीं** विमल हो तसा मनीं ॥
**जँनिं** मित्र होति **रिँपु** मंजुभाषणीं ।
गज शांत होइ बघ मत्तही क्षणीं ॥ १ ॥

**भावार्थ**—बाबारे ही तुझी वाणी मधुर करून तूं अंतर्बाह्य चांगला हो. या मधुर भाषणाच्या योगानें शत्रु आपले मित्र होतात. फार काय, माजलेले हत्तीही शांतपणें डुलूं लागतात हें ध्यानीं ठेव.

५० **प्रहर्षिणी** ( म न ज र ग ) य० ३, १०.

ल०—त्रैदोषैं म न ज र गा प्रहर्षिणी ती ॥ १ ॥

उदाहरण.

पाही श्रीजनकसुता **प्रहर्षिणी** ती ।
**मानी जी** रघुपतिमूर्ति नित्य चित्तीं ॥
कांतारीं रिघुनिहि **ईशपायें** सेवी ।
**धन्या ही कुलवधुरीति बा पहावी** ॥१॥

**भावार्थ**—जी श्रीराममूर्तींचें ध्यान आपल्या मनांत नित्य करिते आणि हर्ष-युक्त होत्साती वनामध्येंही पतिबरोबर जाऊन त्याच्या सेवेंत दक्ष राहते. अशी जनकसुता सीता किती हर्षयुक्त आहे पहा.

५१ **मत्तमयूरी** ( म त य स ग ) य० ४, ९.

ल०—चौं अंकीं मा ता य स गा मत्तमयूरी ॥ १ ॥

उदाहरण.

कां हा टाहो फोडिसि तूं **मत्तमयूरी** ।
**मा तोयासी गाउं** गडे चित्तिं विचारी ॥
**पंचप्राणां तापं** कशाला वद देसी ।
गे ही वेणी, मेघ नव्हे मानि वचांसी ॥ १ ॥

**भावार्थ**—हे मयूरी तूं हा ढग आहे असें मानून पाण्याकरितां टाहो फोडूं-नकोस. गडे हा मेघ नसून कुंतल कलाप असल्यानें आपल्या जिवाला उगीच त्रास कां करून घेत्येस?

५२ **विभावरी** ( न भ ज ज ग ) य० शे०.

ल०—गणि तुवां न भ ज जा ग विभावरी ॥ १ ॥

उदाहरण.

सुखि विधूदयिं असोनि विभावरी ।
न भुज जी गणुनि दे इतरां करीं ॥
पतिविणें न गणती ललनागती ।
त्यजुनि पीयुष कुणा विष आस ती? ॥ १ ॥

भावार्थ—चंद्रोदयीं ही रात्र प्रसन्न असून त्यावांचून ती इतरास मानीत नाहीं. बरोबरच आहे! स्त्रियांना पतीवांचून गति नाहीं असेंच शास्त्र सांगतें. अहो! अमृत सोडून विषाची इच्छा कोण करील बरें?

१४ शक्करी ( चतुर्दशवर्ण--१४ अक्षरीं-वृत्तें ).

५३ **वसंततिलका** ( त भ ज ज ग ग ) य० शे०.

ल०-होई वसंततिल्का त भ जा ज गा गें ॥ १ ॥

उदाहरण.

जेवी वसंत, तिलकापरि या ऋतूंत ।
तो भोज जे गगनकीर्ति अशा प्रभूंत ॥
यत्ख्याति होय विमला भुवनींत तूर्ण ।
दातृत्वसिंधु जणु हा बुधचंद्रिं पूर्ण ॥ १ ॥

भावार्थ—ज्याप्रमाणें सर्व ऋतूंमध्यें वसंत श्रेष्ठ, त्याप्रमाणें कीर्तिमान् राजांमध्यें, बुधरूपी पूर्ण चंद्राचे ठिकाणीं हा दातृत्वसिंधुच अशी ज्याची सर्वत्र कीर्ति सत्वर झालेली आहे, असा भोजराजाच श्रेष्ठ होय.

५४ **प्रहरणकलिता** ( न न भ न ल ग ) य० ७, ७.

ल०—न न भ न ल ग तैं प्रहरणकलिता ॥ १ ॥

उदाहरण.

प्रहरणकलिता करिति न ह्मणुनी ।
न नभिं नल गती कधिंहि खलजनीं ॥

त्यजासि मजासि गातिल तरि भुवनीं।
अहह अघविषें सुखि वसत कुणी? ॥ १ ॥

भावार्थ—कलहंस नळाला ह्मणतो, बाबारे दुष्ट लोक वाईट बुद्धीचा त्याग करीत नाहींत ह्मणूनच त्यांना स्वर्गलोकांत थारा मिळत नाहीं. याचा विचार करून मला जर सोडशील तर सर्वत्र तुझी कीर्तिच होईल. अरेरे! पापरूपी विषानें कोण सुखी आहे बरें?

५५ असंबाधा (म त न स ग ग) य० ५, ९.

ल०—कन्या रंध्रें मा त न स ग ग असंबाधा ॥ १ ॥

उदाहरण.

दुष्टे कैकेयी नच वदसि असंबाधा।
माते ना सांगें गणुनि न सुतसंबंधा
तापा कां देसी अदयि उगिच सीतेशा ॥
कांगे लोटीसी प्रभुविरहिं मला ऐशा ॥ १ ॥

भावार्थ—भरत ह्मणतो, हे कैकेयी तूं योग्य अशी गोष्ट बोलत नाहींस याकरितां मी तुझा मुलगा आहे असें मनांत न आणितां मला (राज्य स्वीकारण्याविषयींची गोष्ट) सांगू नको. हे दुष्टे त्या सीतापति रामाला वनवासाचा ताप निष्कारण देऊन मला त्याच्या विरहांत अशी कां बरें लोटितेस?

५६ मध्यक्षामा (म भ न य ग ग) य० ४, १०.

ल०—वार्णी दोंहा म भ न य ग ग मध्यक्षामा ॥ १ ॥

उदाहरण.

मध्यक्षामे भयद पथिं न ये सावित्री।
मी भी ना ये गगनिं पतिसवें तद्धात्री ॥
दे तत्प्राणा फिरुनि सुखनिधे तूं मातें।
तोषें दे तत्पतिअसुं यम तें वंदी ते ॥ १ ॥

**भावार्थः**---यम ह्मणतो हे सिंहकटि सुकुमार सावित्री मी भयंकर अशा आकाशमार्गानें जात आहे, तर तूं मजबरोबर येऊं नको. तेव्हां ती ह्मणते माझ्या पतीबरोबर येण्यास मला भय कसचें? हे दयानिधे तूं त्याचे प्राण परत दे. असें तिचें भाषण ऐकून संतोषानें यमानें सत्यवानाचे प्राण परत दिले.

१५ अतिशक्करी (पंचदशवर्ण-१५ अक्षरी-वृत्तें).

५७ **मालिनी** (न न म य य) य० शे०.

ल०---वसु मुनि यति ना ना मा य या मालिनी ती ॥१॥

उदाहरण.

खल विनवि वराया आर्जवें **मालिनीतें**।
**न न मय यश** वाटे तें परी रम्य तीतें ॥
**गुणिहि** असुर देई सर्वथा दुःखरोशी।
**विमल मणि शिरीं ज्या कोण माने अहीशीं?** ॥१॥

**भावार्थः**---मालिनी नामक कोणी कन्येनें आपणास वरावें ह्मणून मया-सुरानें स्वकौशल्याची तारीफ करून आर्जवानें विनविलें असतांही तिला तें आव-डेना. कारण **मय** कितीही गुणवान् असला तथापि तो राक्षस असल्यानें ताप-दायकच होणार असें तिला वाटलें. बरोबरच आहे मस्तकावर विमल मणि असला तरी सर्प जवळ घेण्यास कोण धजेल?

५८ **चामर** (र ज र ज र) य० शे०

ल०---रा ज रा ज रा असे पदांत येति चामरा ॥ १ ॥

उदाहरण.

वारुनी प्रभूवरी गड्या स्वदेहचामरा।
**रोज रोज रे** तया भजे मनीं कृपाकरा ॥
**भक्तिपंथिं** तत्पदा सुसेवि तैंच मुक्तता।
**शुद्धचित्तिं** वर्ततां सुसौख्यलाभ तत्वता ॥ १ ॥

**भावार्थः**—तूं स्वदेहरूपीं चामर प्रभूवर नित्य वारून त्या करुणाकराला नित्य भज, भक्तिपूर्वक त्याच्या पायाचें सेवन कर. तरच संसारपाशांतून मुक्तता होईल. शुद्ध चित्तानें वागलें असतां उत्तम लाभ होतो हेंच खरें.

५९ **रमा** ( न ज न र य ) य० ५, १०.

ल०—शेर दशिं ये न ज ना र या रमा ती ॥१॥

उदाहरण.

धननिचया असुनि समर्थ वा **रमा** ही ।
**न जि नर या** विबुधिं सुखा खरेंच पाही ॥
बुध **गणं**हीं **मुनि**सम तुच्छ मानुनी ते ।
विधितनया भजति तदा विषाद तीतें ॥ १ ॥

**भावार्थः**—संपत्तीची केवळ खाण अशी लक्ष्मी विद्वानांस प्रसन्न होत नाहीं न तेही तिची ऋषीप्रमाणेंच पर्वा न करितां विद्याध्ययनांत मग्न असतात. अशा रीतीनें सरस्वतीची उपासना केल्यावर मग तिला विषाद होतो.

६० **नलिनी** ( ५ सगण ) य० शे०

ल०—पदिं पंच सकार जिला बघ ती नलिनी ॥ १ ॥

उदाहरण.

मधुलोलुप हा आलि सेवि मुदें **नलिनी** ।
सुगती मनिं मानुनि कोशिं शिरेच झणी ॥
निजछंदिं परी उपडी तिजला **करिणी** ।
**जरि दैव फिरे सुख लेश न तो अवनीं** ॥१॥

**भावार्थः**—मधुलंपट हा भ्रमर मोठ्या आनंदानें नलिनीचें सेवन करीत असून, सुख मानून मुकुलांत वेगानें शिरला. परंतु स्वच्छंदानें हिंडणाऱ्या हत्तिणीनें ती कमलिनी उपडली. यावरून दैवगति फिरली तर या पृथ्वीतलावर कोठेंही सुख नाहीं असेंच सिद्ध होतें.

१६ अष्टि ( षोडशवर्ण-१६ अक्षरी-वृत्तें ).

६१ पंचचामर ( ज र ज र ज ग )

ल०—प्रमाणिकापदद्वयें गणा सुपंचचामरा ॥ १ ॥

उदाहरण.

स्वजीव **पंचचामरा** प्रभूवरूनि वारुनी ।
**जरी जरा जगांत** राहसी सुखेंवि चिंतुनी ॥
सुपक्षिं चंद्र-**कांति**-वाढ, तेंवि लीन हो मनीं ।
**सुभक्तिमार्ग सेवितां सहाय्य ईश तो झणीं** ॥१॥

**भावार्थः**—पंचप्राणरूपी पंचचामराला प्रभूवरून वारून त्याचें चिंतन कर. शुक्लपक्षांत चंद्रकला वृद्धि पावते तद्वत् त्याचे ठिकाणीं लीन हो. भक्तीचा हा उत्तम मार्ग धरिला असतां ईश्वर साहाय्य केल्याशिवाय राहणार नाहीं.

६२ **चित्रवृत्त** ( र ज र ज र ल ) य० शे०.

ल०—मल्लिकापदद्वयें सख्या सुचित्रवृत्त जाण ॥ १ ॥

उदाहरण.

**चित्रवृत्तिं** हर्ष तो विदर्भराजकन्यकेस ।
**रोज रोज रे** लपोनि ऐकि नैषधीकथेस ॥
स्वांतरीं **प्रता**पशालि **ए**क तो वरी **कुमार** ।
मार खिन्न हो परी व्यथा पवे उमाकुमार ॥ १ ॥

**भावार्थः**—नळ राजाचा मनोहर वृत्तांत दमयंती अत्यानंदानें आड राहून नित्य ऐकत असे. ज्या वेळेस तिनें आपल्या मनांत प्रतापशाली अशा त्या नळकुमारास वरिलें, त्यावेळीं मदन तर खिन्न झालाच, पण प्रत्यक्ष उमाकुमार कार्तिकस्वामी हाही व्यथा पावतां झाला.

६३ **मदनललिता** ( म भ न म न ग ) य० ४, ६, ६.

ल०—चौं सा शास्त्रें; मदनललिता मा भा न म न गा ॥१॥

उदाहरण.

पत्यर्थी जैं **मदनललिता** प्रार्थीत गिरिशा ।
**मा भी नामा** नगपतिचिया ठेवी भरंवसा ॥
आश्वासोनी बहुपरि वदे भूतेश[11] तिजला ।
लाभे तूझा पति यदुकुलीं कृष्णात्मज भला ॥ १ ॥

**भावार्थ:**—श्रीशंकरानें मदनास भस्म केल्यानंतर त्यासाठीं रतीनें त्याची प्रार्थना केली, त्यावेळीं तिचें आश्वासन करून शंकर ह्मणतात, हे रति तूं आतां मला भिऊं नको, माझ्यावर भरंवसा ठेव, बये तुझा नवरा यदुकुलोत्पन्न कृष्णाचे उदरीं प्रद्युम्न नांवानें प्रकट होईल; तोंपर्यंत धीर धरून रहा.

१७ अत्यष्टि ( सप्तदशवर्ण--१७ अक्षरीं-वृत्तें ).

६४ **शिखरिणी** ( य म न स भ ल ग ) य० ६, ११.

ल०—रसीं[6] रुद्रीं[11] थांबे य म न स भ ला गा शिखरिणी ॥ १ ॥

उदाहरण.

किती वेगें वाहे हिमनगसुता ही **शिखरिणी** ।
**यमूनेसी भोला** गति धरि वदे तूं अशि ह्मणीं ॥
तुह्मी धन्या दोघी[2] विमल **सरिता**[13] कृष्णचरणीं[2] ।
शिरीं गंगा घे मी नमन तुजही तोषुनि मनीं ॥ १ ॥

**भावार्थ:**—श्रीशंकर यमुनेला ह्मणतात, ह्या पर्वतशिखरस्थ वेगवती गंगेप्रमाणें तूंही तशीच हो. तुह्मी दोघीही श्रीकृष्ण चरणांनीं पवित्र झालां आहांत. यासाठीं मी गंगेला मस्तकीं धारण केली असून तुलाही वंदन करितों. ( गंगा श्रीविष्णूच्या पायाच्या आंगठ्यापासून निर्माण झाली व यमुनातटाकीं श्रीकृष्णानें बालक्रीडा केली अशी कथा प्रसिद्ध आहे.)

६५ **हरिणी** (न स म र स ल ग) य० ६, ४ ७.

**ल०**—र्‍स, गुरु, मुनी ना स्मा रा सा ल गा हरिणी पहा ॥१॥

उदाहरण.

गरिब **हरिणी** आक्रोशें मी किती निज पाडसां ।
**न समरस ला गे** माते हा क्षणैक सुकल्पसा ॥
**तनय**विरहाग्निज्वाला ही **जिवा** बहु पोळते ।
**अहह करुणा क्रूरा येई कशी मज सांग ते ॥ १ ॥**

**भावार्थः**—आपल्या पाडसास पारध्यानें जाळ्यांत धरिलेलें पाहून हरिणी शोक करिते कीं, हा कल्पांताप्रमाणें भासणारा एक क्षणसुद्धां मला सुखकर वाटत नाहीं. ही तनयविरहाग्निज्वाला जिवाला फार पोळीत आहे. हाय! हाय! क्रूराला कशी बरें करुणा येईल?

६६ **मंदाक्रांता** (म भ न त त ग ग) य० ४, ६, ७.

**ल०**—मंदाक्रांता श्रुति, रस, मुनी मा भ ना ता त गा गा ॥१॥

उदाहरण.

**मंदाक्रांता** स्थिति मम अशी त्यांत हा दुःखसिंधू ।
**मा भी नेता तु** गगनिं जरी येई तों ज्येष्ठ बंधू ॥
कीं **पाताळीं** जरि दडविलें जिंकुनी **शेषें** तोही ।
पितृव्यांहीं ह्मणवुनि भलें कुश आणील पाही ॥ १ ॥

**भावार्थः**—सीता ह्मणते हे लहू आधींच मी कष्टी आणि तुला तर शत्रुघ्न नेत आहे हा मोठा दुःखाचा सिंधूच प्राप्त झाला, तथापि तुझा ज्येष्ठ बंधु कुश येईपावेतों धीर धर. शत्रु तुला आकाशांत नेवोत अगर पाताळांत दडवोत. शेषालासुद्धां जिंकून व शत्रुघ्नाकडून शाबासकी मिळवून कुश हा तुला खात्रीनें परत आणील.

६७ **पृथ्वी** (ज स ज स य ल ग) य० ८ ९.

ल०—वसु, ग्रहें, यती ज सा ज स य ला ग पृथ्वी पहा ॥ १ ॥

उदाहरण.

पहा सुवनिं होय ही सकल **पृथ्वि** सस्यांकिता ।
जसा जि सयि लागतां परिस लोहिं ये स्वर्णता ॥
सुरत्ननिचया किती रुचिर गुंग मी तद्गुणीं ।
सुरद्रुम फिका करी स्वगुणिं तोहि चिंतामणी ॥ १ ॥

**भावार्थः**—गडे, परिस लोहास लागला असतां जसें त्याला सुवर्णत्व येतें. तद्वत् या सुवृष्टीच्या योगानें पृथ्वी ही नवधान्ययुक्त होते. अहाहा ही केवळ रत्नांची खाण असून, आपल्या गुणांनीं कल्पवृक्ष व चिंतामणी फिका करणारी असल्यानें तिच्या वर्णनांत मी मोहित होऊन जात्यें.

१८ धृति (अष्टादशवर्ण-१८ अक्षरी वृत्तें).

६८ **विबुधप्रिया** (र स ज ज भ र) य० शे०.

ल०—धन्य ती विबुधप्रिया र स जा ज भा र हि पादिं ज्या ॥ १ ॥

उदाहरण.

धन्य बा **विबुधप्रिया** विदुषी अशी बव गार्गि ही ।
रेस जी जिभ रे कदा न करी वृथा अति शांत ही ॥
वेदें शास्त्र सुयोगिं जी रत यामिनीकुलिं जन्मुनी ।
ज्ञानखाणि सुदिव्य मी बहु लुब्ध तद्गुणवर्णनीं ॥ १ ॥

**भावार्थः**—बुधजनमान्य विदुषी अशी ही गार्गी मोठी धन्य आहे. ही कधींही अन्यथा न बोलणारी व शांत अशी असून, वेद, शास्त्र व योग यांमध्यें प्रवीण आहे. स्त्री असूनही ज्ञानाची दिव्य खाणी अशी असल्यानें तिचें वर्णन करण्यास मला मोठा आनंद वाटतो.

६९ **महामोदकारी** ( ६ यगण ) य० शे०.

**ल०**—क्रमें पाहि साहा यकारा पदीं तैं महामोदकारी ॥ १ ॥

उदाहरण.

तुवां साधिजे सर्वथा आत्मविद्या **महामोदकारी** ।
**यशोधी सहा** षड्विकारासि धैर्यें धरी शांति भारी ॥
झणीं **इंद्रियां** आवरी **भक्ति** साधी करी मान्य **वाणी** ।
मिळे तैंच चौऱ्यांशि फेरा चुकोनी तुला सौख्यखाणी ॥ १ ॥

**भावार्थः**—गड्या मोठी आनंददायक अशी अध्यात्मविद्या तूं निश्चयानें साध्य कर. सुबुद्धीनें षड्विकार सहन करून शांति धर. इंद्रियांना आवरून भक्ति कर, माझे हे शब्द ऐकशील, तर चौऱ्यांशीचा फेरा चुकून तुला सौख्य-खाणि प्राप्त होईल.

१९ अतिधृति ( एकोनविंशति-१९ अक्षरीं-वृत्तें ).

७० **शार्दूलविक्रीडित** ( म स ज स त त ग ) य० १२,७.

**ल०**—सूर्याश्वीं [१२, ७] यति मा स जा स त त गा शार्दूलविक्रीडित ॥ १ ॥

उदाहरण.

स्वच्छंदें फिरुनी वनीं करित हा **शार्दूल, विक्रीडिता** ।
**मासें जों सुत तों गमे** किति पहा याची अशी क्रूरता ।
होतां थोर **जनां** छळील अति हा **सूर्यासि** [१२] राहू जसा ।
**दुष्टातें परपीडनीं सुख बहू वाटे जणूं धर्मसा** ॥ १ ॥

**भावार्थः**—हें वाघाचें पोर एक महिन्याचें झालें नाहीं तोंच हें स्वच्छंदानें क्रूर अशा चेष्टा करीत आहे पहा. हें जेव्हां थोर होईल तेव्हां सूर्यास जसा राहू छळतो, तद्वत् लोकांना फार पीडा देईल. बरोबरच आहे दुष्टांना परपीडेंत फार सुख होतें एवढेंच नव्हे, तर त्यांना तो केवळ आपला धर्मच आहे असें वाटतें.

### ७१ मेघविस्फूर्जिता (य म न स र र ग) य० ६, ६, ७.

ल०—रसीं[६] शास्त्राश्वीं[६,७] हो य म न स र र गा मेघविस्फूर्जिता तीं ॥१॥

उदाहरण.

जसा फोडी टाहो मयुर बघुनी मेघविस्फूर्जिता ती ।
यमा ना सारी रे गढुनि विषयीं बाहि तूं ईशमूर्ति ॥
हरिश्चंद्रा ऐसें सुपंथिं पदें तें ठेवि संत्पुत्र होईं ।
स्वधर्मे जो वागे मिळवि जानिं तो सौख्यठेवा सदाही ॥१॥

भावार्थः—मेघगर्जनेला पाहून जसा मोर टाहो फोडितो, त्याप्रमाणें विषयासक्त न होतां चित्तसंयमन करून ईश्वराचा धांवा कर आणि हरिश्चंद्राप्रमाणें सन्मार्गरत होऊन ‘ पुत्र व्हावा ऐसा गुंडा । ज्याचा तिहीं लोकीं झेंडा ’ अशी कीर्ति मिळीव. जो स्वधर्मानें वागतो, तोच सदोदित सुखठेवा मिळवितो.

२० कृति ( विंशतिवर्ण-२० अक्षरी-वृत्तें ).

### ७२ अंबुधारा ( य म न न त त ग ग ) य० ६, ७, ७.

ल०—रसाश्वीं[६,७] द्वीपें[७] ये म न न त ग गा अंबुधारा पहा ही ॥१॥

उदाहरण.

गृहा जाऊं कृष्णा पवन बहु सुटे वर्षती अंबुधारा ।
यमूना नेते ती गगानिं खवळुनी श्यामलोर्मिप्रसारा ॥
[illegible] होई पांसुप्रसर दंश दिशां वृक्ष ते उन्मळोनी ।
निनादें संत्रस्त प्रचुर मृग गुहीं जाति वेगें पळोनी ॥ १ ॥

भावार्थः—कृष्णाला त्याचे सोबती ह्मणतात, गड्या वारा फार जोराचा सुटला असून, पर्जन्य पडत आहे, यमुना नदी आपल्या काळ्या भोर पाण्याच्या लाटा खवळून आकाशांत नेत आहे, दशदिशा धुळीनें धुंद होऊन गेल्या

आहेत, वृक्ष उन्मळून पडत असून त्यांच्या निनादानें भयाकुल झालेला श्वापद-समूह वेगानें गिरिकंदरीं लपत आहे, तर घरीं जाऊं चल.

२१ प्रकृति ( एकविंशतिवर्ण-२१ अक्षरी-वृत्तें ).

७३ स्रग्धरा म र भ न य य य ) य० ७, ७, ७.

ल०—मा रा भा नू य या ये त्रिमुनि यतियुता स्रग्धरा जाण तेव्हां ॥१॥

उदाहरण.

धन्या ही विश्वपाला विकसितकुसुमास्रग्धरा विष्णुमूर्ति ।
**मारा भानू ययां ये** अमुप रुचिर जीपासुनी दिव्यकांति ॥
ध्याई अर्पोनि वेगें स्वतनुमनधना नित्य तूं **भक्तिभावें** ।
तारी संसार्णवीं ज्या विनवि घटज हें सिंधु जो प्राशि गर्वें ॥१॥

**भावार्थः**—सर्व विश्वाचें पालन करणारी व विकसित पुष्पांची माला धारण करणारी आणि जीपासून मदन व सूर्य यांना दिव्य अशी कांति प्राप्त होते अशी श्रीविष्णूची मूर्ति धन्य होय. मोठ्या गर्वानें सिंधु प्राशन करणारा अगस्ति देखील संसारसमुद्रांतून तरून जाण्यासाठीं जिची विनवणी करितो, अशा विष्णुमूर्तीचें तूं तन, मन व धन अर्पून सर्वदा ध्यान कर.

७४ चंद्रमौली [ म न त न य य य ] य० ८, ६, ७.

ल०—मा ना ता न य य य। बा वसु शरं मुनी चंद्रमौली पहा तें ॥१॥

उदाहरण.

मोहाया सगण येई मदन बघ हा **चंद्रमौली**स गर्वें ।
**मानी तो नायि यया** कां? स्वबल बघुनी श्रेष्ठ वैरा धजावें ॥
जिंकाया **गुण गिरीशी** धनुसि चढवी थोर केला प्रयास ।
होइ तो परि हवी तत्तृतियनयनोत्पन्नवैश्वानरास ॥ **१** ॥

**भावार्थः**—वसंत व अप्सरा वगैरे आपल्या परिवारासह मदन मोठ्या गर्वानें चंद्रमौली शंकराला कामोत्सुक करण्यासाठीं आला. पण वस्तुतः तो योगिराज

त्याला मानील काय? कधींही मानणार नाहीं. अर्थात् कोणीही आपली योग्यता पाहूनच समर्थाशीं वैर मांडावें हें बरें. असो त्या मदनानें धनुष्याला गुण चढवून शंकराला जिंकण्याचा पुष्कळ प्रयास केला. पण त्यांत त्याला यश तर आलें नाहींच. उलट तो त्याच्या तृतीय नयनांतून उत्पन्न झालेल्या वैश्वानरास हविर्भाग मात्र झाला.

२२ आकृति ( द्वाविंशतिवर्ण-२२ अक्षरीं-वृत्तें ).

७५ **अमृतध्वनि** ( त भ य ज स र न ग ) य० ४, ७, ७, ४.

ल०—धन्यामृतध्वनि त भा या ज सा र न गिं ये चौं मुनीं गिरि पंथें ॥१॥

उदाहरण.

**धन्यामृतध्वनि** तदा होतसे गगनिं नारायणा सेवि ह्मणुनी ।
**तैं भू यजे शरण गा** येउनी सुख तिला होय तें निशिदिनीं ॥
सद्धर्मरक्षक भला **वर्णिला भुवनिं** जो **भक्त** पाळी सुखवुनी ।
वानावया गुणगणा शक्ति ना मजसि ती गुंग झालों निजमनीं ॥१॥

**भावार्थः**—आपलें रक्षण कोण करील? अशी पृथ्वीस चिंता उत्पन्न होतांच तूं नारायणाचें सेवन कर, अशी सुंदर आकाशवाणी झाली. मग तिनें तसें करितांच तिला सुख प्राप्त झालें. जो सद्धर्मसंरक्षक व भक्तपालक असें सर्वत्र वर्णितात त्याचे गुणानुवाद गाण्यास मी सर्वथा असमर्थ आहें.

७६ **मंदारमाला** ( ७ तगण १ गुरु ) य० ४, ६, ६, ६.

ल०—चौं, सों, रसें, शांस्त्रिं गा अंतिं सातातकारी सुमंदारमाला सदा ॥१॥

उदाहरण.

जी नारदें दीधली घेउनी दिव्य गंधा **सुमंदार-माला** करीं ।
**तो लोकिं गाती** जया श्रीहरी रुक्मिणीतें मुदें देतसे सत्वरी ॥
**शृंगार** टाकोनी तैं सत्यभामा रुसे **प्राण** द्याया बसे **एकली** ।
त्या स्वर्द्रुमा आणुनी हट्ट तो पूरवी **श्रीश** जेव्हां तदा तुष्टली ॥१॥

**भावार्थः**—नारदऋषीनें दिलेली व जिचा उत्कृष्ट सुगंध आहे अशी सुंदर पारिजातक पुष्पांची माला हातीं घेऊन ज्याचें लोक चिंतन करितात त्या श्रीहरीनें आनंदानें ती तेव्हांच रुक्मिणीला नेऊन दिली. हें कळतांच सर्व अलंकार टाकून सत्यभामा रुसून प्राण देण्यासाठीं एकटीच सज्ज झाली. आणि श्रीकृष्णानें जेव्हां प्रत्यक्ष स्वर्गांतील वृक्षाला आणून तिचा हट्ट पुरविला, त्याच वेळीं तिची समजूत झाली.

७७ **उमा** ( ७ भगण १ गुरु ) य. ६, ६, ६, ४.

ल०—येइ रसत्रयिं, वेदिं, जधी यति सात भ गासह जाण उमा ॥ १ ॥

उदाहरण.

धन्य **उमा** आति आप्तजनां सुखदायक जी भवताप हरी ।
लोकिं भगा सुख दे सुभगा बहु तोषुनि नित्य अनेकपरी ॥
भक्तिरसें अवलोकं करी, यतिवेषि जरी पति मानि सती ।
श्रीशिवचित्तिं बहू मुद होय गड्या सुखवी ह्मणुनी सुमती ॥ १ ॥

**भावार्थः**—ही उमा शृंगी, भृंगी, नंदि वगैरे जो आपला परिवार, त्यास अति सुखानें वागविणारी असून ( असुरनाश करून थकलेल्या ) श्रीशंकराचे श्रम दूर करिते. ही यशस्विनी अत्यानंदानें श्रीशंकराला प्रेमदृष्टीनें पाहून सर्वदा अनेकपरीनें सुख देते. आपला भ्रतार जरी तपस्वी असला तथापि ही तेजस्वी अशी साध्वि त्याची मोठ्या भक्तीनें सेवा करिते. यासाठीं हे गड्या श्रीशंकरानांही फार आनंद होऊन ते त्या सुमतीला सुखवितात.

**भावार्थ** [ दुसरा ]—ही उमा आपल्या भक्तांना फार सुखप्रद असून त्यांचा संसारताप हरण करिते. ही यशस्विनी अत्यानंदानें भक्तांना सर्वदा परोपरीनें कल्याण व सुख देते. आपला पति जरी तपस्वी असला, तथापि त्यास मानणारी ही साध्वि भक्तिभावानेंच तुष्ट होऊन भक्तांवर कृपा करिते. यासाठीं हे सख्या, जर तुझ्या मनामध्यें संपत्ति, कल्याण व आनंद हीं बहुत प्राप्त व्हावींत असें असेल, तर त्या साध्वीला प्रसन्न कर ह्मणजे झालें.

२३ विकृति ( त्रयोविंशतिवर्ण-२३ अक्षरी- वृत्तें ).

७८ मदिरा [ ७ भगण २ गुरु ] य० ६, ६, ६, ५.

ल०—जाण ऋतुत्रयिं, बाणिं, पदीं यति, सात भ दोन ग ती मदिरा ॥१॥

उदाहरण.

वा मदिरा हिज बोलति सज्जन गुंग करी तनु चित्तहि भारी ।
लोकिं भगा, गुण, कीर्ति, धनासह नाश करी ह्मणिं चित्तिं विचारी ॥
पापनिधी भुवनीं नच यापरि नाश पहा सुख तेंहि न अंतीं ।
स्वप्निंहि नांव नको तिजपासुनि दूर रहा धरि मद्वच चित्तीं ॥ १ ॥

भावार्थः—चित्त व शरीर यांना भ्रम उत्पन्न करिते ह्मणून सज्जन हिला मदिरा असें ह्मणतात. ( मनुष्य एकदां मद्यपी बनला ह्मणजे ) ही लोकांत ऐश्वर्य, सद्गुण, कीर्ति व संपत्ति यांसह त्याच्या शरीराचा सर्वस्वी नाश करिते. याचा मनांत विचार कर. बाबारे मद्यसेवनासारखी पापाची खाण साऱ्या त्रिभुवनांत नाहीं. हिच्यापासून होणाऱ्या नाशासारखा दुसरा नाश नाहीं व शेवटीं सुखही नाहीं. यासाठीं स्वप्नामध्येंसुद्धां हिचें नांव न घेतां हिजपासून दूर रहा. हे माझे हिताचे बोल ऐक.

२४ संस्कृति ( चतुर्विंशति वर्ण-२४ अक्षरीं-वृत्तें ).

७९ गंगाधर [ ८ रगण ] य० शे०.

ल०—पादिं ये स्रग्विणी दोन वेळां तदा जाण 'गंगाधरा-तें' सख्यारे मनीं ॥१॥

उदाहरण.

सर्व विश्वासि आधार बा देसि गंगाधरा तूंचि हालाहला प्राशुनी ।
सिद्धि रे पाहुनी श्रीहरी तोषला देव तैसे ऋषी वर्णिती चिंतुनी ॥
शंतनू सेवुनी दोषि गंगा परी, माथिं घेतां तिला शास्त्र वर्णी ह्मणीं ।
त्वत्कृपाशीतल द्रोहि चंद्रासि दे भाळिं थारा तदा मानिती त्या जनीं ॥१॥

भावार्थः—हे श्रीशंकरा हालाहल प्राशन करून तू ज्यावेळीं सर्व विश्वास आधार दिलास त्यावेळीं श्रीविष्णूस फार आनंद झाला. देव व ऋषि आनंदानें तुला वर्णूं लागले. त्याचप्रमाणें शंतनूस वरण्यानें गंगेला आणि गुरुपत्नीच्या संभोगानें चंद्रास आलेलें लघुत्व, यामुळें त्यांना कोणीही मानीनात. परंतु तूं दयाळूपणें त्यांना अनुक्रमें मस्तकीं व भालप्रदेशीं धारण करितांच त्यांना लोकांमध्यें मान्यता आली.

२५ अतिकृति ( पंचविंशतिवर्ण-२५ अक्षरीं-वृत्तें ).

८० सुंदरि [ ८ सगण १ गुरु ].

ल०—वद 'सुंदरि' वृत्त तदा जरि तोटक ये द्वय वेळहि गा बत्र अंतीं ॥१॥

उदाहरण.

जगिं सुंदरि मी रतिहूनि तशी अति आवडती हरिशीं गुणधामा ।
गणि संगति सौख्यद तो मम नित्यचि गर्व धरी मनिं यापरि भामा ॥
[3]यलोकगुरूसि कळे मग सत्वर गर्व हरी तइं लज्जित होई ।
बघ गर्वविषा पिउनी सुखि को[illegible] असे व[illegible] युक्त वचा मज पाहीं ॥१॥

भावार्थ:—जगांत रतीहूनही सुंदर आणि गुणाची खाण व श्रीहरीला अति आवडणारी अशी मीच आहे एवढेंच नव्हें, माझा सहवास त्याला फार आवडतो असा सत्यभामेला फार गर्व झाला, तेव्हां श्रीकृष्णानें तिचा गर्व नाहींसा करितांच ती लज्जित झाली. तात्पर्य गर्वरूपी विषानें कोणीही सुखी असत नाहीं.

२६ उत्कृति ( षड्विंशति वर्ण-२६ अक्षरीं वृत्तें ).

८१ सौख्य [ ८ सगण २ लघु ] य. शे.

ल०:—वद अष्ट सकार पदीं दिसतां तुज दोन लघूसह 'सौख्य' तयाप्रत ॥१॥

उदाहरण.

जरि सौख्य हवें चिरकाल गड्या तुज सत्पथ हा धरि सज्जनसंमत ।
रु[illegible]गणी, ललनासुत सोडुनि ईशपदांप्रत तारक तो तुज संतत ॥

तव कीर्तिनिधी चिर इंदुकलेसि[१६] करो अति खिन्न जगीं बुधतोषक ।
मधुभाषणिं रंजवि सर्वहि ते जन नीतिपथा धरि तूं यशकारक ॥ १ ॥

भावार्थः--गड्या तुला सदोदित सौख्य हवें असेल, तर सज्जनसंमत असा सन्मार्ग धर, बायकांमुळें यांत न गढतां, ईश्वराचे पाय धर. सज्जनाला आनंद देणारा असा हा तुझा कीर्तिनिधि, ती चंद्रकांति फिकी करो. आपल्या मधुर भाषणानें सर्वांना रंजीव व यशकारक अशा नीतिमार्गाचें सेवन कर.

---

## संक्षेप वर्णसम-वृत्तें.

यांत वर्णसंख्या, नांव, गण व यति हीं आलीं आहेत.

१ **श्री**–१ गुरु.

२ **स्त्री**--२ गुरु. **सार**–१ गुरु १ लघु. **महि**–२ लघु.

३ **नारी**–म. **शशि**–य. **मृगी**–र. **रमण**–स. **पंचाल**–त. **मृगेंद्र**–ज. **मंदर**–भ. **कमल**–न.

४ **सती**–न ग. **धारि**–र ल, **निशि**–भ ल. **हरि**–न ल. **कृष्ण**–त ल. **क्रीडा**–य ग. **धरा**–त ग.

५ **पंक्ति**—भा ग ग. **प्रिया**—स ल ग. **कर्ता**—न ल ग. **संमोहा**—म म ग. **यमक**—न ल ल. **यशोदा**—त ग ग. **विजयी**—स ल ल.

६ **तनुमध्या**—त य. **सोमराजी**—य य. **विमोहा**—र र. **मालती**—ज ज. **तिलका**—स स. **मंथान**—त त. **वसुमती**—त स.

७ **मदलेखा**—म स ग. **हंसमाला**—स र ग. **कुमारललिता**—ज स ग. **लीला**—भ त ग. **शिष्या**—म म ग. **सवासन**—न ज ल. **करहंस**—न स ल. **चूडामणी**—त भ ग.

८ चित्रपदा—भ भ ग ग. हंसरुत—म म ग ग. वितान—स भ ग ग. नाराचिका—त र ल ग. लक्ष्मी—र र ग ल. विपुला—भ र ल ल. तुंग—न न ग ग. पद्म—न स ल ग. रामा—त य ल ल. समानिका—र ज ग ग. गजगती—न भ ल ग.

९ हलमुखी—र न स. ३, ६. भुजंगसंगता—स ज र. सारंगिक—न य स. पाइता—म भ स. भुजगशिशुभृता—न न म. महालक्ष्मी—र र र. रतिपद—न न स. वनमाली—न ज य.

१० शुद्धविराट्—म स ज ग. पणव—म न ज ग. ५, ५. त्वरितगति—न ज न ग. सारवती—भ भ भ ग. संयुत—स ज ज ग. मयूरसारिणी—र ज र ग. रामा—त य भ ग. बाला—र र र ग. उपस्थिता—त ज ज ग २,८.

११ सुमुखी—न ज ज ल ग. वातोर्मी—म भ त ग ग. वृत्ता—न ज स ग ग. ४ ७ सांद्रपद—भ त न ल ग. उपस्थित—ज स त ग ग. उपचित्रा—स स स-ल ग. कुपुरुषजनिता—न न र ल ग. अनवसिता—न य भ ग ग. ६, ५. सायक—स भ त ल ग. श्येनिका—र ज र ल ग. हरिणी—ज ज ज ल ग. मोटनक—त ज ज ल ग. भुजंगी—य य य ल ग. शुद्धकामदा—न र र ल ग. उपजाति—इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा यांचें मिश्रण. दमनक—न न न ल ग.

१२ चंद्रवर्त्म—र न भ स. कुसुमविचित्रा—न य न य. तामरस—न ज-ज य. मणिमाला—त य त य ६, ६. जलधरमाला—म भ स म. ४, ८. पुट—न न म य. ७,५. मोदक—४ भगण. मौक्तिकदाम—४ जगण. ललिता—त भ ज र. उज्वला—न न भ र. नवमालिका—न ज भ य. ललना—भ म स स. ५,७. ललित—न न म र. द्रुतपद—न भ न य. प्रमिताक्षरा—स ज स स. तरलनयन—४ नगण. गौरी—त ज ज य. विद्याधारी—४ मगण. प्रमिताक्षरा—स ज स स.

१३ तारक—४ सगण १ गुरु. रुचिरा—ज भ स र ग. ४, ९. उपस्थित—ज स त स ग. मंजुहासिनी—ज त स ज ग. नवनंदिनी—स ज स स ग.

कुटिलगति--न ज त त ग. ७,६. चंचरीकावली--य म र र ग. चंद्ररेखा --न स य र ग ६, ७. चंडी--न न स स ग. कलहंस--स ज स स ग. मृगेंद्रमुख--न ज ज र ग. कुटजगति--न ज म त ग. कंदुक--४ यगण १ गुरु. कंद--४ यगण १ लघु. कंजअवलि--भ न ज ज ल.

१४ अपराजिता--न न र स ल ग. वसुधा--स ज स य ल ग ५,९ लोला म स म भ ग ग. कुटिल--स भ न य ल ग. धृति, प्रमदा--न ज भ ज ल ग. हंसश्येनी--म भ न य ग ग ४,१०. चंद्रोरस--म भ न य ल ग. चक्रपद--भ न न न ल ग. वासंती--म त न म ग ग, म त न य ग ग. वसंत, नान्दीमुखी--न न त त ग ग ७,७. नदी--न न त ज ग ग ७,७ लक्ष्मी--म स त भ ग ग म स त न ग ग. इंदुवदना--भ ज स न ग ग ५,९. पवित्र--४ नगण १ लघु १ गुरु ८,६. कुमारी--न ज भ ज ग ग ८,६. सुकेशर--न र न र ल ग आनंद--ज र ज र ल ग. वरसुंदरि--भ ज स ज ग ग. रुक्मिणी--ज भ स ज ग ग ४, १०. विद्या--त न स ज ग ग.

१५ शशिकला--न न न न स. स्रक्--न न न न स ६,९. मणिगुणनिकर--न न न न स. ८,७. विपिनतिलका--न स न र र. चंद्रलेखा--१ म र म य य २ र स म स य ३ र र म य य ७, ८. चित्रा--म म म य य. निशिपाल--भ ज स न र. मानसहंस--स ज ज भ र. प्रभद्रिक, सुखेल--न ज भ ज र ७,८. कामक्रीडा--५ मगण. एला--स ज न न य ५,१०. उपमालिनी--न न त भ र ८,७. ऋषभ--स य स स म. रमणीय--र न भ भ र सीता--र त म य र. मोहनी--स भ त य स.

१६ ऋषभगजविलसित--भ र न न न ग ७-९. वाणिनी--न ज भ ज र ग. धीरललिता--भ र न र न ग. मणिकल्पलता--न ज र भ भ ग. अश्वगति--५ भगण १ गुरु. चकिता--भ स म त न ग ८-८. प्रवरललित --य म न स र ग. अचलधृति--सर्व लघु, गरुडरुत--न ज भ ज त ग. वरयुवती--भ र य न न ग.

१७ **वंशपत्रपतित**--भ र न भ न ल ग, १०, ७. **नर्दटक**—न ज भ ज ज ल ग, ७, १०. **कोकिल**—न ज भ ज ज ल ग, ७,६, ४. **अतिशायिनी**—स स ज भ ज ग ग. **हरि**—न न म र स ल ग, ६, ४, ७. **कांता**—य भ न र स ल ग, ४, ६, ७. **चित्रलेखा**--स स ज भ ज ग ग, १०, ७. **हारिणी**--म भ न म य ल ग, ४, ६, ७. **भाराक्रांता**--म भ न र स ल ग, ४, ६, ७. **मालाधर**--न स ज स य ल ग.

१८ **कुसुमितलतावेल्लिता**–म त न य य य, ५, ६, ७. **नवमाला**–न न र र र र, १०, ८. **तारका**–स भ स र र र. **सिंहविस्फूर्जित**–म म भ म य य ५, ६, ७. **नंदन**–न ज भ ज र र. **हरनर्तन**–र स ज ज भ र ८, ५, ५ **नाराच**–न न र र र र. **हरिणप्लुता**–म स ज ज भ र ८, ५, ५ **अश्वगति**-५ भ १ स. **सुधा**–य म न स त स ६,६,६. **चंद्रलेखा**–म भ न य य य१०,८. **हीरक**–भ स न ज न र. **चित्ररेखा**–भ न न त त म. ४, ७, ७, **भ्रमरपदक**–भ र न न न स. **शार्दूल**–म स ज स र म १२,६. **केसर**–म भ न य र र ४, ७, ७. **लालसा**–त न र र र र ८, १०. **गजेन्द्रलता**–न न र भ र र, १० ८,. **क्रीडा**–य म य य य य. **शार्दूलललिता**–म स ज स त स. **मंजीर**–म म भ म स म.

१९ **पुष्पदाम**–म त न स र र ग ५, ७, ७. **बिंब**–म त न स त त ग. ५, ७, ७. **मकरंदिका**–य म न स ज ज ग ६, ६, ७. **मणिमंजरी**–य भ न य ज ज ग ४, ७, ८. **समुद्रतता**–ज स ज स त भ ग ८, ४, ७. **छाया**-य म न स भ त ग ६, ६, ७. **सुरसा**–म र म न य न ग ६, ७, ६. **शंभू**-स त य भ म ग ग. **रचना**–न ज भ य स ज ग ११, ८. **रचना**-र भ ज त त स ग १०, ९.

२० **सुवदना**–म र भ न य भ ल ग ७, ७, ६. **वृत्त**–र ज र ज र ज ग ल **गीतिका**–स ज ज भ र स ल ग. **सुवंशा**–म र भ न त त ग. **मत्तेभविक्रीडित**–स भ र न य य ल ग. १३, ७.

२१ **सरसी**–न ज भ ज ज ज र. **अहि**–६ भगण १ गुरु.

२२ **हंसी**–म म त न न न स ग ८, १४. **भद्रक**–भ र न र न र ल ग. १०,१२. **लालित्य**–म स र स त ज न ग. **महास्रधरा**–स ज त न स र र ग, ८, ७, ७. **मोद**–५ भ + म स ग.

२३ **अद्रितनया**, **अश्वललिता**–न ज भ ज भ ज भ ल ग, ११, १२. **मत्ताक्रीडं**, **वाजिवाहन**–म म त न न न न ल ग ८,५,१०. **सुंदरि**–स स भ स न ज ज ल ग. **मत्तगयंद**–७ भगण २ गुरु. **सुमुखी**–७ जगण ल ग **मदिरा किंवा सवाई**–४ भ+र न भ ग ग ६,६,६,५. **मदिरा किंवा सवाई** ६न+ज ल ग ७,६,६,४.

२४ **तन्वी**–भ त न स भ भ न य, ५, ७, १२. **किरीट**–८ भगण. **दुर्मिल**–८ सगण ८,८, ८. **मुक्तहर**–८ जगण. **मकरंद**–७ जगण १ भगण. **आभार**–८ तगण. **अरसात**–७ भगण १ रगण.

२५ **क्रौंचपदा**–भ म स भ न न न न ग ५, ५, ८, ७.

२६ **भुजंगविजृंभित**–म म त न न न र स ल ग ८,११,७. **अपवाहा**–म न न न न न न स ल ग. ९, ६, ६, ५.

---

## दंडकवृत्तें.

ज्या वृत्तांत २६ पेक्षां जास्त वर्ण येतात त्यास दंडकवृत्तें ह्मणतात.

१ **चंडवृष्टिप्रयात** २७ वर्ण [ २ नगण ७ रगण ] य. १२,१५.

### उदाहरण.

सुचिर सुखवि '**जार्जभूपा**' विभो तोषुनी पुत्र पौत्रांसवें '**मेरिराणी**-स'ही ।
जगतिं विमल कीर्ति वानोत कीं '**धन्य हा धन्य**' बोलोनि ऐसें ज्या सर्व ही ॥
करिभय हरुनी यशोदुंदुभी भेदुनी जाउं तो स्वर्गलोकासि पृथ्वीपरी ।
सकल मनकामना त्याचिया पूरवी प्रार्थितों लीनभावें तुला श्रीहरी ॥ १ ॥

यांत १।१ रगण वाढविला तर अनुक्रमें **अर्ण, अर्णव, व्याल, जीमूत, लीलाकर, उद्दाम** आणि **शंख** असे भेद होतात. तसेंच प्रथम २ नगण व पुढें ७ यगण आले असतां ' **प्रचितक** ' नामक दंडक होतो.

**२ त्रिभंगी** ३४ वर्ण [ ६ न + स स भ म स ग ] य० २४, १०.

**उदाहरण.**

मुदित भरतजनहृदयजलधि बहु सुविमल ' **जार्जशशी** ' देखुनि पात्र त्या भरतीला । हंसत डुलत अति विसरत निजतनु गणितांहि सौख्यगती गाउनिया त्या शुद्ध यशाला ॥ विमल सुरस बत्र अतितर रमणिय बहुपरि अर्पित कीं प्रेमरुपी ह्या रत्ननिधीला । वदुनिहि अजवरि अतुल विभवयुत नृपवर योग्य असा सर्व जगीं ह्या कोणि न झाला ॥ १ ॥ १

**अवशिष्ट दंडकवृत्तें.**

**मत्तमातंगलीलाकर**–९ अथवा अधिक रगण. **कुसुमस्तबक**–९ अथवा अधिक सगण. **सिंहविक्रांत**–९ अथवा अधिक यगण. **अशोकपुष्पमंजरी**–इच्छेनुरूप लघुगुरुसंयोग. **नीलचक्र**–गुरु, लघु ३० वर्ण. **सुधानिधी**–गुरु, लघु ३२ वर्ण. **अनंगशेखर**–इच्छेनुसार लघु, गुरु. **माहिधर**–लघु, गुरु प्रत्येकीं १४ वर्ण.

---

## भाग ६ वा.

### वर्णार्धसम-वृत्तें.

यांत विषम ( १ व ३ ) व सम ( २ व ४ ) या चरणीं वर्णांचा लघु-गुरु-क्रम व त्यांची संख्या हीं सारखीं असतात. वर्णसमवृत्तांपेक्षां यांचा प्रचार पुष्कळ कमी आहे. खालीं सलक्षण व सोदाहरण अशीं कांहीं वृत्तें देतों.

**१ वेगवती.**

**वि. च. गण. स स स ग. स. च. गण भ भ भ ग.**

छं०—विषमीं प्रथमाक्षर टाकीं । दोधक ये समिं **वेगवती** कीं ॥ १ ॥

उदाहरण.

विरहानलदाह शमाया । तो शशि यत्न करी रघुराया ॥
परि तप्त तयें बहु तोही । **वेगवती** अशि दुस्थिति पाही ॥ १ ॥

२ वियोगिनी.

वि. च. गण. स स ज ग.   स. च. गण स भ र ल ग.

छं०—विषमीं स स जा ग देखुनी । समिं सा भा र ल गा **वियोगिनी** ॥ १ ॥

उदाहरण.

विरहानल तापवी तया । अनलाही, सदया करी दया ॥
नच सोडवणी वनीं कुणी । कशि साहूं स्थिति ही **वियोगिनी** ॥ १ ॥

३ उपचित्रा.

अति सुग   वि. च. गण स स स ल ग.   स. च. गण भ भ भ ग ग.

सखिचित्र—विषमीं त्रय सा ल ग देखितां । दोधक ये समिं ती **उपचित्रा** ॥१॥

उदाहरण.

न न [illegible] य अशी मुनिकन्‍ [illegible] का । लावि मला बहु वेडहि देखा ॥
छं०—[illegible] मधें बघ पाहतां । सुंदरता बहु ये **उपचित्रा** ॥ १ ॥

४ हरिणीप्लुता.

सुखदा स[illegible]. च. गण स स स ल ग.   स. च. गण न भ भ र.

[illegible] घे नतीं प्रथमाक्षर टाकितां । द्रुतविलंबित ती **हरिणीप्लुता** ॥ १ ॥

उदाहरण.

[illegible] ल्लांसि पहा सदा । सुचिर सौख्य करी हरि आपदा ॥
[illegible] संकटिं पाहतां । निजसुता जशि ती **हरिणीप्लुता** ॥ १ ॥

५ माल्यभारा.

[illegible]नक. च. गण स स ज ग ग.   स. च. गण स भ र य.

ल०–विषमीं स स जा ग गा पसारा। स भ रा या समपादिं **माल्यभारा** ॥ १ ॥

उदाहरण.

बघ भीमरथीसुतीरवासी। नित भक्तां-प्रति पूर्ण सौख्यराशी ॥
हरि जी भवताप पाहि सारा। कधिं पाहूं हरिमूर्ति **माल्यभारा** ॥ १ ॥

## ६ द्रुतमध्या.

वि. च. गण भ भ भ ग ग. स च. गण न ज ज य.

ल०–विषमीं बघ दोधक वंद्या। समिं न ज जा य वदे **द्रुतमध्या** ॥ १ ॥

उदाहरण.

हे करुणाकर दीन दयाळा। पदनत तारुनि देइं सुखाला ॥
लोकिं तुझ्या बहु गाति यशाला। मग मज लोटसि दूर कशाला ॥ १ ॥

## ७ अपरवक्त्र.

वि. च. गण न न र ल ग. स. च. गण न ज ज र.

ल०—जरि विषमीं सुभद्रिकागती। किं **अपरवक्त्र** समींहि **मालती** ॥१॥

उदाहरण

जननि विमल रुक्मिणीसती। जनकहि तो बघ विष्णु सन्मती ॥
हृदयकुसुम अर्पुनी तयां। स्मरत असे चिर सौख्य व्हावया ॥ १ ॥

## ८ कौमुदी.

वि. च. गण न न भ भ. स. च. गण न न र र.

ल०–विषमपदिं न ना भ भ ये जधिं। प्रमुदितवदना समीं **कौमुदी** ॥१॥

उदाहरण.

जरि करुं ह्मणसी जनरंजन। त्रिविध जन पहा छळे दारुण ॥
कठिण बहु असिव्रत घे मनिं। अनुभव मजला सदा ये जनिं ॥ १ ॥

## ९ पुष्पिताग्रा.

वि. च. गण न न र य. स. च. गण न ज ज र ग.

ल०—विषामिं न न र या समग्रा । समपदिं मालति गा हि **पुष्पिताग्रा** ॥

उदाहरण.

किमपि कुटिल संगती नसावी । सुरुचिर साधुसुसंगती धरावी ॥
कुमति न बरी सर्वथा त्यजावी । सुविमल कीर्ति जनांत वाढवावी ॥ १ ॥

१० मंजुसौरभ.

वि. च. गण न ज ज र. स. च. गण स ज य ज ग.

ल०—विषमपदीं जरि 'मालती' शुभ । समिं सा ज या ज ग तें **'मंजुसौरभ'**॥

उदाहरण.

सहचरि ती सुखदायि होतसे। वदति जनीं दुजि '**लक्ष्मी**' जिला असें ॥
तशिच दुजी सुखवी निशीदिनीं। विनयान्विताहि **'यशोदा'** भली जनीं ॥ १ ॥

**इतर वर्णार्धसम-वृत्तें**

ललिता:—वि. च. र स ल ग, स च स ज ज ग. भद्रविराट्—वि. च. त ज र ग, स. च. म स ज ग ग. केतुमती—वि. च. स ज स ग. स. च. भ र ज ग ग. आख्यानिकी—वि. च. त स ज ग ग, स. च. ज त ज ग ग. विपरिताख्यानिकी—वि. च. ज त ज ल ग, स. च. त ज ज ग ग. षट्पदा—वि. च. भ र ज र, स. च. र ज य र. यवानी—वि. च. र ज र ज स. च. त र ज र ग. यवमती—वि. च. र ज र ज, स. च. ज र ज र ग.

---

## भाग ७ वा.

### वर्णविषम-वृत्तें.

ज्याचे चारही चरणीं लघु गुरु क्रम सारखा असत नाहीं व अक्षरसंख्याही कमी जास्ती असू शकते त्यास **वर्णविषम-वृत्तें** ह्मणतात. यांचा प्रचार मराठींत नाहीं. तथापि प्रसंगानुरूप त्यांपैकीं येथें कांहीं वृत्तें देतों.

विषम वृत्तांचे **पदचतुरूर्ध्व** आणि **साधारण** असे मुख्य दोन भाग आहेत. त्यांत अनेक वृत्तें येतात.

## पदचतुरूर्ध्व.

याच्या पादीं क्रमानें ४।४ अक्षरें जास्त येतात ह्मणजे ८।१२।१६।२० अशीं अक्षरें येतात. याचीं **आपीड** व **प्रत्यापीड** अशीं मुख्य दोन वृत्तें असून चरणांच्या अक्षरबदलीनें त्यांची **मंजरी**, **लवली** व **अमृतधारा** अशीं वृत्तें होतात.

१ **आपीड**—ज्याच्या प्रतिचरणीं शेवटीं दोन गुरु व बाकीचे सर्व वर्ण लघु असतात त्यास **आपीड** ह्मणावें.

### उदाहरण.

जय सुखकर रामा । कुमति-तम-रवि विमल धामा ॥ असुर-कुल-गज-हरि पद-नत-विरामा । शरण मि तव पदिं मम भव-भय हरि शुभकामा ॥१॥

२ **प्रत्यापीड**—ज्याच्या प्रतिचरणीं प्रथम आणि अंतीं दोन गुरु व मधील सर्व वर्ण लघु असतात त्यास **प्रत्यापीड** ह्मणावें.

### उदाहरण.

देवा परम दयाळा । देई सुमति मज करि दयेला ॥ वेगें षडरि हरुनि निरसि झणिं भवाळा । प्रार्थीं अतितर सकरुणवन ह्मणुनि तव पदांला ॥ १ ॥

ज्याचे चारही चरणीं अनुक्रमें १२।८।१६।२० वर्ण येतात त्यास **मंजरी** ह्मणावें. १६।१२।८।२० वर्ण येतात त्यास **लवली** ह्मणावें. व २०।१२।१६।८ वर्ण येतात त्यास **अमृतधारा** ह्मणावें.

## साधारण.

साधारणांत **उद्गता**, **सौरभक**, **ललित**, **उपस्थितप्रचुपित**, **वर्धमान**, **शुद्धविराट्ऋषभ** आणि **मुक्तक** असे भेद आहेत.

**उद्गता**—१ स ज स ल २ न स ज ग ३ भ न ज ल ग. ४ स ज स ज ग.
**सौरभक**—१ स ज स ल २ न स ज ग ३ भ ज ज ल ग ४ स ज स ज ग

**ललित**—१ स ज स ल २ न स ज ग ३ न न स स ४ स ज स ज ग. **उपस्थितप्रचुपित**—१ म स ज भ ग ग २ स न ज र ग ३ न न स ४ न न न ज य. **वर्धमान**—१ म स ज भ ग ग २ स न ज र ग ३ न ज स न न स ४ न न न ज य. **शुद्धविराट्ऋषभ**—१ म स ज भ ग ग २ स न ज र ग ३ त ज र ४ न न न ज य. ( यांतील आंकडे चरणदर्शक होत. )

मुक्तक याचे दोन भेद आहेत. **अनंगक्रीडा** अथवा **सौम्याशिखा** आणि **ज्योतिःशिखा.** ज्याचे पूर्वार्धीं प्रत्येक चरणीं १६ गुरुवर्ण, आणि उत्तरार्धीं ३२ लघु वर्ण प्रत्येक चरणीं येतात त्यास अनंगक्रीडा ह्मणावें व त्याचे उलट ह्मणजे पूर्वार्धीं प्रत्येक चरणीं ३२ लघु वर्ण आणि उत्तरार्धीं प्रत्येक चरणीं १६ गुरु वर्ण येतात त्यास ज्योतिःशिखा ह्मणावें.

## प्राकृत-वृत्तें.

प्राकृत भाषेंत गणलीं जाणारीं **अभंग** व **ओंवी** हीं वृत्तें या विषम प्रकारांतच येतात ह्मणून त्यांचीही येथेंच माहिती देतों.

## अभंग.

याचे मोठा व लहान असे दोन भेद आहेत व त्यांत मोठ्याचे दोन व लहानाचे तीन मिळून पांच प्रकार आहेत. मोठ्या अभंगास चार चरण असतात. पहिल्या तीन चरणीं प्रत्येकीं ६ वर्ण व चवथ्या चरणीं ४ वर्ण असतात.

### मोठा अभंग.

१ **ला भेद**—दुसऱ्या व तिसऱ्या चरणांचे अंतीं प्रास असतो.

**उदाहरण**—अभंग ( तुकाराम ).

कुळीं कन्या पुत्र । होती जे सात्विक । तयाचा हरिख । वाटे देवा ॥ १ ॥

२ **रा भेद**—पहिल्या तिन्ही चरणीं प्रास असतो.

**उदाहरण**—अभंग (तुकाराम).

देवा भेटो गेला । तेथेंचि गुंतला । तल्लीन जाहला । तुका वाणी ॥ १ ॥

## लहान अभंग

**१ ला भेद**—या अभंगास दोन चरण असून प्रत्येकीं ८ वर्ण असतात. क्वचित् ६ ही वर्ण असतात.

**उदाहरण**—अभंग ( तुकाराम ).

जोडोनिया कर । उभा राहिलों समोर ॥ १ ॥
हेंचि माझें भांडवल । जाणे कारण विठ्ठल ॥ २ ॥

**२रा भेद**—याच्या २ऱ्या चरणीं ७ वर्ण असून ४ था वर्ण प्रासयुक्त असतो.

**उदाहरण**—अभंग ( तुकाराम ).

उभा राहे वादावादीं । तरी फंदीं सांपडे ॥ १ ॥

**३ रा भेद**—याच्या चारही चरणीं प्रत्येकीं ८ वर्ण असून पहिल्या तीन चरणांचे अंतीं प्रास असतो. क्वचित्स्थळीं कमजास्त वर्ण असतात.

**उदाहरण**—अभंग ( तुकाराम ).

कळे न कळे त्या धर्म । ऐका सांगतों रे वर्म ॥
माझ्या विठोबाचें नाम । अट्टाहासें उच्चारा ॥ १ ॥

## ओंवी.

प्रत्येक ओंवीला चार चरण असून तिन्ही चरणांचे अंतीं प्रास असतो. क्वचित् चवथ्या चरणार्धी यमकाक्षर असतें. पहिल्या तिन्ही चरणीं प्रत्येकीं ८ वर्ण व चवथ्या चरणीं ७ वर्ण असावेत असा प्रायः नियम आहे; तथापि अर्थानुरोधानें कवि लोक कमजास्त वर्ण घालितात.

**उदाहरण ओंवी.**

अविद्याकामकर्म । हें पुरत्रय पैंसे वर्म ॥
अंतःकरणपंचकनाम । चतुर्थ पुरुषाचें ॥१॥ मुकुंदराय.

हा अंतराय अवचिता । कां लोटला श्रीभगवंता ॥
दिव्यें भोग भोगितां । चतुर्थ पुरुषाचे ॥१॥ ज्ञानेश्वर.

नमन माझें अनीळा । माझी वार्ता जाणवी नळा ॥
लोटोनि आणि मजजवळां । श्रेय घेईं जिवाचें ॥१॥ मुक्तेश्वर.

त्या मज कामा न सरतें केलें । शांतीचें कल्याण पाहिलें ॥
हें तुवांचि एके यश नेलें । स्वभाव जिंकिले निज शांतियोगें ॥१॥ एकनाथ.

कीं हीं विवेकनिधीचीं भांडारें । प्रकट झालीं मनुष्याकारें ॥
नाना वस्तुचेनि विचारें । कोंदाटलें हें ॥१॥ रामदास.

सुरभी शोधीत आली घर । तिसी करूनि काष्टप्रहार ॥
अभाग्यें घातली बाहेर । तोचि प्रकार मज झाला ॥१॥ श्रीधर.

यावरी सद्गुरु बोलती वचन । वैराग्य नव्हेचि तुज लागून ॥
नको टाकूं संसारभान । शेवट होणें अघटित ॥१॥ महिपती.

## घनाक्षरी छंद

हा छंद ओंवी अगर संस्कृतांतलि चतुष्पदछंदासारखाच असतो. चार ओंव्या मिळून घनाक्षरी छंद होतो. पहिल्या व तिसऱ्या चरणीं प्रत्येकीं आठ वर्ण व बारा मात्रा व चवथ्या चरणीं सात वर्ण व अकरा मात्रा असाव्या ह्मणजे एक पाद होतो असा प्रायः नियम आहे. असे चार पाद मिळून एक घनाक्षरी छंद होतो. घनाक्षरीच्या प्रत्येक पादांत पहिल्या तीन चरणांचे अंतीं व प्रत्येक पादाचे शेवटीं प्रास असतो.

**उदाहरण—घनाक्षरी** ( वामन पं० ).

अरे तुझा कोठें देव । ह्मणे सर्व वासुदेव ॥
विश्वपटीं स्वयमेव । तंतु तोचि असतो ॥ १ ॥
दैत्य ह्मणे अरे थांब । गोष्टि ठेवी लांब लांब ॥
मजसमोर हा खांब ॥ येथें कैसा असतो ॥ २ ॥
ह्मणे स्तंभ दारुरूप । दारूमध्यें चित्स्वरूप ॥
थिजलें तथापि तूप । रस तो न भासतो ॥ ३ ॥
तरि दिसेना कां मज । ह्मणे भजोनी समज ॥
प्रत्यक्षाहि अधोक्षज । दिसेना तो दिसतो ॥ ४ ॥

## भाग ८ वा.

### अनुष्टुब्.

ल०—अनुष्टुप् छंद तो जाणा । नेम नाहीं जया गणीं ॥
यत्नादीं अक्षरें आठ । पांचवें नित्य तें लघू ॥ १ ॥

उ०—अनुष्टुप् छंदिं त्या गावें । पंचभूतां नमूनिया ॥
नेम कांहीं नको भावें । भजा तें देव पाविजे ॥ १ ॥

**भावार्थः**—केवळ नियमधर्मावरच भिस्त न ठेवितां सर्व प्राणिमात्रांविषयीं नम्रभाव धरून ईश्वरसेवा कराल तर खात्रीनें तो पावेल.

हें अनुष्टुब् नामक वृत्त. यांत गणांचा नियम नाहीं. प्रत्येक चरणीं ८ अक्षरें असून ५ वें लघु व ६ वें गुरु असावें. तसेंच सम ( २ व ४ ) चरणांचें ७ वें अक्षर लघु व विषम ( २ व ४ ) चरणांचें ७ वें अक्षर गुरु असावें, असा प्रायः नियम आहे. अर्थात् चारही चरणांचा परस्परांशीं कधीं मेळ असतो, कधीं असत नाहीं. याची गणना वर्णवृत्तांमध्यें जरी केली आहे, तरी त्यांस हें अक्षरगणांच्या नियमानें बांधलें नसल्यानें अपवादात्मक आहे. याचे आणखी कांहीं भेद होतात. ते खालीं दिले आहेत:—

**वक्र**—याच्या चारही चरणीं प्रत्येकीं पहिला व शेवटला वर्ण गुरु किंवा लघु असतो. विषम (१ व ३) चरणीं पहिल्या वर्णापुढें **न स** हे गण व सम (२ व ४) चरणीं **न स र** हे गण येऊं नयेत.

जो जनीं वागतो न्यायें । तो सुखाला तसें सेवी ॥
या साठीं त्वन्मनीं बाळा । ठेवि तूं त्या सुबुद्धीला ॥ १ ॥

**पथ्यावक्र**—वक्राच्या सम (२ व ४) चरणांतील चवथ्या अक्षरापुढें जगण आला असतां पथ्यावक्र होतें.

रहावें गा जनीं नीट । करोनी सुख-साधन ॥
नको कांहीं अन्य युक्ति । करी तें प्रभुचिंतन ॥ १ ॥

याचप्रमाणें विषम ( १ व ३ ) चरणांतील चवथ्या अक्षरापुढें जगण योजिला असतां विपरीतवक्र होतें. विषम ( १ व ३ ) चरणांतलि चवथ्या अक्षरापुढें जगण योजिला असतां चपलावक्र होतें. सम ( २ व ४ ) चरणांतील सातवा वर्ण लघु आला असतां युग्मविपुलावक्र होतें. याच्याच चवथ्या अक्षरापुढें भ, र, न आणि त हे गण आले असतां त्या त्या नांवांचीं विपुलावक्रें होतात.

---

## भाग ९ वा.

## मात्रा-सम -वृत्तें *

**मात्रागण**—वर्णसमवृत्ताप्रमाणेंच मात्रावृत्तांत मात्रा–गणही असतात. प्रस्तारानें ( लघु-गुरूंच्या अदलाबदलीनें ) त्यांचे पांच भेद होतात. त्यांचीं नांवें स्वरूपें व उदाहरणें येणेंप्रमाणें:—१ **मगण** SS तारी, २ **सगण** ।।S सदया, ३ **जगण** ।S। जनास, ४ **भगण** S।। सत्वर, ५ **नगण** ।।।। भवपथि. खालीं कांहीं मात्रा-सम-वृत्तें देतों.

१ **सखी**—प्र० च० १४ मात्रा. अंतीं २ किंवा ३ गुरु.

जय गंगाधर गुरुराया । स्मरुनि हृदयिं चिर तव पाया ॥
रामरूपि तव लीला ती । वर्णिन मिळवाया शांति ॥ १ ॥

२ **सुलक्षण**—प्र. च. १४ मात्रा. दर ४ मात्रांपुढें १ गुरु व लघु.

प्रभुवर राम हृद्विश्राम । गातां नाम, दे सुखधाम ॥
हरुनी मोह, पुरवी काम । म्हणुनी ध्यान करि आराम ॥ १ ॥

३ **चौपाई**—प्र. च. १५ मात्रा. अंतीं १ गुरु व १ लघु.

श्रीराम-चरित-सिंधु गभीर । मशक केवि मी लाविन पार ॥
परि अनुसरुनि सुजन-पथ थोर । गात हराया हा भव-घोर ॥ १ ॥

---

* यांतील वृत्तांच्या उदाहरणांसाठीं जे श्लोक दिले आहेत ते क्रमानें वाचले असतां संपूर्ण रामायण थोडक्यांत पण सुबोध रीतीनें वर्णिल्याचें दिसून येईल.

श्रोतीं नीट तरी अवधान । घावें गातां मी प्रभु गान ॥
सुखें करा चरितामृत-पान । जरि ती व्हावी सत्सुख-खाण ॥ २ ॥

४ मात्रासमक—प्र. च. १६ मात्रा. ९ वी मात्रा लघु व अंतीं दोन गुरु.

बघुनि अयोध्या, अमरपुरीही । घे श्रृंगारा नित नव पाही ॥
दिव्य तप फळें, जयीं पुर मिषें । सुविश्वकर्मा नाचत तोषें ॥ १ ॥

५ उपचित्रा—प्र. च. १६ मात्रा. १० वी मात्रा गुरु.

शरयू-गानें पावन गंगा । होतां मग करि ती अघ-भंगा ॥
स्वकुल-दीप-सुत-कीर्ति-किरणिं तो । दीपित भानु नभीं मिरवीतो ॥१॥

६ विश्लोक—प्र. च. १६ मात्रा, ५ वी व ८ वी मात्रा लघु.

वाटे विभु-मनिं तेथ रहातां । येइल सुविमल यश मम हातां ॥
व्हावें रवि-कुलिं धन्य जन्मुनी । श्रीशा-मनीं अशि लागे झुरणी ॥ १ ॥

७ वानवासिका—प्र. च. १६, ९ व १२ वी मात्रा लघु.

खलकृत वसुधा-छल-सुनिमित्ता ॥ तेवि खिन्न मनिं नृप सह-दयिता ॥
बघुनिं तदोदरिं सुजन्म घेतां । दशरथ-हेवा सुर-मुनि चित्ता ॥१॥

८ चित्रा—प्र. च. १६ मात्रा. ५, ८ व ९ ह्या मात्रा लघु.

श्रीश, भुजगपति-सशंखचक्रहि । ये अवतरुनि जगतिं नवलाई ॥
मोहिति सुर आशि करि शिशु-केली । बाल-स्थिति मग सहज संपली ॥१॥

९ पादाकुलक—मात्रासमक, विश्लोक वगैरेंच्या मिश्रणानें हें वृत्त होतें.

गाधिज निज-मख-संरक्षणिं, ते । राम-सुमित्रा-सुत नेतां, ते ॥
शिकुनि विविध मुनिपासुनि विद्या । निवटि ताटिकामयहि कुविद्या ॥१॥

१० चौपाई-दुसरी—प्र. च. १६ मात्रा. अंतीं ज व त हे गण नसावेत.

काम-मारिचा दावुनि आब्धि । क्रोध-सुबाहु-निशाचर तो वधि ॥
मोहादिक अज मखिं देउनि बळि । शांति-अहिल्या ती जागविली ॥१॥

जाइ जनक-गृहिं हर्षुनि मुनिसह । सहज भंगि धनु जें जगिं असह ॥
रामेतरनृप-कीर्तिसह रमा । अभिरामा, वरि मेघश्यामा ॥ २ ॥

११ **रास**–प्र. च. १७ मात्रा. य. ९, ८.

तैं जनक हर्षें आणुनि दशरथ । लग्नोत्सव करी सुरहि सुखावत ॥
उर्मिला लक्ष्मण, भरत मांडवी । शत्रुघ्नहि वरी श्रुतकीर्ति नवी ॥ १ ॥

१२ **नरहरी**–प्र. च. १९ मात्रा. अंतीं ३ लघु १ गुरु. य. १४, ५.

रेणुका-पुत्र-दर्पातें मग हरी । निज-चाप भंग-कोपें ये मुनि जरी ॥
येउनी अयोध्ये सकळां सुखाविलें । तोषुनी भूप-मन-भारा नुरविलें ॥ १ ॥

१३ **दिंडी**–प्र. च. १९ मात्रा. य. ९, १०.

हींत ३, ६, ३, ३ अशा अवसानावर मात्रांचा योग. शेवटीं २ गुरु.

यौवराज्या रामासि द्यावयातें । धरी हेतू नृप, कैकयी तदा ते ॥
घेइ मागोनी वरदान दशरथासी । राज्य भरता, वनवास तो प्रभूसी ॥ १ ॥

१४ **रास**–प्र. च. २२ मात्रा. अंतीं २ लघु १ गुरु. य. ८, ८, ६.

पित्राज्ञेनें वर्ष चतुर्दश राम वनीं ॥
जातां शोकभरें नृप जाई स्वर्भुवनीं ॥
वरि धिक्कारुनि माय, भरतही जाय वना ॥
चित्रकूटिं मुनि-वेषिं येइ, धरि विभु-चरणां ॥ १ ॥

१५ **विष्णुपद**–प्र. च. २६ मात्रा अंतीं १ गुरु. य. १६, १०.

शांतवुनी त्या परत धाडुनी, जाई पंचवटीं ॥
विराध वधुनी शूर्पणखेची छेदि नासिका ती ॥
खर-त्रिशिर-दूषणादि वधितां लंकापति कपटी ॥
धाडि मारिच्या स्वर्णमृगरुपें, मुलळि जानकी ती ॥ १ ॥

१६ सार–प्र॰ च. २८ मात्रा. अंतीं २ गुरु. य॰ १६, १२.

स्वर्ण-कंचुकीस्तव विभु जाउनि दूर, वधी हरिणातें ॥
धांव सख्यारे व्यसनीं पडलों फोडि कपटि हाकेतें ॥
प्रभु-वच समजुनि पाठवि सीता दुर्वाचें जैं शेषातें ॥
रावण सीता नेउनि कपटें पथिं मारि जटायूतें ॥ १ ॥

१७ चौपाई–तिसरी-प्र. च. ३० मात्रा. अंतीं २ गुरु. य. १०, ८, १२

ये परतुनि सदनीं न दिसे सीता शोकभरें शोधी ते ॥
ने गृध्र मुक्तिला, मारि कबंधा, तारि तसें शबरीतें ॥
आणि सुग्रीवासह सख्य करुनि वधि वालि, धाडि शोधातें ॥
तों अठरा पद्में वानर चहुंदिशिं शोधिति जनक-सुता ते ॥१॥

१८ ताटंक-लावणी. प्र. च. ३० मात्रा. अंतीं २ गुरु॰ य॰ १६, १४.

जाय दक्षिणे त्वरें वायु-सुत शतयोजनशा सिंधूतें ॥
उल्लंघी आणि सुखवुनि सुरसा त्याही मैनाकातें ॥
वधुनि सिंहिका शिरे नगरें जों थोपवि लंकादेवी ते ॥
मारुनि लत्ता जाय तिजासि मग गुप्त-वेषें तो शोधी ते ॥ १ ॥

१९ त्रिभंगी-लावणी.–प्र. च. ३२ मात्रा. अंतीं १ गुरु. य॰ १०, ८, ८, ६.

तों अशोक-वनिं सति शिंशपं तरु-तालिं मृदुलकृशांगी अधोमुखी ॥
प्रभु-नाम चिंति, अति खिन्न देखुनी पुढति मुद्रिका कपि टाकी ॥
प्रभु-नाम-मुद्रिका बघुनि गहिंवरे, पाहि येइ कुणि चहूंकडे ॥
तैं मारुति पुढती हस्त जोडुनी स्व-वृत्त कथुनी पायिं पडे ॥ १ ॥

इतर मात्रासमवृत्तें.

दीप-प्र. च. १० मात्रा. अंतीं ३ लघु, १ गुरु व १ लघु. गोपाल-प्र. च. १५ मात्रा. अंतीं १ लघु, १ गुरु व १ लघु. य० ८, ७. अचलधृति-प्र. च. १६ लघु मात्रा. योग-प्र. च. २० मात्रा. अंतीं १ लघु व २ गुरु मात्रा. य० १२, ८. प्लवंगम-प्र. च. २१ मात्रा. अंतीं १ लघु १ गुरु १ लघु व १ गुरु. य० ८, १३. कुंडल-प्र. च. २२ मात्रा. अंतीं २ गुरु. य० १२, १०. हीर-प्र. च. २३ मात्रा. प्रथम वर्ग गुरु. य० ६, ६, ११. लीला-प्र. च. २४ मात्रा. अंतीं २ लघु व १ गुरु. य० ७, ७, ७, ३. सरसी-प्र. च. २५ मात्रा. अंतीं १ गुरु १ लघु. य० १६, ९. शुभगीता-प्र. च. २७ मात्रा. अंतीं १ गुरु, १ लघु व १ गुरु. य० १२, १५. रुचिरा प्र. च. ३० मात्रा. य० १४, १६. प्रत्येक यतीचे अंतीं गुरु. शिखा-यास दोन चरण असतात. प्रत्येकीं २८ व ३० मात्रा असून अंतीं १ गुरु. खंजा हें शिखाचें उलट आहे. ह्मणजे याचे दोन चरण असून प्रत्येकीं ३० व २८ मात्रा असतात. अंतीं एक गुरु. अनंगक्रीडा-यासही दोन चरण असतात. पहिले चरणीं १६ गुरु व दुसरे चरणीं ३२ लघु मात्रा असतात.

---

## भाग १० वा.

---

### मात्रार्ध सम-वृत्तें.

दोहा—याच्या विषम—१ व ३—चरणीं प्रत्येकीं तेरा मात्रा असून त्या ६, ४, ३ या अवसानावर येतात. यांत आरंभीं जगण येईल अशा मात्रा नसाव्या. सम-२ व ४-चरणीं प्रत्येकीं अकरा मात्रा असून त्या ६, ४, १ या अवसानावर येतात. एकूण ४८ मात्रांचा दोहा होतो.

वंदे साश्रुमुख जानकी, जो ममहृदयाराम ॥
सुर-मुनि-जन-हृद्-नलिन-शशि, कपे दावि मज राम ॥ १ ॥

रठा—हें वृत्त दाहा-वृत्ताच्या उलट होतें. ह्मणजे विषम-१ व ३ चरणीं मात्रा व सम-२ व ४-चरणीं तेरा माला असतात.

येरु देउनी धीर, ह्मणि अशोक वन निर्दलुन ॥
वधुनि राक्षसां अमित, करि अशेष लंका-दहन ॥ १ ॥

की—याच्या विषम-१ व ३-चरणीं प्रत्येकीं सोळा माला व सम-२ व ४-प्रत्येकीं बारा मात्रा असतात. प्रत्येक चरणांचे शेवटीं यति असतो. ५६ मालांचा हा छंद होतो.

पुनरपि उल्लंघुनी सिंधु ये स-गण वायु-सुत पाही ॥
श्रीरामा कथि जानकि-वार्ता, धीर तया मग येई ॥ १ ॥

ईकडे याला अनुक्रमें दहा व चौदा मात्रांचे असे आणखी दोन चरण जोडण्याचा प्रघात पडत चालला आहे.

शिळा-सेतु बांधुनी समुद्रा कपि-चमुसह लंकेतें ॥
येउनि, दशमुख स-कुल वधुनि दे बिभीषणा राज्यातें ॥
करि जो मुक्त ह्मणी ॥ विभु, जानकि साध्वि-शिराणी ॥ १ ॥

---

## भाग ११ वा.

### मात्रा-विषम-वृत्तें.

जननीगीत—याला सोळा मात्रांचे तीन व दहा मात्रांचा एक असे चार असतात.

जनवादास्तव भिउनी चित्तीं । करि सीतेची अग्निशुद्धि ती ॥
सोज्वळ देखुनि सुरवर मग ती । कुसुम-वृष्टि करिती ॥ १ ॥

**इतर-वृत्तें—रड्डा**-याच्या १, ३ व ५ या चरणीं प्रत्येकीं पंधरा, दुसऱ्या चरणीं बारा व चवथ्या चरणीं अकरा मिळून ६८ मात्रांचा हा छंद होतो. उत्कष्ठा-याचे सहा चरण असून प्रत्येक चरणीं ४, ४, ३ अशा तालाच्या अजमासानें अकरा मात्रा येतात. **रोला**-याचे चार चरण असून प्रत्येकीं चोवीस मात्रा येतात. मात्रांच्या क्रमाबद्दल नियम नाहीं. **गंधा**- याच्या विषम १ व ३ चरणीं प्रत्येकीं सतरा व सम-२ व ४ चरणीं प्रत्येकीं अठरा मात्रा येतात. लघु गुरुविषयीं नियम नाहीं. **चतुष्पदा**-चतुष्कलात्मक सात गण व एक गुरु मिळून ३० मात्रा आल्या ह्मणजे एक चरण होतो. असे चार चरण मिळून एक पाद व असे चार पाद मिळून हा छंद होतो. **षट्पद**-याच्या प्रत्येक चरणीं प्रथम दोन मात्रा, नंतर चार मात्रांचा एक असे पांच गण व शेवटीं दोन मात्रा मिळून एकंदर चोवीस मात्रा येतात. असे चार चरण व शेवटीं एक दोहा येतो.

---

## भाग १२ वा.

## आर्या व वैतालीय-वृत्तें.

**आर्या**—आर्येचा चार मात्रांचा एक गण होतो. हे गण पांच आहेत. मात्रावृत्तांत जे गण आहेत ते व हे एकच होत. हिचे पांच भेद आहेत. १ आर्या अथवा गाहा २ गीति अथवा उग्गाहा, ३ उपगीति अथवा गाहू, ४ उद्गीति अथवा उग्गाहा आणि ५ आर्यागीति अथवा साहिनी. हिच्या पहिल्या दोन चरणांस पूर्वार्ध व पुढच्या दोन चरणांस उत्तरार्ध ह्मणतात.

### १ आर्या अथवा गाहा.

ल०:—रवि[१२] विषमीं, द्वितियपदीं पुराण[१८] मात्रा, चतुर्थ तिथि[१५] सखया ॥
विषम स्थानीं जगण न येतांचि समज मनिं सुआर्या ॥ १ ॥

वि. च. बारा, दुसऱ्यांत अठरा व चवथ्या चरणीं पंधरा मात्रा. विषम स्थानीं जगण वर्ज्य.

करुनी खल-विध्वंसन, साधी सुर-कार्य, हरुनि भू-भार ॥
नंदिग्रामा विभु ये सहसीता त्वरा करुनि फार ॥ १ ॥

आर्या अथवा गाहा हिचे **पथ्या**, **विपुला**, व **चपला** असे मुख्य तीन भेद असून आणखी बरेच सामान्य भेद आहेत.

१ **पथ्या :**—ज्या आर्येच्या तिसऱ्या गणाचे शेवटीं ह्मणजे बाराव्या मात्रेच्या स्थानीं यति येऊन पद पूर्ण असतें, तिला **पथ्या** ह्मणावें.

ये दिव्य दृष्टि अंधा, पंगूतें चरण, वाणि मूकास ॥
वत्सा धेनु तसा तो प्रभु भेटे कृपाळु भरतास ॥ १ ॥

२ **विपुला :**—ज्या आर्येच्या तिसऱ्या गणाचे शेवटीं ह्मणजे बाराव्या मात्रेच्या स्थानीं यति येऊन पद अपूर्ण राहतें, तिला **विपुला** ह्मणावें.

हर्षे भरत-मयुरा, घननीळा देखोनि उत्कशा वेळे ॥
अति सद्गद धांवुनि विभु-चरणांवरि गडबडा लोळे ॥ १ ॥

३ **चपला :**—आर्येचे २, ४ व ६ हे गण जगण असतां तिला **चपला** ह्मणावें.

घेउनि तयासि जैं विभु सहर्ष नगरीं शिरे सदळभार ॥
होई प्रमोद सकळां सुपौरजनिं तो नसे पार ॥ १ ॥

## २ गीति अथवा उग्गाहा.

ल०—विषमीं द्वादश मात्रा, अष्टादशही तशाच समचरणीं ॥
विषम स्थानीं जगण न येतां, ह्मण तूं सुगीति हरिखोनी ॥ १ ॥

वि. च. बारा व स. च. अठरा मात्रा. विषम स्थानीं जगण वर्ज्य.

पाहुनि मंगल वेळा सिंहासनिं बैसतां प्रभू जाण ॥
सुर-नर-जयजयकारें दुमदुमलासे त्रिलोक, उपमा न ॥१॥

### ३ उपगीति अथवा गाहू.

ल०—द्वादश मात्रा विषमीं, समचरणीं पंचदश येती ॥
विषम स्थानीं जगण न उपगीति वदे सख्या तूं ती ॥ १ ॥

वि. च. बारा व स. च. पंधरा मात्रा. विषम स्थानीं जगण वर्ज्य.

जो हर-सहस्र वर्षें पाळी भू कुमति-तम-तरणी ॥
सत्कीर्ति गाति सकळहि कीं पद-नत-भव-जलधि-तरणी ॥ १ ॥

### ४ उद्गीति अथवा उग्गाहा.

ल०—रवि[12] विषमीं, द्वितियपदीं तिथि[15] सम, चवथ्यांत अंग[18] असती ॥
विषम स्थानीं जगण न येतां, वद तूं तियेस उद्गीति ॥ १ ॥

वि. च. १२ दुसऱ्यांत १५ व चौथ्यांत १८ मात्रा. विषमस्थानीं जगण वर्ज्य.

चिरसुखद मनोहर ही रामप्रभु-कवन सुमन-माळ ॥
धारण करितां कंठीं भव-भय करि पळ, धरी चरण काळ ॥ १ ॥

### ५ आर्या-गीति अथवा साहिनी.

ल०—द्वादश मात्रा विषमीं, समचरणीं गणी त्या तशाच विंशति तूं ॥
विषम स्थानीं जगण न आर्यागीति ह्मणे असा सु-कवि-हेतू ॥ १ ॥

वि. च. बारा व स. च. वीस मात्रा. विषम स्थानीं जगण वर्ज्य.

आधीं सहर्ष चाखुनि श्रीगंगाधर-पाद-पद्म-मकरंद ॥
मधुमक्षिका सुखें मी मग मधुसंग्रह करि परार्थ सुख-कंद ॥ १ ॥

**वैतालीय वृत्तें**—यांचा संस्कृतांत बराच प्रचार आहे. प्राकृतांत फारसा नाहीं. तथापि प्रसंगानुसार येथें कांहीं सांगतों.

१ वैतालीः—विषम चरणांत सहा व सम चरणांत आठ मात्रा असून प्रत्येक चरणाचे अंतीं १ जगण व १ गुरु असतो. यांत विशेष हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं सम संख्यांक मात्रा (२, ४ व ६ वगैरे) विषम संख्यांक

(३, ५ व ७ वगैरे) मात्रांशीं मिळून येऊं नयेत. जसें दयाळ या शब्दां-तील या ह्या अक्षरांत दुसरी व तिसरी ह्या मात्रा मिळून आल्या आहेत, असें न व्हावें. तसेंच दुसऱ्या व चौथ्या चरणांत पहिल्या सहा मात्रा केवळ लघु न येतां गुरुमिश्र याव्यात.

तरि राम-पदामृता सदा । पी सुखदा हरि तेंचि आपदा ॥
सतत गड्या ध्यास हा धरी । कीं सुखविन बुध मी परोपरी ॥ १ ॥

२ औपच्छंदसिक:—विषम चरणांत सहा व समचरणांत आठ मात्रां पुढें र आणि य हे गण येतात. बाकी सर्व नियम वैतालीप्रमाणेंच.

राम-चरित शुद्ध धर्म-नीति । एक वचन तशि एक पत्नि ख्याति ॥
निर्व्यसनी राहणी कशी ती । शिकवितसे नित सेवि तें सुचित्तीं ॥ १ ॥

३ आपातलिका—विषम व सम चरणांतलि अनुक्रमें सहा व आठ मात्रांपुढें भगण व दोन गुरु येतात. (वैतालीच्या सदर अक्षरांपुढें येणाऱ्या १ रगण १ लघु व १ गुरु यांना हा अपवाद आहे.) बाकी सर्व नियम वैतालीप्रमाणेंच.

प्रेमळता बंधुविशीं ती । मानावें वडिलां कशि रीति ।
भूतिं कसें प्रेम करावें । हें तच्चरितांत शिकावें ॥ १ ॥

४ दक्षिणान्तिका—चारही चरणांतील दुसरी व तिसरी या मात्रा मिळून येतात. बाकी सर्व नियम वैतालीप्रमाणेंच.

प्रयत्न नच टाकि तूं कदा । जरी तुला बहु येइ आपदा ॥
पहा शिळा-सेतु बांधुनी । समुद्र तो उतरी कसा झणी ॥ १ ॥

५ उदीच्यवृत्ति—फक्त विषम चरणांतील दुसरी व तिसरी ह्या मात्रा मिळून येतात. बाकी सर्व नियम वैतालीप्रमाणेंच.

धरोनि सुविचार अंतरीं । नित नृपाविषयीं प्रेम तूं करी ॥
मनीं धरी स्वामि-भक्ति ती । श्रीरामीं करित जेंवि मारुती ॥१॥

६ **प्राच्यवृत्ति**—सम चरणांतील चौथी व पांचवी ह्या मात्रा मिळून येतात. बाकी सर्व नियम वैतालीप्रमाणेंच.

असणें पति-निष्ठ तें कसें । शिकवि ते जनकजाहि शुद्ध-सें ॥
जरि आप्तहि, दुष्ट सोडुनी । सुपथ तो धरि, शिके बिभीषणीं ॥१॥

७ **प्रवृत्तक**—विषम चरणांत दुसरी व तिसरी व सम चरणांत चौथी व पांचवी ह्या मात्रा मिळून येतात. बाकी सर्व नियम वैतालीप्रमाणेंच.

सख्या जरि तुला खरोखरी । हवें सौख्य भज ईश तो तरी ॥
करोनि पान तत्कथामृता । सुख अखंड तें जोडि तत्वता ॥ १ ॥

८ **अपरान्तिका**—प्रवृत्तक छंदाच्या सम चरणांप्रमाणेंच याच्या चारही चरणीं चौथी व पांचवी ह्या मात्रा मिळून येतात.

देइ सौख्य नित्य सज्जनीं । धरि सुनीतिपथ जो भला जनीं ॥
सुगुण-खाणि होई अंतरीं । धन्य भूप नारायणापरी ॥ १ ॥

९ **चारुहासिनी**—यांत प्रवृत्तक छंदाच्या विषम चरणांप्रमाणेंच चारही चरणीं दुसरी व तिसरी ह्या मात्रा मिळून येतात.

सदैव नारायणा तरी । सु-भक्ति-भावें मनीं धरी ॥
सुकीर्ति होई त्रिलोकिं ती । सुमार्गिं ऐशा धरी मती ॥ १ ॥

### पज्झटिका.

हींत प्रतिचरणीं सोळा मात्रा असून आठव्या मात्रेच्यापुढें व अंतीं नित्य एक गुरु असतो. परंतु हींत कोठेंही जगण येतां कामा नये.

अनुपम राम-कथामृत-गोडी । चाखुनि अमरपणें सुख जोडी ॥
गंगाधर-नत हें तुज विनवी । स्वहित साधि ह्मणि मोहा त्ुरवी ॥

---

## भाग १३वा.

## फटके, कटाव, लावण्या, पदें वगैरे.

यांचा प्रचार मराठींत असल्यानें प्राचीन ग्रंथांत याविषयीं कांहीं सांगितलें नाहीं. ताल व सूर यांच्या साहाय्यानें प्रसंगोपात् निरनिराळ्या मात्रासंख्येच्या गणनेनें सदरहू प्रकार होतात. याचसाठीं यांना विशेष नियमबद्धही करितां येत नाहीं. तथापि प्रचारांत असलेल्या प्रकारावरून जे ठोकळ नियम दृष्टीस पडतात त्यांतून येथें कांहीं सांगतों.

**फटका**:—ह्यांत प्रतिचरणीं ३० मात्रा असून शेवटीं १ गुरु असतो. बहुधा सहा अगर त्यांहून कांहीं जास्त चरण झाले ह्मणजे दुसऱ्याच चालीचे चार चरण येतात. त्यांतही प्रतिचरणीं १४ मात्रा असून शेवटीं १ गुरु असतो. पुन्हां आणखी ३० मात्रांची एक अगर दोन ओळी आल्या ह्मणजे कडवें पुरें होतें. कडवें पुरें होतांच पहिला अगरा दुसरा अथवा दोन्ही चरण ह्मणण्याची वहिवाट आहे तीस ध्रुवपद असें ह्मणतात. हें ध्रुवपद लावण्या, पदें, अभंग वगैरेंत येण्याची फार वहिवाट आहे. एका फटक्यांत १, २, ३ अगर त्यांहून जास्त कडवीं असूं शकतात. यति ८, ८ मात्रांच्या अनुसंधानानें बहुधा असतो.

विविध-धर्म-पथ-मताभिमानें धुंद होऊनी तुह्मि जगतीं ॥
श्रेष्ठ धर्म इतरांहुनि अमुचा विवाद करितां मूढमती ॥ ध्रु० ॥
मानुनि इतरां क्षुद्र जगामधिं वृथा मिरवितां प्रौढी ती ॥
धर्म-मार्ग सामान्य सकळिकां सूक्ष्म-दृष्टि कशि लोपलि ती ॥
क्षुधा-तृषा-गद-जन्म-मृत्यु-सुख-दुःख सर्व-जनिं सम-रीति ॥
सारासारविचार जरा तरि करा सोडुनी ती भ्रांति ॥
चाल—असे एक विभु जगीं खरा । सर्व मुलें त्या शुभंकरा ॥
सान थोर नच भेद बरा । विश्वबंधु-पथ हाच धरा ॥

॥ पू. चा. ॥ स्वधर्म राखा प्राणाहुनि परि, वदा न अन्या कटु उक्ति ॥
गंगाधरनत कथित विनययुत मिळेल सुख मग सहजगती ॥ १ ॥

कटाव—ह्यांत बहुधा सोळा सोळा मात्रांचे चार, सहा प्रसंगीं आठही चरण एकाच यमकाचे येऊन पुढें तसेच आणखी कांहीं चरण निराळ्याच यमकाचे येतात. त्यांच्याही पुढें निराळ्याच यमकाचे आणखी कांहीं चरण येतात. त्यांत कित्येक वेळां कांहीं चरण बारा मात्रांचेही असतात. कित्येक वेळां चार आठ किंवा बारा मात्रांचे कांहीं तुकडे येतात. चरणाचे शेवटीं गुरु नसला तरी चालतो. ताल धरून कोणी ह्मटला असतां ऐकतांना हा गोड लागतो. हा शीघ्रकवित्वास फार उपयोगी पडतो.

सज्जन हो धरणें नीट मनीं, कथितों दुर्व्यसनीं काहाणी ॥ ध्रु० ॥
मद्यसेवनीं सौख्य मानुनी सर्वस्वावरि लाथ मारुनी धुंदपणें
सुविचार सोडुनी जाय तयामधिं गुंग होउनी नृपपथिं लोळे गर्दभ
जसा, हसुनि वदति जन पशुसम कैसा उरेन जवळीं एकहि
पैसा कुणी न बोले संनिध बैसा, घरीं बायकामुलें उपाशी तरी
न खंती मुळीं तयाशीं जडे व्याधि बहु ती शरिराशीं कदा न
वाटे सौख्य मनासी धुंद बहुवसी तयांत त्याचे इष्टमित्र ते
बहु दुर्व्यसनी जमति भोंवते कुणि गांजेकस अफू भक्त कुणि
अफीम सेवुनि गांजा ओढिति भांग घोंटिती इतरां ध्याया आग्रह
करिती द्रव्य गृहाची माती होई तरी न पर्वा त्यासी लवही
सावकार तो बाहेर काढी दारिद्र्यास्थिति येइ रोकडी तरी न राहे
जरा गुडगुडी कुणी न देई उसनी कवडी मग भिक्षेची दुर्धर
पाळी आलि कपाळीं करि देशांतर तो तात्काळीं पश्चात्तापें बहू
तळमळी ह्मणे मनामधिं सर्वहि काळीं अरेरे व्यसनामाजिं गढोनी
गेलों सर्वस्वा मुकुनी ॥ १ ॥

लावणी व पदें—यांतही कविलोक आपल्या इच्छेनुरूप चरण, अंतीक मात्रांची संख्या व कडवीं हीं ठरवितात. याचप्रमाणें पोवाडे वगैरे अनेक प्रकारांबद्दल जाणावें. या वरील सर्व प्रकारांत प्रायः ताल अगर ठेका साधला ह्मणजे झालें. कारण कित्येक वेळां असें होतें कीं ताल न जमल्यानें योजलेल्या चालीप्रमाणें ह्मणतां येत नाहीं. हें पुढें एक उदाहरण देतां त्यावरून दिसून येईल. 'भूरती खरे तें वैभवसुख सेवीती' हा बावीस मात्रांचा चरण असून ह्यांत १०।१२ मात्रांच्या ठिकाणीं यति आहे. ही गोष्ट लक्षांत न घेतां ह्मणजे ठेका सोडून कशी बशी बावीस मात्रांची भरती करून '**भूरति सेविति वैभवसुख तें खरोखरी**' असा चरण रचल्यास तो वरील चालीप्रमाणें ह्मणतां येणार नाहीं. कांकीं त्या चालीस अनुसरून असणारे यति त्यांत नाहींत.

* लावणी–चाल ( गाद्या, गिरद्या. )

इन्द्र-चन्द्र सुर-वृन्द विमानीं बसुनि चालला कुठें? ॥ आजि हो ॥
सुमनोहर गंधर्व-अप्सरा-मंजुध्वनि कां उठे? ॥ ध्रु० ॥
चिंति असे तों दैववशें मीं नवल एक देखिलें ॥ आजि हो ॥
गमे खास मम पूर्व-जन्मिचें भाग्य उदय पावलें ॥
कीं स्वर्गंगा झाली यमुना, इंद्रप्रस्थ सुरपुरी ॥ आजि हो ॥
इंद्र-सभा तशि खालिं उतरली त्रिभुवनसुंदर खरी ॥ १ ॥
शक्र जॉर्ज शचि मेरि राज्ञिसह सुखें येइ भूवरी ॥ आजि हो ॥
भरतभूमि-राज्यासनिं बैसुनि महोत्सवातें करी ॥

---

* तारीख १२ डिसेंबर सन १९११ रोजीं हिंदुस्थानची प्राचीन सुप्रसिद्ध राजधानी हस्तिनापूर येथें परमपूज्य सार्वभौम बादशहा पंचम जॉर्ज व महाराज्ञि मेरी यांच्या राज्यरोहणोत्सवानिमित्य जो अपूर्व व भव्य दरबार भरला त्या मंगल दिवशीं कर्त्यानें बादशहा व महाराज्ञि यांच्या कंठीं अत्यानंदानें अर्पण केलेल्या 'पद्य कुसुम हारांतून' हें व पुढील पृष्ठावरील पद्य निवडून घेतलेलें आहे.

रवि-शशि-वरुणादिक सुरवर हे मांडलीक भूपती ॥ खरोखर ॥
**शाहु-सयाजी-माधवरूपें** दिसति पहा संप्रतीं ॥ २ ॥
अखिल भरतजन-हृदय-सिंधु हा, नृपशशि देखुनि खुले ॥ कितितरी ॥
वरि तन-मन-धन-रत्नें उधळुनि हास्यमुखें बहु डुले ॥
रम्य नभोवनिं प्राचि-सरोवरिं सूर्य-कमलही हंसे ॥ आज तें ॥
दिशासुंदरी प्रमुदितवदना अणु रेणूही तसे ॥ ३ ॥
सार्वभौम-वैभवें अतुल-सा पंचम **जॉर्ज** गुणी ॥ एक हा ॥
**युधिष्ठिराहुनि** हाच भेटला येउनिया दुर झणी ॥
अपूर्व हा इतिहासीं सुर[33]-वसु-शशि-शक मंगलदिन ॥ खरोखर ॥
मार्गशीर्ष तिथि कृष्ण सप्तमी गेलें मन मोहुन ॥ ४ ॥

पद–चाल ( उद्धवा शांतवन. )

श्री**मेरिराज्ञि**-सुतसह तूं । हो विजयि **जॉर्ज** भूपाला ॥ ध्रु० ॥
आयुरारोग्य लाभोनी । करि उदंड दिन, राज्याला ॥
गुरु-देव-जनक-माता हीं । प्रत्यक्ष तूंचि आह्मांला ॥
तरि शुद्ध अचल भक्तीनें । वाहिलें चरणिं शिर-कमला ॥
चाल–वात्सल्य धरुनि सांभाळी । ही भरतभूमि बा सक[illegible] ॥
दे तिला सौख्य चिरकाळीं । पू. चा. । प्रार्थना हीच चरणांला ॥ १ ॥

**गंगाधर**गुरुरायें कृपा केली ह्मणोनियां ।
**छंदोगंगाधरी**नाम येथें पूर्वार्ध संपला ॥१॥



# उत्तरार्ध.

## साहित्यलक्ष्मी.

### भाग १ ला.

### शब्दार्थविवेचन.

शब्द हा एक प्रकारचा नादयुक्त वायु आहे. कर्णा, अलगुजा, सनई वगैरे वाद्यविशेषांत वायूचा स्रोत सोडला असतां जसा नाद उत्पन्न होतो तद्वत् प्राण्यांच्या हृत्कमलां (फुप्फुसां) तून निघालेला वायूचा स्रोत कंठनलिकेंत शिरून तेथून तिच्या विविक्षित मोडणीच्या साहाय्यानें तो मुखावाटें बाहेर प्रकटतो त्यास ध्वनि ह्मणतात. आणि त्यांपैकीं जे मनोगतसूचक ध्वनि आहेत त्यांस रेषात्मक चिन्हांनीं दर्शविलें असतां वर्ण ह्मणतात. एक अथवा अधिक वर्णांपासून कांहीं अर्थ निष्पन्न झाल्यास त्यांस **शब्द** ह्मणतात. हे **शब्द** १ **रूढ**, २ **यौगिक** व ३ **मिश्र** असे तीन प्रकारचे असतात.

१ **रूढः**—प्रकृति व प्रत्यय यांनीं ज्यांची व्युत्पत्ति होऊं शकत नाहीं ते रूढ शब्द जाणावेत. जसें, **मंडप**. यांत मंड ह्मणजे दह्यावरील निवळी व प ह्मणजे ती पिणारा. अर्थात् कोणी एक मनुष्य असा अर्थ असतां त्याचा बाध होऊन लग्नोत्सवादिकांत जो मांडव घालतात तो. असा निराळाच अर्थ रूढ झाला आहे.

२ **यौगिकः**—गुण, क्रिया व संबंध यांच्या संयोगानें होणाऱ्या ह्मणजे प्रकृति, प्रत्यय किंवा इतर अनेक अर्थवंत शब्द यांचा परस्पर योग होऊन अर्थ व्हावयाजोग्या झालेल्या शब्दास **यौगिक** ह्मणतात. १ **नीलकंठ**. यांत नील

हा गुग आहे. याचप्रमाणें **पंचबाण, षण्मुख, अष्टश्रवा** वगैरे. २ **क्रियेच्या** अर्थसाहाय्यानें होणारे शब्द. जसें, **भूप** यावरून भूमीस पालन करणारा ह्मणजे राजा असा क्रियार्थानें बोध झाला. ३ **संबंधावरून** होणारे शब्द जसें, **विश्व-विधाता** यावरून विश्वघडविणारा असा **जन्यजनक** संबंध सूचित होतो. तसेंच वृषध्वज, **अमृतभुज, राम**पति, **श्रीकृष्ण**मित्र, वृषवाहन, **आत्मज**, दिवौकस, त्रिपुरांतक व **कालिदास** हीं; **धार्यधारक, भोज्यभोजक, पतिपत्निक, सखिसंबंधक, वाह्यवाहक, ज्ञातेय, आश्रयाश्रय, वध्यवध्यक व सेव्य-सेवक** यांचीं अनुक्रमें उदाहरणें होत. याप्रमाणें अनेक **यौगिक** शब्द होतात.

३ मिश्र—योग व रूढि यांच्या अपेक्षेनें सिद्ध होणाऱ्या शब्दास मिश्र असें ह्मणतात. जसें, **पंकज.** यांत पंक ह्मणजे चिखल व ज ह्मणजे उत्पन्न झालेले कमळ, बेडूक वगैरे. असा क्रियार्थानें यौगिक अर्थ असतां येथें पंकज ह्मणजे **कमळ** असाच अर्थ घेण्याची रूढि असल्यानें योग व रूढि यांनीं तयार झालेला हा मिश्र शब्द होय. याचप्रमाणें इतरही जाणावें. वरील सर्व प्रकारच्या शब्दांचे अर्थावरून १ **वाच्यार्थ**, २ **लक्ष्यार्थ** व ३ **व्यंगार्थ** असे तीन प्रकारचे भेद साहित्यशास्त्रांत मानिले आहेत.

१ **वाच्यार्थ**—यांत शब्दांचा सरळ व मुख्य ह्मणजे सांकेतिक अर्थ असतो. जसें, **गृह देह** व **अश्व** या शब्दांचा अनुक्रमें घर, शरीर व घोडा असा सरळ अर्थात् सांकेतिक अर्थ आहे. शब्दांचा सरळ अर्थ दर्शविणाऱ्या या शक्तीस **अभिधा** किंवा **शब्दशक्ति** असें ह्मणतात.

२ **लक्ष्यार्थः**—जेव्हां भाषेंतील रूढीवरून अगर गूढ अभिप्रायसूचक शब्दावरून मुख्यार्थाशीं जुळेल अशा शब्दार्थास ध्यानांत घ्यावें लागतें तेव्हां त्यास **लक्ष्यार्थ** असें ह्मणतात. जसें, "परम पूज्य सम्राट् बादशहा पंचम जार्ज व महाराज्ञी मेरी यांच्या दिल्ली येथें तारीख १२ डिसेंबर सन १९११ रोजीं झालेल्या अपूर्व राज्यारोहणोत्सवानें सर्व '**हिंदुस्थान**' हर्षातिरेकानें भरून

गेला होता. या वाक्यांत 'हिंदुस्थान' या पदाचा वाच्यार्थ हिंदुस्थानचा भूप्रदेश असा आहे. आणि भूप्रदेश अचेतन असल्यानें हा अर्थ वाक्यांतील तात्पर्यार्थाशीं जुळत नाहीं; तेव्हां लक्षणेनें हिंदुस्थान याचा त्यांतील लोक असा तात्पर्यार्थाशीं जुळणारा वेगळा अर्थ मानावा लागतो. लक्ष्यार्थ दर्शविणाऱ्या या शब्दशक्तीस **लक्षणा** असें ह्मणतात.

ही **मुख्यार्थाच्या सादृश्यावरून** व **इतरसंबंधावरून** अशी दोन तऱ्हेनें होते. त्यांस अनुक्रमें **गौणी** व **शुद्धा** अगर **संबंध–निबंधना** असें ह्मणतात.

१ **गौणी**:—हिचे १ **सारोपा** व **साध्यवसाना** असे दोन भेद आहेत. जेव्हां विषय व विषयी यांचा एकाच विभक्तींत स्वतंत्र उल्लेख असतो, तेव्हां **गौणी–सारोपा**–लक्षणा होते. जसें, **हरि केवळ बृहस्पति आहे.** यांत **हरि** हा विषय व **बृहस्पति** हा विषयी असून त्यां दोहोंचा एकाच विभक्तींत स्वतंत्र उल्लेख आहे. तसेंच जेव्हां **विषय** व **विषयी** यांचा अभेदरूपानें उल्लेख होतो तेव्हां **गौणी–साध्यवसाना–लक्षणा** होते. जसें, **अरे हा बृहस्पति!** यांत **हरि** हा **विषय** व **बृहस्पति** हा **विषयी** या दोहोंचा अभेदरूपानें उल्लेख आहे.

२ **शुद्धा**–अथवा **संबंध–निबंधना**:— वाच्यार्थाशीं **सादृश्याहून अन्य** गोष्टींचा संबंध असतां ही लक्षणा होते. हिचे १ **उपादान–लक्षणा** व २ **लक्षण–लक्षणा** असे दोन भेद आहेत. १ **उपादान–लक्षणा**–मुख्यार्थाचा **संबंध** जुळण्यासाठीं जेव्हां लक्ष्यार्थाचा संग्रह करावा लागतो तेव्हां ही लक्षणा होते. ह्मणजे हींत शब्द अगर वाक्य यांतील मुख्यार्थ न सोडतां लक्ष्यार्थाचा संग्रह होतो. जसें, "**शस्त्र व लेखणी या दोहों वस्तूंकडे पाहिलें असतां लेखणीच सामर्थ्यवान् आहे.**" यांतील **शस्त्र** व **लेखणी** या शब्दांनीं अनुक्रमें शस्त्र व लेखणी धारण करणारे असा अर्थ मुख्यार्थ न सोडतां लक्ष्यार्थानें संग्रहित झाला आहे. २ **लक्षण–लक्षणा**:—जेव्हां पदांतील मुख्यार्थाचा बोध होण्या-

साठीं वाच्यार्थाचा त्याग करावा लागतो तेव्हां ही लक्षणा होते. जसें, **विष्णु गंगेवर राहतो.** यांत गंगेचें पाणी अस्थिर व प्रवाही असून त्यावर राहणें असंभवनीय असल्यानें गंगेवर या पदाच्या वाच्यार्थाचा त्याग करून तिच्या कांठीं राहतो असा दुसराच अर्थ मानावा लागतो. याशिवाय **निरूढ, प्रयोजनवती,** अधिकार्थसंग्रही, **साहचर्या, विपरीता,** व **लक्षिता** असे हिचे आणखी भेद आहेत. १ जोड्यांत पाय घालणें असा वस्तुतः अर्थ असतां रूढीनें **पायांत जोडा घाल** असें पद येतें. ही **निरूढ–**लक्षणा होय. २ **केशव बदरिकाश्रमीं राहतो.** या वाक्यावरून बदरिकाश्रमास उचित असे विवेक वैराग्यादि गुण केशवामध्यें आहेत असा अर्थ घ्यावा लागतो. ही **प्रयोजनवतीलक्षणा** होय. ३ मुख्यार्थ असूनही अधिकार्थांचा संग्रह होतो. जसें, मुलांनो दंगा करूं नका. या वाक्यावरून नुसते स्वस्थ बसा, एवढाच अर्थ न घेतां अभ्यासही करा; असा आणखी अर्थ घ्यावा लागतो. ही **अधिकार्थसंग्रहीलक्षणा** होय. ४ **मोळी जाते.** यांत मोळीच्या सांनिध्यानें **मोळीवाला**–मोळी घेऊन जाणारा मनुष्य जातो असा बोध होतो. ही **साहचर्यलक्षणा** होय. ५ **भद्रमुख** याचा मंगलमुख असा खरा अर्थ असतांही येथें **अभद्रमुख** असा विपरीतबोध होतो. ही **विपरीतलक्षणा** होय. ६ **द्विरेफ.** ज्याच्या वाचक शब्दांत दोन रेफ ह्मणजे रकार आहेत तो ह्मणजे भोंगा असा अर्थ होतो. योगरूढशब्दयुक्त ही **लक्षितलक्षणा** होय.

३ **व्यंग्यार्थः**—यांत वाच्यार्थ व लक्ष्यार्थ ह्यांहून तिसराच अर्थ निष्पन्न होतो. जसें, **शाबास चारुदत्ता, तुला पाहून स्वर्गस्थ कर्णही लज्जित होईल!** यांत चारुदत्ताचें औदार्य कर्णापेक्षांही जास्त आहे, असा निराळाच अर्थ ध्वनित होतो. व्यंग्यार्थ प्रकट करणाऱ्या या शक्तीस **व्यंजना** ह्मणतात.

---

## भाग २ रा.
## काव्यलक्षण, हेतु व प्रकार.

**सहृदयांच्या** सद्वृत्तींतून प्रकट होणारी **ओजस्** व **निसर्ग** वाणी, जिच्यायोगें ऐकणाऱ्यांचें अंतःकरण तिशींच तत्क्षणीं तादात्म्य पावतें; अर्थात् शब्द व अर्थ या दोहोंच्या योगें एखाद्या खऱ्या अगर काल्पनिक वस्तूचें वर्णन सहृदयांच्या अंतःकरणास चटका लावणारें झालें ह्मणजे त्यास **काव्य** ह्मणावें. काव्य हें रसिकांच्या अंतःकरणास जसें चटका लावितें तद्वत् साधारण मनुष्यासही हळूहळू रासिक बनवितें. कविलोक

काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये ।
सद्यःपरनिर्वृतये कांतासंमिततयोपदेशयुजे ॥ १ ॥ **मम्मट.**

यश, अर्थ, व्यवहारशिक्षण, अमंगलपरिहार, तात्काल आनंद आणि कांते प्रमाणें गोड व मधुर शब्दांनीं दुसऱ्यास उपदेश करणें इत्यादि हेतु मनांत धरून काव्य—लेखन करितात. कसें तें पहा,

**यश**—कालिदास वस्तुतः कोणी पराक्रमी राजा अगर वीरपुरुष अथवा उदारधी नसतांही केवळ काव्यलेखनानें अजरामर झाला. याचप्रमाणें शेक्सपियर वगैरे कवीबद्दल जाणावें. **अर्थ**-धावक कवीला काश्मीरदेशीय श्रीहर्षराजापासून धनप्राप्ति झाली. याचप्रमाणें इतर कवींबद्दलही जाणावें. **व्यवहारशिक्षण**—व्यास, वाल्मिकि वगैरे पूज्य महर्षींच्या सत्काव्यांनीं आजवर असंख्य जीवांना व्यवहार-शिक्षण मिळालें असून अव्याहत मिळत आहे. **अमंगलपरिहार**—मयूर नामक एका कवीस कुष्टरोग होता. त्यानें तो अति कंटाळून हरिद्वारीं गंगातटाकीं एका झाडाच्या फांदीस शिंकें बांधून त्यांत बसला. आणि निर्धारानें सूर्यस्तुति करूं लागला. मनांतील आशय हाच कीं काव्यरूप सूर्यस्तुतीनें रोग बरा झाला तर ठीक ! नाहीं. पेक्षां शिंकें तोडून देह गंगार्पण करावयाचा. पुढें सूर्यानें प्रसन्न होऊन त्यास रोगमुक्त केलें. **तात्काळ आनंदः**—काव्यलेखनानें लेखक व वाचक ह्यां-

दोहोंसही आनंद होतो हें उघड आहे. आणि धर्म, नीति व व्यवहार इत्यादि कठिण व रुक्ष भासणारे विषय काव्यमाधुर्यानेंच प्रिय व पथ्यकर वाटतात.

अहाहा! काव्य हा शब्द किती मधुर! किती रमणीय व किती पवित्र आहे बरें! काव्य हा पंचप्राणांहूनही प्रियकर व अति महत्वाचा असा प्राणिमात्रांचा सहावा प्राण होय. व्यक्ति, कुटुंब, ज्ञाति, समाज, राष्ट्र, धर्म व नीति या सर्वांसही तें जीवन आहे. भणंग, श्रीमान्, वैभवशालीसम्राट्, सुखानंदांत मग्न असलेला योगीराज अगर जीवितास कंटाळलेला अभागी या सर्वांस तें सारखेंच हंसवितें, रडवितें, व बोलवितें. फार काय एखाद्या जादूगाराप्रमाणें तें त्यांना भारून टाकितें. प्राणीमात्रांस चतुर्विध पुरुषार्थ तेंच प्राप्त करून देतें. चिंतामणी, कल्पवृक्ष अगर कामधेनु हीं त्यापुढें सर्वस्वी क्षुद्र होत! काव्यसेवनानें मनोवृत्ति उचंबळून अंतःकरणाची स्थिति उदार होते. तात्पर्य सर्व जगांत त्याइतकें दुसरें कांहींच मोलवान नसेल! आणि जीवन्मुक्तांचा ब्रह्मानंद व रसिकांचा काव्यानंद हे एकच होत असेंहि ह्मटल्यास चालेल.

**काव्याचे प्रकार**—काव्याचे १ व्यंग्य अथवा ध्वनिकाव्य २ गुणीभूतव्यंग्यकाव्य आणि ३ चित्रकाव्य असे तीन भेद आहेत.

**१ व्यंग्य अथवा ध्वनिकाव्य**—पदांतील सरळ असणारा जो सांकेतिक वाच्यार्थ त्याहून गर्भितार्थ निराळा असणें अर्थात् ज्यांत गर्भितार्थाला महत्व असतें तें व्यंग्य अथवा ध्वनिकाव्य जाणावें. जसें,

आर्या. देखुनि जनकनृपा तुज खिन्नचि होतील तेहि शुक-सनक ॥
तेंवि सकल नृप-गण ते करितिल निंदा तुझी सख्या देख ॥ १ ॥

यांतील वाच्यार्थ उघड आहे. आतां व्यंग्यार्थ पहा, जनक राजाच्या ठिकाणीं शुकसनकादिकांनींही मान डोलविण्याजोगा ब्रह्मनिष्ठपणा व इतर राजांपेक्षां राज्यशकट हाकण्याचें चातुर्य अधिक आहे हा व्यंग्यार्थ वाच्यार्थाहून निराळा आहे. व त्यासच येथें प्राधान्य असल्यानें हें उत्तम काव्य जाणावें.

२ **गुणीभूत-व्यंग्यकाव्य**— ज्यांत वाच्यार्थ व व्यंग्यार्थ हे दोन्हीही सारखेच येतात तें गुणीभूतव्यंग्यकाव्य जाणावें. जसें,

शा. वि. श्रीशें उग्र नृसिंहरूप धरुनी अक्राळ विक्राळसें ।
जेव्हां तो वधिला हिरण्यकशिपू तैं होउनी दीनसे ॥
भीतीनें कर जोडुनी असुर ते दैन्या बहु दाविती ।
तेणें ये करुणा प्रभूसि मग तो सोडोनि दे त्यांप्रती ॥ १ ॥

यांत राक्षसांनीं प्रभूपुढें हात जोडून दीनता दाखविणें हा अर्थ वाच्य व प्रभूनें आपणांस मारूं नये हा अर्थ व्यंग्य असून दोन्हीही सारख्याच चमत्कारीक रीतीनें आले असल्यानें हें **गुणीभूत** अथवा **मध्यमकाव्य** जाणावें.

३ **चित्र-काव्य**—ज्यांत व्यंग्यार्थ स्पष्ट नसून पदांतील वाच्यार्थास महत्त्व असतें ह्मणजे शब्द किंवा अर्थ अथवा दोन्हीही सुंदर असतात, तें **चित्र**काव्य जाणावें. जसें,

आर्या. श्रीरामा सुखधामा हृद्विश्रामा मनोरमा रामा ।
वरिली मेघःश्यामा शिव-धनुर्भंगें त्रिलोक-अभिरामा ॥ १ ॥

यांत व्यंग्यार्थ स्पष्ट नसून रामा, धामा, मनोरमा वगैरे शब्दरचना व तदंगभूत अर्थ हीं चमत्कारिक असल्यानें हें **चित्रकाव्य** अथवा अधमकाव्य जाणावें.

---

## भाग ३ रा.

## काव्यलेखन व त्याचे वर्णनीय विषय.

काव्यलेखनाचे **गद्य, पद्य** व **मिश्र** असे तीन प्रकार असून पुन्हां त्यांचे **दृश्य** व **श्रव्य** असे दोन भेद आहेत. उत्तम **वक्तृत्व** हेंही एकप्रकारचें काव्यच होय. १ गद्यांत सामान्यतः सरळ वाक्यरचना असते. एखाद्या भाषेच्या

रूढीप्रमाणें प्रसंगोपात्त ती वाक्यरचना मागें पुढेंही असूं शकते. पण जी वाक्यरचना सामान्येंकरून ताल व सूर यांवर ह्मणतां येत नाहीं तिला गद्य ह्मणावें. कादंबरी, दशकुमारचरित हे संस्कृत ग्रंथ अथवा हिंदुस्थानकथारस, मोचनगड वगैरे प्राकृतग्रंथ हे गद्यकाव्यलेखनाचे दर्शक होत. २ ताल व सूर यांहीं युक्त व छंदशास्त्रदृष्टया योग्य अशी जी शब्दांची विशिष्ट मांडणी ती पद्यकाव्यरचना होय. महाभारतादि संस्कृत ग्रंथ अगर ज्ञानेश्वरी, भावार्थरामायण वगैरे प्राकृत ग्रंथ हे पद्यकाव्यरचनेचे दर्शक होत. मिश्रप्रकारांत कांहीं गद्य व कांहीं पद्य असा भाग असतो. अभिज्ञानशाकुंतल, उत्तररामचरितादि संस्कृत ग्रंथ अथवा सौभद्र, शारदा वगैरे मराठी ग्रंथ मिश्रकाव्यरचनेचे दर्शक होत. रामायण, महाभारतादि काव्यें श्रव्य होत. आणि शाकुंतलादि काव्यें दृश्य होत. श्रव्यकाव्यापेक्षां दृश्यकाव्याचा मनावर विशेष परिणाम होतो. यावरून कोणी असें समजूं नये कीं, भाषेच्या रूढीप्रमाणें गद्य अगर छंदःशास्त्रयुक्त पद्यरचना झाली ह्मणजे काव्य झालें. काव्यलेखन करण्याचीं तीं साधनें होत. काव्याचें जें लक्षण मागील भागांत सांगितलें आहे तें तर त्यांत मुख्यत्वें असलें पाहिजे. न पेक्षां ती केवळ त्या त्या प्रकारची रचना होय इतकेंच. सुंदर रीतीनें शृंगारलेलें असतांही प्रेत जसें त्याज्य, तद्वत् जींत काव्य-लक्षण नाहीं ती गद्य अगर पद्यरचनाही व्यर्थ. हें ध्यानीं धरिलें पाहिजे. याचप्रमाणें समयानुरूप मनोविकारदर्शक आविर्भाव यांनीं श्रोत्यांचे ठिकाणीं अष्टही भावादिकांचें उद्दीपन करण्याचें सामर्थ्य ज्या वाणींत नाहीं त्या वाणीस काव्य ह्मणतां येणार नाहीं. असो, वरील सर्वप्रकारच्या रचनेंत पद्यात्मकरचना विशेष महत्वाची असून तींत काव्यरस विशेष खुलतो. कारण हर्षशोकादि मनोविकार अगदीं प्रबळ झाले ह्मणजे त्यासरसी पद्य प्रकट होतें व तें ताल व सूर यावांचून होत नाहीं. अहाहा! गायन हें किती गोड आहे बरें! तें प्रिय नाहीं असा एकही प्राणी सांपडणार नाहीं! गानानंदानें संकल्पविकल्पलहरी तत्क्षणीं

नाहतिशा होतात. त्यायोगें प्राणिमात्रांची एकतानता होऊन त्यांना आपल्या दुःखाचा क्षणैक विसर पडतो. पहा हरिणेंसुद्धां पारध्यांनीं पसरलेलें जाळें प्रत्यक्ष पाहूनही त्याच्या मोहक गाण्यास लुब्ध होतात. साळुंखी, मैना वगैरे पक्षी आपल्या मधुर व अस्पष्ट कलरवांनीं आपलें व इतर पांथस्थांचें मन रंजवितात. वसंतऋतूंत नूतन पल्लव फुटलेल्या आम्रवृक्षावर बसून कोकिळेनें काढलेला पंचम स्वन कोणास प्रिय होणार नाहीं ? बायका दळतांना अगर कांडतांना अथवा मुली फुगड्या घालतांनाही प्रसंगोपात्त गाण्याच्या बहारींत येतात. खेळाच्या भरांत लहान मुलेंही 'चांदोबा चांदोबा भागलास कां?.' वगैरे रीतीनें नैसर्गिक सुरानें ह्मणतांना आपण पाहतों. वेडावांकडा सूर काढून आपल्या आवडीच्या लावण्या ह्मणत कुळंबीही स्वतांशीं रमून कृषिकर्म चालवितात. डोक्यावर मोठमोठीं ओझीं घेऊन माळणी अगर ओझीवाले गाण्याच्या भरांत कोसाचे कोस मजल मारितात. फार काय एकुलत्या जिवलग पुत्राचा वियोग झालेला पिता अथवा साम्राज्यहीन झालेला सम्राट्सुद्धां गाण्याच्या भरांत आपलें दुःख क्षणैक विसरतो. तात्पर्य, कोणत्याही देशांत, कोणत्याही काळीं, रानटी अगर उन्नत लोकसमाजाकडे पाहिलें असतां असें दिसून येईल कीं, त्या सर्वांना गायन हें प्रियच आहे. आतां रानटी लोकांतील शाहीर आपल्यांतील जो कोणी मोटा शिकारी, तिरंदाज अगर पेहेलवान असेल त्याच्या स्तुतीनें युक्त असलेलीं गाणीं गातील आणि समाज सुधारलेला असेल तर त्यांतील वाल्मिकि, व्यास, कालिदास, भवभूति, अगर पोप, होमर, शेक्सपियर यांसारखे जगद्विख्यात महाभाग कवि धर्म-नीति-व्यवहार व निसर्गदेवता वगैरे विषयांच्या वर्णनानें युक्त व उच्चमनोवृत्ति विकासविणारीं अशीं गाणीं गातील इतकेंच.

असो, पद्यात्मकरचनेंत असलेला हा काव्यौघ गद्यांतील काव्यौघापेक्षां अनेक पटीनें रमणीय व मनोरम असला तर ती पद्यात्मकरचना चिरस्थायी होऊन तिचा विलक्षण प्रसारही होतो. हें वाल्मिकि, व्यास, कालिदास, भवभूति अगर पोप, होमर इत्यादि प्रतिभासंपन्न महाभाग कवींचीं दिव्य काव्यें अमर

व सर्वांस प्रिय झाली आहेत; यावरून दिसून येईल. तात्पर्य, पद्यात्मककाव्याचा महिमा विशेष असल्यानें प्रस्तुत ग्रंथांत त्याचेंच वर्णन मुख्यत्वें केलें आहे. यावरून गद्यादिलेखनांत त्याचा कांहींच संबंध नाहीं असें कोणी समजूं नये. वृत्तांची विशिष्ट वर्णरचना वगैरे कांहीं भाग खेरीज करून बाकीच्या बहुतेक विषयाचा गद्यादिकाव्यलेखनांत उपयोग होतोच हें ध्यानांत ठेवावें.

**काव्याचे वर्णनीय विषयः**—काव्यवर्णन करण्यास अमकाच विषय घेतला पाहिजे असें सांगतां येत नाहीं. असें जरी आहे तरी गणीत, ज्योतिष अगर वैद्यक यांसारख्या विषयावरील लेखनांत तें चांगलें प्रकट होणार नाहीं असें ह्मणतां येईल. काव्यलेखनास योग्य विषय कोणते यासंबंधीं संस्कृत साहित्यग्रंथांत ‘ **नगरार्णवशैलर्तुचंद्रसूर्यादिवर्णनैः । अलंकृतमसंक्षिप्तं रसभावनिरंतरम् ॥ १ ॥** ’ नगरें, समुद्र, पर्वत, ऋतु, चंद्र व सूर्य इत्यादि विषयांचें मनोहर, विस्तारपूर्वक व तसेंच शृंगारादि रस प्रबळपणें उत्पन्न करणारें वर्णन काव्यलेखनांत मुख्यत्वें आलें पाहिजे असें सांगितलें आहे. धर्म, नीति अगर व्यवहार हे विषय गणितादि विषयांसारखे जरी रुक्ष नसले तरी ते साधारणपणें कठिण आहेत. परंतु वर सांगितलेल्या विषयांच्या वर्णनांत त्यांतील सुंदर तत्त्वांना यथायोग्य स्थान मिळत असल्यानें तीं मोठीं रसभरित होतात. काव्यलेखकानें केवळ धर्म, नीति व व्यवहार यांजकडेसच लक्ष्य देऊन निसर्गदेवतेला प्रसन्न करण्याचें मात्र विसरूं नये. सृष्टिसौंदर्यामध्यें किती जादू भरली आहे याची कल्पना अरसिकास कदापि होणें शक्य नाहीं. तात्पर्य, क्षुद्र अशा तृणाच्या एका काडीपासून तों परम विशाल नभःप्रांगणांतील मनोहर व दिव्य अशा चंद्रसूर्यादि गोलापर्यंत प्रत्येक वस्तु निर्माण करण्यांत विधात्याचें अपार चातुर्य व कौशल्य किती भरलें आहे, हें सृष्टिसौंदर्यनिरीक्षणानें कळून त्याजविषयीं आपले ठिकाणीं अत्यादर उत्पन्न होईल. असो, उच्च मनोवृत्ति, उदात्त कल्पना व सुविचारोद्गम यांचा चांगला परिपोष होण्यास वरीलप्रमाणें विषय सामान्येंकरून निवडावेत.

## भाग ४ था.

## रस.

ज्यायोगें प्रेम, हास्य, शोक, उत्साह, भय इत्यादि मनोभाव प्रबळ होऊन मनाची हर्षित, शोकाकुल अगर उत्साही अशी जी अपूर्व व प्रबल स्थिति होते तीस **रस** ह्मणावें. काव्यांत कोणता तरी एखादा रस असला तर तें काव्य उत्तम होतें. रसाचा परिपोष होण्यास जी सामुग्री लागते तींत **स्थायीभाव, विभाव, अनुभाव,** व **व्यभिचारी** अथवा **संचारीभाव** हे मुख्य असतात. कोणताही एक मुख्य मनोविकार असतो त्यास **स्थायीभाव** ह्मणावें. त्याचीं जीं कारणें त्यास **विभाव** ह्मणावें. त्याच्या कार्यास **अनुभाव** आणि साहाय्य करणाऱ्या इतर मनोविकारांस **व्यभिचारी** अथवा **संचारीभाव** ह्मणावें. तात्पर्य **विभाव, अनुभाव** व **व्यभिचारी** अथवा **संचारीभाव** यांनीं परिपोष पावलेला जो **स्थायीभाव** त्यास **रस** ह्मणावें. प्रथमतः रसोत्पत्तीस कारण असलेल्या **स्थायीभाव, विभाव** वगैरेबद्दल येथें थोडक्यांत सांगतों.

१ **स्थायीभाव**—कोणताही रस पुरा होईपर्यंत स्थिर राहणारा जो मुख्य मनोविकार त्यास **स्थायीभाव** ह्मणतात हें वर सांगितलेंच आहे. हे अनुक्रमें **रति, हास, शोक, उत्साह, भय, क्रोध; जुगुप्सा** ( चिळस ), **विस्मय** व **निर्वेद** ( तिरस्कार ) इत्यादि आहेत.

२ **विभावः**—शृंगार, हास्य, करुण इत्यादि रसांच्या स्थायीभावांस कारण होणाऱ्यांस **विभाव** असें ह्मणतात. हें वर सांगितलेंच आहे. याचे **आलंबन** व **उद्दीपन** असे दोन भेद आहेत. ज्यापासून मनोविकार उत्पन्न होतो त्यास **आलंबनविभाव** ह्मणावें. जसें, **हास्यरसोत्कर्ष** व्हावयास विक्षिप्तवेषी विदूषकाचें दर्शन; किंवा **वीररसोत्कर्ष** व्हावयास शत्रुदर्शन कारण होतें; ह्मणून त्यास त्या त्या ठिकाणीं **आलंबनविभाव** ह्मणावें. उत्पन्न झालेल्या मनोविकारास आलंबनाचें गुण, चेष्टा अगर अलंकार वगैरे गोष्टींनीं स्फुरण आल्यास

त्यास **उद्दीपनविभाव** ह्मणावें. जसें, हास्यरसांत विदूषकाच्या विक्षिप्तचेष्टा, वेडगळ भाषण किंवा वीररसांत शत्रूचें मर्मभेदक भाषण वगैरे गोष्टी त्या त्या ठिकाणीं उद्दीपनविभाव होत.

**अनुभावः**—मनोगत ( अभिप्राय ) सूचक जे नेत्रकटाक्ष. भ्रूविक्षेप, चेहरेपालट इत्यादि हावभाव किंवा शारीरव्यापार त्यांस **अनुभाव** ह्मणावें. यांवरून मनोविकार कोणते उत्पन्न झाले आहेत हें समजतें. याचे आठ प्रकार आहेत. ते येणेंप्रमाणें. १ **स्तंभः**—सर्व शारीरव्यापार चालू असतां अकस्मात् गतिनिरोध होणें. २ **प्रलयः**—मूर्च्छा येऊन चेष्टानिरोध होणें. ३ **रोमांच**—हर्ष, भय, क्रोध इत्यादिकांपासून शरीरावर कांट्यासारखें केश उभारणें. ४ **स्वेदः**– हर्ष, भय इत्यादिकांनीं शरीरास घाम येणें. श्रमापासून येणारा घाम हा मनोविकाराचें कार्य नव्हे. ५ **अश्रूः**–हर्ष-शोकातिरेकानें नेत्रांतून पाणी गळणें. ६ **वेपथुः**—हर्ष, भय वगैरेपासून शरीरास कंप सुटणें. ७ **वैस्वर्य**—हर्षशोकादिकांनीं कंठ सद्गदित होऊन स्वर बदलणें. आणि ८ **वैवर्ण्यः**–रंग पालटणें. यांस **सात्विकभाव** असेंही ह्मणतात. मनोगतसूचक हे अनुभाव उत्पन्न झाल्यावर त्यांचा परिपोष होण्याजोगे कायिक चलनवलनादि व्यापार व स्पष्ट दिसेल अशी प्रसंगानुरूप होणारी मनाची स्थिति यांनीं उत्कृष्ट व्यक्त होतात.

४ **व्यभिचारी** अथवा **संचारीभावः**— मुख्य जो मनोविकार अथवा स्थायीभाव त्यास साहाय्यकारी होणारे आणि कोणत्याही रसांत कायमपणें न टिकतां प्रसंगानुरूप वाटेल तेव्हां प्रकट होणारे जे इतर चंचल मनोव्यापार त्यांस **व्यभिचारी** अथवा **संचारीभाव** असें ह्मणतात. हे ३३ आहेत. १ **निर्वेद**— कोणत्याही आपत्तीनें अगर सुविचारानें संसार अगर स्वदेह याविषयीं वीट येणें. २ **ग्लानि**– क्षुधा, तृषा वगैरेपासून दुर्बलत्व येणें. ३ **शंका**–संशय उत्पन्न होणें. ४ **असूया**–मत्सर. ५ **मद**–हर्षातिरेकानें येणारी धुंदी. ६ **श्रम**. ७ **आलस्य**–सामर्थ्य असून उद्योगाविषयीं तिरस्कार असणें. ८ **दैन्य**–दुःखाची परमावधि. ९ **चिंता**. १०, **मोह**–भ्रान्ति. ११ **स्मृति**–स्मरण.

१२ धृति- धैर्य. १३ व्रीडा- लज्जा. १४ चपलता. १५ हर्ष. १६ आवेग- भयादिकांनीं मोहित होणारी मनाची अकल्पित स्थिति. १७ जडता- हर्षशोकांनीं क्षणैक सुचेनासें होणें. १८ गर्व. १९ विषाद. २० औत्सुक्य. २१निद्रा. २२ अपस्मार-फेंपरें. हा चुकून येतो. २३ सुप्ति-स्वप्न. २४ प्रबोध -जागृति. २५ अमर्ष—दुसऱ्याचा अहंकार नाहींसा करण्याची प्रबल इच्छा. २६ अवहित्था-लज्जा वगैरेपासून होणाऱ्या विकाराचें गोपन. २७ उग्रता- आपली कोणी निंदा केली अगर इतर नुकसान केलें तर त्यापासून येणारी कठोरता. २८ मति-सारासार विचार करणें. २९ व्याधि-मनोविकारा-पासून उत्पन्न होणारे रोग. ३० उन्माद-भ्रम. ३१ मरण. ३२ त्रास. आणि ३३ वितर्क. यांशिवाय ईर्ष्या, दंभ वगैरे अनेक व्यभिचारीभाव साहित्य-शास्त्रकारांनीं गणले आहेत.

स्थायी व व्यभिचारीभाव यांत मुख्य फरक हा आहे कीं कोणत्याही कारणानें स्थायीभाव नष्ट न होतां इतर भावांस आपल्यांत मिळवून घेतात. व वासनारूपानें हे स्थिर असूनही प्रसंगोपात्त प्रकट होतात. आणि व्यभिचारीभाव चंचल असतात.

प्राचीन साहित्यशास्त्रकारांनीं १ शृंगार, २ हास्य, ३ करुण, ४ वीर, ५ भयानक, ६ क्रोध, ७ बीभत्स, ८ अद्‌भुत व ९ शांत. असे नऊ रस मानिले असून वत्सल, भक्ति वगैरे आणखी कांहीं रस अर्वाचीनशास्त्र-कारांनीं मानिले आहेत.

१ शृंगार:—तरुण व परस्पर अनुरक्त असलेल्या स्त्रीपुरुषांच्या कामना-विषयक होणाऱ्या प्रेमयुक्त विलासास शृंगार असें ह्मणतात. नायक व नायिका यांमधील हें प्रेम शुद्ध असलें पाहिजे. नाहींपेक्षां दोहोंपैकीं एकाचें प्रेम असून दुसऱ्याचें मात्र नाहीं किंवा दोहोंचें परस्परांवर प्रेम आहे पण त्यांपैकीं कोणीही एक जण व्यंग असेल तर तेथें या रसाचा परिपोष होत नाहीं. नुसता भास मात्र होतो. हा भास नीच स्त्री पुरुष, वेश्या अगर अगम्या स्त्री एतद्विष-

यक प्रेमांतही व्यक्त होतो. तसेंच नायकाच्या ठिकाणीं नायिका आसक्त असून तो जर अन्य स्त्रीच्या ठिकाणीं आसक्त असेल तर त्याजविषयीं नायिकेच्या ठिकाणीं ईर्ष्या उत्पन्न होते, आणि उलटपक्षीं नायिकेच्या ठिकाणीं नायक आसक्त असून ती जर अन्यासक्त असेल तर नायकाच्या ठिकाणीं ईर्ष्या उत्पन्न न होतां त्यास क्रोध मात्र येतो. तात्पर्य, अशा सर्वही ठिकाणीं शृंगाररस उत्पन्न न होतां केवळ रसाभास मात्र होतो. ह्यांत **स्थायीभाव रति** हा असून आलंबनविभाव नायकास नायिका व नायिकेस नायक हीं परस्पर होत. अनुरक्त तरुण स्त्रीपुरुषांच्या परस्पर निर्व्याज प्रेमास **रति** असें ह्मणतात. याचे **संभोगशृंगार** व **विप्रलंभशृंगार** असे दोन भेद आहेत.

**संभोगशृंगार**:—नायक व नायिका हीं एका स्थलीं असून त्यांच्या परस्पर प्रेमाचें वर्णन केलें असतां **संभोगशृंगार** होतो. यांत **रति** हा **स्थायीभाव** असून नायक व नायिका हीं अन्योन्य **आलंबनविभाव** होत. एकांतस्थळ, फुलांचा परिमळ, वसंतऋतु, आम्रमंजरीचा सुगंध, कोकिलगान, वडील माणसांचें भय नसणें वगैरे **उद्दीपनविभावांनीं** परस्परांच्या प्रेमास भरती येऊन एकमेकांस पाहणें, आलिंगन देणें, अधरोष्ठपान करणें वगैरे **अनुभावांनीं** तें रतिविषयक प्रेम व्यक्त होतें; व श्रम, मोह, लज्जा वगैरे **व्यभिचारी**भावांनीं त्याचा परिपोष झाल्यावर जो आनंद होतो तोच **संभोगशृंगार** होय. क्रोध, आळस, निर्वेद वगैरे व्यभिचारीभाव यांत येऊं शकत नाहींत. संभोगशृंगाराचें उदाहरण.

साकी. सुंदर चंपककलिकेसम वनिं मुग्धा अशि मुनिबाला ।
चाले गजगति, मधुवच बोले सुख तैं दुष्यंताला ॥ १ ॥

यांत **शकुंतला** ही **आलंबनविभाव**, एकांत वन, तिचें सौंदर्य, गजगति, मधुर भाषण वगैरे **उद्दीपनविभाव**; हर्ष होऊन रोमांच उत्पन्न होणें, स्मरव्यथा पावणें वगैरे **अनुभाव**; आणि अविवाहित व अपरिचित असलेल्या तरुण मुनिकुमारिकेशीं संभाषण कसें करावें यामुळें लज्जेनें मनोविकार दाबणें वगैरे **व्यभि**-

**चारीभाव** यांनीं यांतील **रति** हा **स्थायीभाव** परिपोष पावल्यानें येथें **संभोग-शृंगार** व्यक्त झाला आहे.

**विप्रलंभशृंगारः**—यांत तरुण, अव्यंग व परस्परांवर अनुरक्त अशा नायक व नायिका यांच्या परस्पर वियोगाचें वर्णन असतें. **काव्यप्रकाशांत** याचे १ **अभिलाषा**, २ **विरह**, ३ **ईर्ष्या**, ४ **प्रवास** व ५ **शाप** असे पांच प्रकार सांगितले आहेत. १ नायक व नायिका यांचें परस्परांवर निर्व्याज प्रेम असतें, पण दोघेही अगर दोघांतून कोणी एक अस्वतंत्र असतां एकमेकांच्या प्राप्तिविषयीं जी परस्परांची उत्कंठा तिला **अभिलाषा** ह्मणतात. २ संकेत-स्थलीं परस्परांस भेटण्याचा निश्चय केला असूनही वडील माणसांच्या भीतीनें अगर अन्य कांहीं कारणानें तीं परस्परांस भेटण्यास असमर्थ झालीं असतां उभ-यतांच्या मनाच्या होणाऱ्या स्थितीस **विरह** ह्मणतात. ३ नायक अन्य स्त्रीच्या ठिकाणीं अनुरक्त असतां **ईर्ष्या** होते. ४ नायक व नायिका यांची एकवार भेट होऊन नंतर फार दिवस लागणाऱ्या प्रवासानें त्यांच्या प्रेमास भरती आली असतां **प्रवास** होतो. ५ नायक व नायिका यांचा वियोग असून त्यांच्या परस्परांवरील प्रेमास उद्दीपित करणाऱ्या पदार्थांची निंदा व्यक्त असतां **शाप** होतो.

या पांचही प्रकारावरून असें दिसून येईल कीं, यांतील रति या **स्थायी-भावाचा** चंद्रोदय, सुंदर व एकांत वन, रमणीय नदीतीर, समागमास येणारीं विघ्नें, परस्परांचें गुणचिंतन वगैरे **विभाव**; चैन न पडणें, वर्ण फिकट होणें, शीत पदार्थांनीं दाह होणें वगैरे **उद्दीपनविभाव**; आणि ग्लानि, चिंता, असूया इत्यादि **व्यभिचारीभाव** यांनीं परिपोष झाला असतां **विप्रलंभशृंगार** व्यक्त होतो. जसें,

### साक्या.

**अभिलाषा.** कासाविस हा प्राण होय बहु कधिं तव सन्निध बसुनी ।

मुदितमनें गुजगोष्टि सांगतां बघिन तुला मी नयनीं ॥ १ ॥

विरह. संकेतस्थळिं बहुत वेळ तव वाट पाहिली साची ।
परि न भेटसी नकळे कां तें स्थिति दुःसह मन्मनिची ॥२॥

ईर्ष्या. किंवा अन्य स्त्रीच्या चिंतनिं गेला असाशिल गढुनी ।
अरे कठोरा तरिच विसरसी कांता तव गुणखाणी ॥ ३ ॥

प्रवास. बहुदिनपथिं वा जातां पूर्वीं अति यत्नें त्वां मजला ।
वियोगाकुला, भेटुनि सिंचासि मजवरि प्रेमाश्रूंला ॥ ४ ॥

शाप. प्रियविरहें मी व्यथित अशी, तरि कठोर हृदया करुनी ।
वसंत, मारुत, शशि नीचांनो वृथा छळितसा हंसुनी ॥५॥

यांत कोणी एकजण आपल्या प्रियसखीचें चिंतन करीत असल्याचें वर्णन आहे. यांत त्याची **सखी, आलंबनविभाव**; एकांत व सुंदर स्थळ, वसंत, मारुत, चंद्र इत्यादि **उद्दीपनविभाव**; जीवाची तळमळ, चिंता, ग्लानि इत्यादि **व्यभिचारीभाव** यांनीं **रति** या स्थायीभावाचा परिपोष झाल्यानें येथें **विप्रलंभशृंगार** झाला आहे.

२ हास्यः—अंतःकरण प्रसन्न होऊन मनाला गुदगुल्या झाल्या असतां हा रस व्यक्त होतो. यांत हास हा **स्थायीभाव** असून दुसऱ्याचें हंसणें, परस्परांची थट्टा, विचित्र वेष, विलक्षण चेष्टा वगैरे **विभाव**; हंसणें, हातवारे करणें, मान डोलावणें, पोट दाबून धरणें वगैरे **अनुभाव**; आणि हर्ष, ग्लानि, श्रम वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं त्याचा परिपोष होतो. राजमंदिर, सभागृह या ठिकाणीं एखादी विचित्र गोष्ट घडली असतां तेथें हास्यरसाचा भास होतो. तसेंच देव, गुरु वगैरे सन्माननीयांच्या कृत्यांच्या चेष्टांनींही हास्यरसाचा भासच होतो. मनुष्यस्वभावावरून याचे स्मित, विहसित, अतिहासित वगैरे प्रकार होतात हे धोरणानें जाणावें. हास्यरसाचें उदाहरण,

दिं. पंडिताग्रीं नृपरंगीं बसुनि डोले । चतुरभाषणिं जणुं कळे असें डोले ॥
प्रश्न मूढा परि तदा कुणी केला । नेदि उत्तर तैं हंसति पहा त्याला ॥१॥

यांत मूढ मनुष्य **आलंबनविभाव**; राजसभेंत पंडितलोकांच्या अग्रभागीं डौलानें बसणें उद्दीपनविभाव; प्रश्नाचें उत्तर देतां न येणें **अनुभाव** आणि उपहास, चेष्टा वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं **हास** या स्थायीभावाचें पोषण झाल्यानें येथें हास्यरस प्रकट झाला आहे.

२. **करुण**——शोकाची परमावधि झाली असतां या रसाची उत्पत्ति होते. यांत **शोक** हा **स्थायीभाव** असून त्याचा इष्टजनवियोग, देव व राजा यांचा कोप, अतिदारिद्य, क्लेश वगैरे **विभाव**; श्वास सोडणें कपाळ व ऊर बडवून घेणें वगैरे **अनुभाव**; उन्माद, चिंता, दैन्य, मोह वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं परिपोष झाला असतां हा रस पूर्ण व्यक्त होतो. शोक करण्यास अयोग्य ह्मणजे ज्यावर वस्तुतः प्रेम नाहीं त्यांचा वरपंगी शोक केला असतां तेथें करुणरसाभास मात्र होतो. जसें, शत्रु मरण पावल्यानें वस्तुतः आनंद होणें साहजिक असतां लौकिकार्थ त्याचेविषयीं शोक केल्यास त्यांत करुणरस उत्पन्न होत नाहीं. करुणरसाचें उदाहरण.

ओवी. ह्मणे बाळा कुलभूषणा । हृदयस्थाचीं प्रेमपान्हा । भेटोनिया करीं
मुक्तेश्वर. पाना । अहो नंदना वेगेंसी ॥१॥ ऐशी विलापें भ्रमतां वनीं । तंव
शवा उचलुनी कौशिकमुनी । पुढें ठेवितां चरणीं । लागुनी पडे
अवचित ॥२॥ अवचट लागतां हात । ओळखलें निज तनयप्रेत ।
भूमीं माथा हाणित । पिटोनिया कपाळा ॥ ३ ॥

यांत तारामतीनें रोहिदासाकरितां केलेल्या शोकाचें वर्णन आहे. येथें रोहिदास **आलंबनविभाव**, विपत्काल प्राप्त झाला असून त्याप्रसंगीं त्याचें मरणें, त्याचेंच प्रेत हातीं लागणें **उद्दीपनविभाव**; भूमीवर मस्तक बडवून कपाळ पिटणें वगैरे

**अनुभाव**; आणि दुःख, मूर्च्छा, ग्लानि वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं शोक या स्थायीभावाचा परिपोष झाला असल्यानें येथें करुणरस उत्पन्न झाला आहे.

४ **वीररस**—इष्ट वस्तूनें मनाला अत्यानंद होऊन उत्साह उत्पन्न झाला असतां हा रस होतो. यांत उत्साह हा **स्थायीभाव** असून शत्रुदर्शन, दान घेणारा सत्पात्र वगैरे **विभाव**; स्फुरण व आवेश येणें, हास्यमुख होणें, हात फुरफुरणें, छाती फुगणें वगैरे **अनुभाव**; चापल्य, औत्सुक्य, गर्व, असूया वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं त्याचा परिपोष झाला असतां हा रस सुरेख व्यक्त होतो. जसें,

गीति. तो आहुय शरात्तम साडुनि मी मेरुतेंहि फोडीन ॥
मोरोपंत. कवचाची काय कथा पार्थी कीं केशवांच सोडीन ॥ १ ॥

हें कर्णाचें शल्याप्रत भाषण आहे. यांत अर्जुन हा **आलंबनविभाव**, शल्याचें पांडवांच्या बाजूचें भाषण **उद्दीपनविभाव**; आवेशयुक्त भाषण करणें वगैरे **अनुभाव**; आणि हर्ष, आवेश, औत्सुक्य वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं उत्साह या स्थायीभावाचा उत्तम परिपोष झाल्यानें येथें **वीररस** सुरेख व्यक्त झाला आहे.

या रसाचे युद्धवीर, दानवीर, दयावीर व धर्मवीर असे बरेच प्रकार साहित्यशास्त्रकारांनीं मानले आहेत. कारण त्या त्या ठिकाणीं उत्साहाची आवश्यकता असल्यानें वीररसच होतो. याचप्रमाणें जेथें जेथें निस्पृहता, स्पष्टोक्ति, स्वाभिमानयुक्तता असेल तेथें तेथें या रसाची कल्पना करावी हें उत्तम. आपल्या अंगीं कर्तृत्व आहे असें भासविण्यासाठीं जेथें खोटाच उत्साह दाखविला जातो तेथें नुसता वीररसाभास होतो. जसें,

आर्या. कर्णादिकांसि देता समरीं वैराटि केसरी करिता ॥
मोरोपंत. जिष्णुपुढें असुरजनीं कोणी वैरा टिके सरी करितां ॥ १ ॥

यांत उत्तरानें अंगीं धैर्य नसतांही धैर्याचें मिष केल्यानें येथें वीररसाभास झाला आहे.

५ **भयानकरसः**--आपणावर एखादा भयकर प्रसंग अगर विपत्ति आली असून तींतून सुटणें अशक्य वाटत असतां चित्तवृत्ति क्षुब्ध होतात त्यास **भय** ह्मणावें. यांत भय हा **स्थायीभाव** असून प्रचंड व घोर आवाज ऐकणें, समर्थांशीं वैर पडणें, शून्य स्मशान दिसणें, आपणाहून बलवान असा कोणी आपणास मारण्यास प्रवृत्त होणें वगैरे **विभाव**; ग्लानि येऊन कंप सुटणें, शंका, चापल्य वगैरे **अनुभाव**; आणि मोह, आवेश, मूर्च्छा वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं त्याचा परिपोष झाला असतां हा रस व्यक्त होतो.

स्रग्धरा. ग्रीवा-भंगें रथातें बघत बघत हा धांवतो नीट मार्गीं ।
घोसळकर. अर्धे चावूनि दर्भ श्रमविवृत मुखंपातुनी जागजागीं ॥
टाकी, पूर्वार्धभागीं शरपतनभयें पाश्चभागास सारी ।
भूमि स्पर्शोनि मात्र प्रचुरतर उच्चां अंबरीं जाय मारी ॥ १ ॥

यांत **दुष्यंतानें** मृगयार्थ एका हरिणावर बाण योजिला असतां भयानें हरिणाची कशी अवस्था झाली हें वर्णिलें आहे. येथें दुष्यंत राजा **आलंबनविभाव**; त्यानें आपणास मारण्यासाठीं हातीं घेतलेला बाण **उद्दीपनविभाव**; आयासानें मुख पसरणें, पळणें वगैरे **अनुभाव**; आणि शंका, त्रास, खेद, श्रम, कंप वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं **भय** या **स्थायीभावाचा** परिपोष झाल्यानें येथें **भयानक रस** सुरेख व्यक्त झाला आहे. भय नसतां उगीच भीति दर्शविली असतां तेथें नुसता भयानकरसाभास मात्र होतो.

६ **रौद्ररस.**—इच्छेविरुद्ध कोणतीही महत्वाची गोष्ट घडली असतां जो मनाला संताप होतो त्यास **क्रोध** ह्मणतात. हाच या रसांत **स्थायीभाव** असतो. स्वतःचा अपमान, प्रिय वस्तूची इतरांनीं केलेली निंदा अगर अप्रिय वस्तूची केलेली स्तुति, स्वतःच्या कार्यांत इतरांनीं आणिलेले अडथळे वगैरे **विभाव**; हातापायांच्या शिरा ताठणें, भ्रुकुटी वळणें, दांत ओठ चावणें, डोळे लाल होणें वगैरे **अनुभाव**; आणि आवेश, चापल्य, खेद, श्रम, उन्माद

वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं त्याचा परिपोष झाला असतां हा रस सुरेख व्यक्त होतो. जसें,

द्रु०वि० जरि समर्थ असेल तुझा धणी। तरि तुझी पुरवीलचि तो धणी ॥
वामन. परि वदे स्थळ कोण तया असे। म्हणुनि गर्जत शब्द करीतसे ॥१॥

यांत **हिरण्यकश्यपु** प्रल्हादास मर्मभेदक भाषण बोलत असल्याचें वर्णन आहे. येथें रोषास पात्र झालेला **प्रल्हाद आलंबनविभाव**; तत्कृत विष्णुस्मरण **उद्दीपनविभाव**; शस्त्र हातीं घेणें, भूमीवर पाय आपटणें, आवेशयुक्त गर्जना करणें, शत्रूची निंदा करणें वगैरे **अनुभाव** आणि आवेश, भ्रम वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं क्रोध या **स्थायीभावाचा** परिपोष झाल्यानें येथें **रौद्ररस** सुरेख व्यक्त झाला आहे. जेथें क्रोध करावयाचा तें निमित्त अयोग्य असेल तर तेथें नुसतां रौद्ररसाभास मात्र होतो. जसें, माननीय पुरुषावर केलेल्या क्रोधानें अगर बळेंच क्रोध दाखविल्यानें **रौद्ररस** होत नाहीं.

७ **बीभत्सरसः**—कोणत्याही गोष्टीनीं मनास चिळस आली असतां हा रस उत्पन्न होतो. यांत **जुगुप्सा** ( चिळस ) हा **स्थायीभाव** आहे. चिळस येणाऱ्या **वस्तू दिसणें**, त्यांचा दुर्गंध येणें वगैरे **विभाव**; नाक मुरडणें, वांति होणें वगैरे अनुभाव; **त्रास वगैरे व्यभिचारीभाव** यांनीं त्याचा परिपोष झाला असतां हा **रस सुरेख व्यक्त होतो.** चिळस न येणाऱ्या वस्तूंचें चिळस यावयासाठीं वर्णन केलें असतां तेथें नुसतां बीभत्सरसाभास होईल. बीभत्सरसाचें उदाहरण.

साकी. **उकरुनि शव तें फाडिति कोल्हीं धरुनि आंतडीं दातीं ॥**
**श्वा धांवति वसवसोनि, मिळती काक-गृध्र-खग-पंक्ति ॥ १ ॥**

**यांत शव आलंबनविभाव**; कोल्हीं, कुत्रीं, कावळे, गिधाडें वगैरेनीं तें छिन्नभिन्न करणें **उद्दीपनविभाव**; ओकारी येणें, न पाहवणें **अनुभाव**; आणि चिळस, विस्मय वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं जुगुप्सा या **स्थायी**भावाचा परिपोष झाला असल्यानें येथें बीभत्सरस प्रकट झाला आहे.

८ **अद्भुतरसः**—कधीं न पाहिलेली अपूर्व अशी एकादी गोष्ट पाहिली अगर ऐकिली असतां मनाला जें नवल वाटतें त्यानेंच या रसाचा उद्भव होतो. यांत **विस्मय** हा **स्थायीभाव** असून मनोहर देखावा, सुंदर नकशी काम, अघटित गोष्ट घडणें वगैरे **विभाव**; चकित होणें, स्तंभितदृष्टीनें पाहणें, बोलणें बंद होणें वगैरे **अनुभाव** आणि हर्ष, मोह, जडता वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं त्याचा परिपोष झाला असतां हा रस व्यक्त होतो. जसें,

साक्या. कधिं न देखिला कुणि न ऐकिला अपूर्व उत्सव ऐसा ॥
होय हस्तिनापुरीं रम्य जो त्याहि सुरवरा सरसा ॥ १ ॥
सकळ मांडलिक सहर्ष आले जार्जनृपा वंदाया ॥
पौरजनां गणि कोण मीति ना शक्ति नसे वर्णाया ॥ २ ॥

यांत तारीख १२ डिसेंबर सन १९१२ रोजीं भरतभूमीची प्राचीन राजधानी हस्तिनापूर अथवा दिल्ली त्या ठिकाणीं सार्वभौम बादशाहा परमपूज्य पंचमजार्ज यांनीं राज्यारोहणविषयक जो अपूर्व दरबार भरविला त्याचें वर्णन आलें आहे. भरतभूमीच्या गेल्या पांचहजार वर्षांत असा भाग्यशाली राजा दिल्लीच्या तख्तावर कधींच आरूढ झाला नाहीं. असो, यांत परमपूज्य जार्ज बादशाहा हे **आलंबनविभाव**; अश्रुतपूर्व असा दिल्लीदरबार **उद्दीपनविभाव**; मोगलांनासुद्धां जे हार गेले नाहींत असे रजपूतादिक सर्वही मांडलिक मोठ्या आनंदानें बादशहांना धनी ह्मणून वंदन करण्यास येणें, अपूर्व असें ऐश्वर्य पाहणें वगैरे **अनुभाव**; आणि हर्ष, मद, औत्सुक्य, जडता वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं **विस्मय** या **स्थायीभावाचा** परिपोष झाल्यानें येथें **अद्भुतरस** व्यक्त झाला आहे.

९ **शांतरसः**—विषयभोगाचा अत्यंत तिरस्कार आला असतां हा रस व्यक्त होतो. यांत **निर्वेद** हा **स्थायीभाव** आहे. पुण्यक्षेत्र, संतसमागम, साधुदर्शन, ईशकथाश्रवण वगैरे **विभाव**; शरीराची क्षणभंगुरता, मोहग्रस्त होऊन

केलेले अपराध वगैरे मनांत येऊन कंठ सद्गदित होणें, रोमांच उभारणें, नेत्रांतून अश्रु वाहणें वगैरे अनुभाव; खेद, मति, धृति, चिंता वगैरे व्यभिचारीभाव; यांनी त्याचा परिपोष झाला असतां हा रस सुरेख व्यक्त होतो. जसें,

पृथ्वी. कृतांत-कटकामल-ध्वज-जरा दिसों लागली ।
मोरोपंत. पुरस्सरगदांसवें झगडतां तनू भागली ॥
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा ।
न हो जरि उताविळा स्वरिपु कापितो हा गळा ॥ १ ॥

यांत क्षणभंगुर देह आलंबनविभाव; नानारोग, वार्धक्य, व यमदूतांचें भय उद्दीपनविभाव; कंठसद्गदित होणें, अनन्यगतिकपणें प्रभूची करुणा भाकणें वगैरे अनुभाव; आणि चिंता, मोह, मति, जडता, ग्लानि वगैरे व्यभिचारीभाव; यांनी निर्वेद या स्थायीभावाचा परिपोष झाला असल्यानें येथें शांतरस व्यक्त झाला आहे. दांभिक वैराग्य वगैरेच्या वर्णनानें केवळ शांतरसाभास मात्र होतो. आतां अर्वाचीन शास्त्रकर्त्यांनीं मानिलेल्या कांहीं रसांविषयीं येथें लिहितों.

१० वत्सलरस :—मातापितरें व अपत्य, शिष्य आणि भक्त व तसेंच बंधु व भगिनी यांच्या परस्पर निर्व्याज अशा प्रेमास वत्सलता ह्मणतात. यांत वत्सलता अगर स्नेह, हा स्थायीभाव आहे. हा स्नेह मातापितरें, पुत्र व बंधु, यांमधील भाषण, कृत्यें वगैरे विभाव; आलिंगन देणें, मस्तक हुंगणें; चुंबन घेणें वगैरे अनुभाव; हर्षयुक्त रोमांच उठणें वगैरे व्यभिचारीभाव; यांनीं स्नेह या स्थायीभावाचा परिपोष झाला असतां हा रस व्यक्त होतो. जसें,

मु. प्र. रडे फुंदफुंदे शिरीं पादपद्मा । घरी सद्म मानी जया नित्य पद्मा ॥
वामन. बळें क्षेम दे त्यासि वोढूनि राम । स्वभक्तप्रिय स्वामि-विश्वाभिराम

यांत भरत, श्रीराम वनास गेले ह्मणून त्यांना परत आणण्यासाठीं वनांत गेला. त्यावेळीं श्रीरामानीं त्यास संनिध घेऊन आलिंगन दिल्याचें वर्णिलें आहे. येथें **भरत आलंबनविभाव;** वडिलानीं दिलेल्या राज्यैश्वर्याचा त्याग करून स्वतः-साठीं मुनिवेषानें त्याचें वनांत येणें, स्फुंदूनस्फुंदून रडणें वगैरे **उद्दीपनविभाव** त्यास जवळ घेऊन आलिंगन देणें वगैरे **अनुभाव;** आणि प्रेम, हर्ष वगैरे **व्यभिचारीभाव;** यांनीं स्नेह या स्थायीभावाचा परिपोष झाल्यानें वत्सलरस झाला आहे.

११ **भक्तिरसः**—देव, गुरु व माता यांजविषयीं जो स्नेह तो याचा **स्थायी-भाव** होय. याचा देव, गुरु व माता यांचें दर्शन, इष्टांत, आशीर्वचन वगैरे **विभाव;** आनंद होणें, वंदन करणें वगैरे **अनुभाव;** आणि औत्सुक्य, चापल्य वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं परिपोष झाला असतां हा रस सुरेख व्यक्त होतो. जसें,

मालिनी. श्रवण हरि-कथेचें, कीर्तनीं गात जावें ॥
वामनपंडित. स्मरण, चरणसेवा, अर्चनीं ही भजावें ॥
नमन करुनि, दास्यें, सख्य, आत्मार्पणानें ॥
करिति तरति वाटे सार हें आपणातें ॥ १ ॥

ही प्रल्हादाची हिरण्यकश्यपूला उक्ति आहे. यांत श्रीविष्णु **आलंबनविभाव;** त्याची पापहारक लीला व ती न गाण्याविषयीं हिरण्यकश्यपूचा आग्रह **उद्दीपनविभाव;** त्याचें गुणानुवादन वगैरे **अनुभाव;** आनंद, मति, धृति वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं स्नेह या स्थायीभावाचा परिपोष झाल्यानें **भक्ति-रस** व्यक्त झाला आहे.

१२ **प्रेयान्रसः**—मित्रविषयक प्रेम असतां हा रस होतो. यांत स्नेह हा स्थायीभाव आहे. यांत मित्र हा **आलंबनविभाव;** त्याची आपल्याविषयीं

उत्कट प्रीति, त्याचे सद्गुण, संकटकाळीं त्याचें उपयोगी पडणें वगैरे **उद्दीपनविभाव**; तद्विषयक प्रेमानें कंठ दाटणें, नेत्रांतून प्रेमाश्रुधारा वाहणें वगैरे **अनुभाव**; तत्कृत उपकाराची स्मृति, तो न भेटल्यास होणारी चिंता वगैरे **व्यभिचारीभाव**: यांनीं त्या स्थायीभावाचा परिपोष झाला असतां हा रस प्रकट होतो. जसें,

साकी. ये ये बंधो ऐसें सद्गद बोलत धांवत आला ॥
मोरोपंत. कडकडुनी भुज-युग्में स्व-सखा हृदयीं धरितां झाला ॥ १ ॥
मित्रांगस्पर्शानें झाला सुखी दयेचा सिंधू ॥
लोचन-पद्मापासुनि गळती प्रेमाश्रूंचे बिंदू ॥ २ ॥

यांत आपला बालमित्र सुदामा हा आपणास भेटण्यास आला असतां श्रीकृष्णानीं त्यास भेटल्याचें वर्णिलें आहे. येथें सुदामा हा **आलंबनविभाव**; त्याचें आपणावरील निस्सीम प्रेम व दूरवर पायीं चालत येणें **उद्दीपनविभाव**; कंठ सद्गद होणें, कडकडून भेटणें वगैरे **अनुभाव**; हर्ष, औत्सुक्य वगैरे **व्यभिचारीभाव** यांनीं **स्नेह** या **स्थायीभावाचा** परिपोष झाल्यानें **प्रेयान्** रस सुरेख व्यक्त झाला आहे.

या सर्व रसांविषयीं येथें ही एक गोष्ट ध्यानांत धरिली पाहिजे कीं, जसा रसाचा कित्येक ठिकाणीं भास मात्र होतो तसा कित्येक ठिकाणीं **संकरही** होतो, आणि कित्येक वेळां एका रसापासून दुसरे रस उत्पन्नही होतात. कित्येक वेळां त्यांचा उदय होतो न होतो तोंच ते शमलेही जातात. याचप्रमाणें व्यभिचारीभाव यांजसंबंधानेंही येथें हें सांगून ठेविलें पाहिजे कीं, यांचा केव्हां केव्हां **विभाव**, **अनुभाव** यांनीं परिपोष झाला असतां हेही स्थायीभाव होऊं शकतात. कित्येक त्यास स्थायीभाव मानितातही. पण सर्वमान्य अलंकारशास्त्रकर्त्यांनीं मागें वर्णन केलेले नऊच स्थायीभाव मानिले आहेत व कांहीं अर्वाचीन पंडितांनीं **स्नेह** वगैरे एक दोन स्थायीभाव मानिले आहेत म्हणून आम्हीही येथें त्यांचेंच अनुकरण केलें

आहे. बुद्धीपासून जशीं रसायनादि शास्त्रें निर्माण झालीं आहेत तद्वत मनापासून हें शास्त्र निर्माण झालें आहे. अर्थात् कोणत्याही रसाचा विचार केला असतां त्यांत असणाऱ्या मनोधर्मांचें यथार्थ ज्ञान प्रथमतः आपणास झालें पाहिजे आणि हें यथार्थ ज्ञान आपणास याच रसादि विषयांपासून होतें.

---

## भाग ५ वा.
## रसविरोध व रसपरत्वें वृत्तें.

१ **शृंगारः—**याच्या विरुद्ध **वीर, करुण, बीभत्स** आणि **रौद्र** हे रस आहेत. यापासून हास्यरस उत्पन्न होतो. उपेंद्रवज्रा, इंद्रवज्रा, द्रुतविलंबित, रथोद्धता, वसंततिलका, मालिनी, हरिणी, मन्दाक्रांता, शार्दूलविक्रीडित, वगैरे वृत्तें ह्या रसास अनकूल असून पथ्या वगैरे विरुद्ध आहेत.

२ **हास्यः—करुण** व **भयानक** हे ह्या रसाचे विरुद्ध आहेत. दोधक, तोटक, भुजंगप्रयात वगैरे प्रतिपदीं विच्छेद पावणारीं वृत्तें ह्या रसास अनुकूल असून पृथ्वि वगैरे विरुद्ध आहेत.

३ **करुणः—हास्य** व **शृंगार** हे ह्या रसाच्या विरुद्ध आहेत. द्रुतविलंबित, पुष्पिताग्रा, वियोगिनी, मालिनी, मंदाक्रांता वगैरे वृत्तें ह्या रसास अनुकूल असून दोधक आदिकरून विरुद्ध आहेत.

४ **वीरः—शांत** व **भयानक** हे वीर रसाचे विरुद्ध असून त्यापासून अद्भुत रस उत्पन्न होतो. उपेंद्रवज्रा, इंद्रवज्रा, वंशस्थ, शिखरिणी, शार्दूलविक्रीडित, स्रग्धरा वगैरे वृत्तें अनुकूल असून प्रहर्षिणी व मालिनी वृत्तें विरुद्ध आहेत.

५ **भयानकः—शृंगार, वीर, रौद्र, हास्य व शांत** हे या रसाचे विरुद्ध आहेत. शार्दूलविक्रीडित, स्रग्धरा, पथ्या वगैरे वृत्तें ह्यास अनुकूल आहेत.

६ **रौद्रः—हास्य, शृंगार, भयानक व अद्भुत** हे ह्यास विरुद्ध असून ह्यापासून करुणरस उत्पन्न होतो. अनुष्टुव्, रथोद्धता, हरिणी, शार्दूलविक्रीडित, स्रग्धरा वगैरे वृत्तें ह्यास अनुकूल असून शिखरिणी, मंदाक्रांता वगैरे प्रतिकूल आहेत.

७ **बीभत्सः**—शृंगार हा या रसाविरुद्ध असून ह्यापासून भयानक रस उत्पन्न होतो. वंशस्थ, रथोद्धता, शार्दूलविक्रीडित, स्रग्धरा वगैरे वृत्तें यास अनुकूल असून मंदाक्रांता, हरिणी, पुष्पिताग्रा, वियोगिनी वगैरे प्रतिकूल आहेत.

८ **रौद्रः**—अद्भुत हा ह्या रसाविरुद्ध आहे. वसंततिलका, शार्दूलविक्रीडित वगैरे वृत्तें ह्यास अनुकूल असून मदनललिता, मन्दाक्रांता वगैरे वृत्तें प्रतिकूल आहेत.

९ **शांतः**—वीर, शृंगार, रौद्र, हास्य व भयानक हे ह्या रसाविरुद्ध आहेत. शिखरिणी, मन्दाक्रांता, शार्दूलविक्रीडित, अंबुधारा, स्रग्धरा वगैरे वृत्तें ह्यास अनुकूल असून कुसुमविचित्रा वगैरे प्रतिकूल आहेत.

१० **वत्सलः**—रौद्र, भयानक, व बीभत्स हे ह्या रसास विरुद्ध असून करुण व वीर ह्यास अनुकूल आहेत. मालिनी, शार्दूलविक्रीडित, स्रग्धरा वगैरे वृत्तें यास अनुकूल आहेत. याप्रमाणें बाकीचें आपण तर्कानें जाणावें. कालिदास, भवभूति वगैरे महाभाग कवींनीं शाकुंतल, उत्तररामचरित्र वगैरे नाटकें व रघुवंशादि काव्यें यांत शृंगार, हास्य वगैरे प्रत्येक रसास अनुकूल अशीं जीं वृत्तें निवडून घेतलीं आहेत त्या धोरणानें या भागांतील माहिती तयार केली आहे. आणि चाणाक्ष वाचकांना हें धोरणानें समजण्याजोगें असल्यानें यासंबंधीं येथें जास्त विवेचन केलें नाहीं.

---

## भाग ६ वा.

### गुण, वृत्ति, रीति व दोष.

मुख्य रसाचा परिपोष होण्यास जे कारण होतात त्यास **गुण** ह्मणतात. याचे **माधुर्य**, **ओज** व **प्रसाद** असे तीन प्रकार आहेत.

१ **माधुर्यः**- ज्यापासून अंतःकरण द्रवतें त्यास **माधुर्य** ह्मणतात. हें **संभोगशृंगार**, **करुण**, **विप्रलंभशृंगार** व **शांत** ह्या रसांत क्रमेंकरून अधिक असतें. जसें,

सं. शृं. नयन-शर-धनुष्यें भोंवयाच्या प्रतापें ॥
मालिनी. श्रवण वरिहि येती तांबडे कोप तापें ॥

| | |
|---|---|
| वामन पं. | अधर थरथरीती रक्तवर्ण स्वभावें ॥ |
| | असिस तुज पहावें बोलिलों याचि भावें ॥ १ ॥ |
| करुणरस. | अहो कैकयी हें काय ॥ केलें तुवा हाय हाय ॥ |
| घनाक्षरी. | न ह्मणवे तुज माय ॥ जन्मोजन्मीं वैरिणी ॥ १ ॥ |
| वा. पं. | सर्व जगदभिराम ॥ वना धाडिला तो राम ॥ |
| | केलें विख्यात कुनाम ॥ कीं हे पतिमारिणी ॥ २ ॥ |
| वि. शृं. | हा हा देवी हृदय फुटतें देह माझा गळाला ॥ |
| मं. क्रां. | वाटे शून्य त्रिभुवन मला अंतरात्मा जळाला ॥ |
| प. गोडबोले. | या आत्म्यानें किितिरि सदा दुःखभारा धरावें ॥ |
| | मोह व्यापी फिरफिरुनि म्यां काय आतां करावें ॥ १ ॥ |
| शांत. | कृतांत-कटकामलध्वज-जरा दिसों लागली ॥ |
| पृथ्वी. | पुरस्सर-गदांसवें झगडतां तनू भागली ॥ |
| मोरोपंत. | सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा ॥ |
| | न हों जरि उतावळा स्वरिपु कापितो हा गळा ॥ १ ॥ |

२ **ओजः**—अंतःकरणास उद्दीपन करणाऱ्या गुणास **ओज** ह्मणावें. हें वीर, रौद्र व बीभत्स या रसांत क्रमेंकरून अधिक असतें.

| | |
|---|---|
| वीर. आर्या. | रे रे जयद्रथा हें योग्य नव्हे तुज पलायन परत रे ॥ |
| मोरोपंत. | अभिमुख मरोनि जरि पळ पळतां न महा बलायन पर तरे ॥ |
| रौद्र. | स्तंभीं दिसतसे जाण ॥ ऐसें बोलतां सुजाण ॥ |
| घनाक्षरी. | दैत्यें घेतलें उड्डाण ॥ सिंहासनावरुनी ॥ १ ॥ |
| वा. पंडित. | खवळला उच्छृंखळ ॥ दांतें दांत खाय खळ ॥ |
| | हाणी खांबासी निखळ ॥ खड्गमुष्टि धरूनी ॥ २ ॥ |

बीभत्स. अस्थि, मांस, पूं, श्लेष्मा शोणित लाळयुक्त नवछिद्रा ॥
साकी. असंख्य रोगें जर्जर तनु जरि सेवी मूढ अभद्रा ॥१॥

३ प्रसादः—श्रवणसमयींच अर्थबोध होऊन अष्टही भावांचें उद्दीपन होणाऱ्या गुणास **प्रसाद** ह्मणावें. हा सर्व रसांत सारखा असतो. हा अनुभवानें जाणतां येणारा असल्यानें ह्याचीं उदाहरणें येथें दिलीं नाहींत.

## २ वृत्ति.

पदांतील रसानुकूल जी **वर्णरचना** तिला **वृत्ति** असें ह्मणावें. हिचे **मधुरा**, **पुरुषा** व **प्रौढा** असे तीन प्रकार आहेत. ह्यांस अनुक्रमें **कैशिकी**, **आरभटी** व **सात्वती** अशीं आणखीं नांवें आहेत.

मधुराः—ज्या पद्यरचनेंत कपासून मपर्यंत असणाऱ्या स्पर्शवर्णांतील **ट ठ ड ढ** हे वर्ण सोडून बाकीचे वर्ण, रेफ, णकार, द्वित्त ल ( ल्ल ), **य र ल व** अशा प्रकारचे कोमल वर्ण आणि अनुस्वार पुष्कळ येतात. तिला **मधुरावृत्ति** ह्मणावें. ही माधुर्यगुणदर्शक असते. जसें,

दिंडी. ऐक राया तूं थोर दयासिंधू ॥ नीतिसागरही तूंचि दीनबंधू ॥
वा. पं. निखंदोनी बोलिलों नको निंदूं ॥ सकल वदसी तरि पाय तुझे वंदू ॥१॥

**पुरुषाः**—ज्या रचनेंत संयोग, रेफ, सवर्णयोग, विसर्ग, व तसेंच **ट ठ ड ढ** या प्रकारचे कठोर वर्ण, आणि वर्गांतील प्रथम, तृतीय यांचा द्वितीय चतुर्थ या वर्णांशीं योग असतो तिला **परुषावृत्ति** असें ह्मणावें. ही ओजगुणदर्शक आहे. जसें,

द्रु. वि. हळुहळूं घन गर्जतसे नभीं । मुरलिहूनि चढेल ह्मणोनि भी ॥
वा. पं. श्रवणभक्ति अतिक्रम वर्जितो ॥ करित कीर्तनही घन गार्जितो ॥१॥

**प्रौढाः**—ज्या रचनेंत कांहीं **मधुरा** व कांहीं **पुरुषा** अशा दोन्ही वृत्तींचें मिश्रण असतें तिला **प्रौढा** ह्मणावें. ही **प्रसादगुणदर्शक** आहे. जसें,

व. ति. गुंजारवें भ्रमर गुंजति त्यांत देवें ॥
वा. पं. वेणुध्वनी मिसळला मृदु वासुदेवें ॥
आपादकंठ वनमाल अशी विराजे ॥
ते सेविती मधुप होउनी देव-राजे ॥ १ ॥

वृत्तिपरत्वें वृत्तेंही अनुकूल अगर प्रतिकूल असतात.

१ मधुरावृत्तीस मंजुभाषिणी, वसंततिलका, पुष्पिताग्रा, हरिणी व मंदाक्रांता वगैरे वृत्तें अनुकूल आहेत. परुषावृत्तीस पृथ्वी वगैरे वृत्तें अनुकूल आहेत व प्रौढावृत्तीस बाकीचीं वृत्तें अनुकूल आहेत. प्राचीन महाभाग कवींच्या काव्यांचें आलोडन केलें असतां हे सर्व प्रकार आपोआप ध्यानांत येतील.

## २ रीति.

कोणत्याही रसास योग्य अशा पद्यरचनेस **रीति** ह्मणावें. हिचे **वैदर्भी, गौडी** व **पांचाली** असे तीन भेद आहेत.

१ **वैदर्भी**:—जींत सामान्यतः समास असत नाहीं. चुकून असलाच तर थोड्या प्रमाणावर असतो तिला **वैदर्भी-रीति** ह्मणावें. ही माधुर्य-गुण-दर्शक आहे. जसें,

आर्या. व्यसनीं न पडेल कसा व्याघ्र-बिळीं जो मदांध ओतु निघे ॥
मोरोपंत. कीं पद्मराग मानुनि जो पदरीं विंगळासि ओतुनि घे ॥ १ ॥

२ **गौडी**:—जींत चार पदांपेक्षां जास्त शब्दांचा समास असतो तिला **गौडी-रीति** ह्मणावें. ही ओजगुणाची दर्शक आहे. जसें,

आर्या. श्रीमद्युधिष्ठिराच्या दूतत्वा परम लाभ मानुनि घे ॥
मोरोपंत. दुर्योधन-प्रमुख-खळ-खद्योत-तदन्य पद्म-भानु निघे ॥ १ ॥

३ **पांचाली**:—जींत चार पदांच्या आंत समासपदें असतात. तिला **पांचालीरीति** ह्मणावें. ही प्रसादगुणदर्शक आहे.

बीभत्स. अस्थि, मांस, पूं, श्लेष्मा शोणित लाळयुक्त नवछिद्रा ॥
साकी. असंख्य रोगें जर्जर तनु जरि सेवी मूढ अभद्रा ॥ १ ॥

३ प्रसादः—श्रवणसमयींच अर्थबोध होऊन अष्टही भावांचें उद्दीपन होणाऱ्या गुणास **प्रसाद** ह्मणावें. हा सर्व रसांत सारखा असतो. हा अनुभवानें जाणतां येणारा असल्यानें ह्याचीं उदाहरणें येथें दिलीं नाहींत.

## २ वृत्ति.

पदांतील रसानुकूल जी **वर्णरचना** तिला **वृत्ति** असें ह्मणावें. हिचे **मधुरा, पुरुषा** व **प्रौढा** असे तीन प्रकार आहेत. ह्यांस अनुक्रमें **कैशिकी, आरभटी** व **सात्वती** अशीं आणखीं नांवें आहेत.

मधुराः—ज्या पद्यरचनेंत कपासून मपर्यंत असणाऱ्या स्पर्शवर्णांतील **ट ठ ड ढ** हे वर्ण सोडून बाकीचे वर्ण, रेफ, णकार, द्वित्त ल ( ल्ल ), **य र ल व** अशा प्रकारचे कोमल वर्ण आणि अनुस्वार पुष्कळ येतात. तिला **मधुरावृत्ति** ह्मणावें. ही माधुर्यगुणदर्शक असते. जसें,

दिंडी. एक राया तूं थोर दयासिंधू ॥ नीतिसागरही तूंचि दीनबंधू ॥
वा. पं. निरखंदोनी बोलिलों नको निंदूं ॥ सकल वदसी तरि पाय तुझे वंदूं ॥ १ ॥

**पुरुषाः**—ज्या रचनेंत संयोग, रेफ, सवर्णयोग, विसर्ग, व तसेंच **ट ठ ड ढ** या प्रकारचे कठोर वर्ण, आणि वर्गांतील प्रथम, तृतीय यांचा द्वितीय चतुर्थ या वर्णांशीं योग असतो तिला **परुषावृत्ति** असें ह्मणावें. ही ओजगुणदर्शक आहे. जसें,

द्रु. वि. हलुहलूं घन गर्जतसे नभीं । मुरलिहूनि चढेल ह्मणोनि भी ॥
वा. पं. श्रवणभक्ति अतिक्रम वर्जितो ॥ करित कीर्तनही घन गर्जितो ॥ १ ॥

**प्रौढाः**—ज्या रचनेंत कांहीं **मधुरा** व कांहीं **पुरुषा** अशा दोन्ही वृत्तींचें मिश्रण असतें तिला **प्रौढा** ह्मणावें. ही **प्रसादगुणदर्शक** आहे. जसें,

व. ति. गुंजारवें भ्रमर गुंजति त्यांत देवें ॥
वा. पं. वेणुध्वनी मिसळला मृदु वासुदेवें ॥
आपादकंठ वनमाळ अशी विराजे ॥
ते सेविती मधुप होउनी देव-राजे ॥ १ ॥

वृत्तिपरत्वें वृत्तेंही अनुकूल अगर प्रतिकूल असतात.

१ **मधुरावृत्तीस** मंजुभाषिणी, वसंततिलका, पुष्पिताग्रा, हरिणी व मंदाक्रांता वगैरे वृत्तें अनुकूल आहेत. **परुषावृत्तीस** पृथ्वी वगैरे वृत्तें अनुकूल आहेत व **प्रौढावृत्तीस** बाकीचीं वृत्तें अनुकूल आहेत. प्राचीन महाभाग कवींच्या काव्यांचें आलोडन केलें असतां हे सर्व प्रकार आपोआप ध्यानांत येतील.

## ३ रीति.

कोणत्याही रसास योग्य अशा पद्यरचनेस **रीति** ह्मणावें. हिचे **वैदर्भी, गौडी** व **पांचाली** असे तीन भेद आहेत.

१ **वैदर्भीः**—जींत सामान्यतः समास असत नाहीं. चुकून असलाच तर थोड्या प्रमाणावर असतो तिला **वैदर्भी-रीति** ह्मणावें. ही माधुर्य-गुण-दर्शक आहे. जसें,

आर्या. व्यसनीं न पडेल कसा व्याघ्र-बिळीं जो मदांध ओतु निघे ॥
मोरोपंत. कीं पद्मराग मानुनि जो पदरीं विंगळासि ओतुनि घे ॥ १ ॥

२ **गौडीः**—जींत चार पदांपेक्षां ज्यास्त शब्दांचा समास असतो तिला **गौडी-रीति** ह्मणावें. ही ओजगुणाची दर्शक आहे. जसें,

आर्या. **श्रीमद्युधिष्ठिराच्या दूतत्वा परम लाभ मानुनि घे ॥**
मोरोपंत. **दुर्योधन-प्रमुख-खळ-खद्योत-तदन्य पद्म-भानु निघे ॥ १ ॥**

३ **पांचालीः**—जींत चार पदांच्या आंत समासपदें असतात. तिला **पांचालीरीति** ह्मणावें. ही **प्रसादगुणदर्शक** आहे.

द्रु. वि. वनचरांसह शैलवनांतरें ॥ निज-सुखें फिरणें तरि तें बरें ॥
वा. पं. जरि घडे सहवासचि पामरीं ॥ तरि जळो असणें सुरमंदिरीं ॥ १ ॥

### ४ दोष.

काव्यरसाची हानि ज्यापासून होते त्यास दोष ह्मणावें. ह्याचे **पद दोष**, **वाक्य** दोष, व **अर्थ** दोष वगैरे अनेक प्रकार आहेत.

१ **पद दोषः**—अश्लील शब्द, ग्राम्यत्व, कर्णकटुत्व, संदिग्धत्व आणि क्लिष्टत्व वगैरे पददोष होत. २ **वाक्य दोषः**—रसापकर्ष करणारे वर्ण, वृत्तें, कविप्रसिद्धीचा त्याग, एका वाक्यांतील पदाचा दुसऱ्या वाक्यांतील पदाशीं संबंध, यतिभंग आणि इष्टादींचा दूरान्वय वगैरे वाक्यदोष होत. ३ **अर्थ दोषः**—एका अर्थाची पुनरावृत्ति, संदिग्धपणा, परस्पर विरोध, अयोग्यवर्णन, कविसंकेताचा त्याग वगैरे अर्थदोष होत. हे सर्वही काव्याची फार हानि करितात. याचप्रमाणें रस व अलंकार वगैरेंच्या दोषांपासूनही काव्याची हानि होते. यासाठीं त्यांजकडे चांगलें लक्ष द्यावें हें उचित.

---

## भाग ७ वा.

### अलंकार.

उत्कृष्ट **वस्त्रप्रावर्ण** व दागदागिने यांनीं शरीरास जशी शोभा येते, तद्वत् **अनुप्रास**, यमक, **अर्थचमत्कार** वगैरेंनीं काव्यरूपदेहास **मनोहर सौंदर्य प्राप्त** होतें. ह्मणून त्यास शास्त्रकारांनीं ' **अलंकार** ' असें नांव दिलें आहे. याचे **शब्दालंकार** व **अर्थालंकार** असे मुख्य दोन भाग आहेत.

### शब्दालंकार.

शब्दरचनेच्या योगें काव्यास जें मनोहरत्व येतें त्यास **शब्दालंकार** ह्मणावें. याचे १ **अनुप्रास**, २ **यमक**, ३ **चित्र** व ४ **श्लेष** असे मुख्य चार भेद आहेत.

१ **अनुप्रासः**—रसादिकांस अनुकूल अशी जी वर्णांची विशिष्ट रचना अगर **वर्णसाम्य** त्यास **अनुप्रास** ह्मणावें. याचे १ **वृत्त्यनुप्रास** २ **छेकानुप्रास** व ३ **लाटानुप्रास** असे तीन प्रकार आहेत.

**वृत्यनुप्रास:**—यांत रसानुकूल असा विशिष्ट वर्णव्यापार किंवा रसानुकूल अशी एक अथवा अनेक वर्णांची एकदां अगर पुष्कळदां आवृत्ति येते. जसें,

गीति. तो शर गरधर वरसा पवि-सा रवि-सा स्मरारि-सायकसा ॥
मोरोपंत. पार्थ-भुजांतरिं शिरला वल्मीकामाजि नाग-नायकसा ॥ १ ॥

यांत **र** आणि **स** या वर्णांची अनेकवार आवृत्ति आली आहे.

**छेकानुप्रास:**—यांत अनेक व्यंजनांचें एकवार सादृश्य असतें.

गीति. सार्थक पार्थकरी, ती कैरविणी तो सुधांशु गौरविता ॥
मोरोपंत. सविता बिसिनीसि वरी, कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता ॥ १ ॥

यांत **र्थ क** आणि **र वि** या वर्णांचें एकवार सादृश्य आलें आहे.

**लाटानुप्रास:**—शब्दार्थ तेच असून अन्वय मात्र निराळा असतो. जसें,

स्रग्धरा. घाली चक्रासि वेगें त्यजुनि अवसरा चक्रपाणी स्वपाणी ॥

यांत **चक्र** व **पाणी** यांचे शब्दार्थ तेच असून अन्वय मात्र भिन्न आहे.

**श्रुत्यनुप्रास:**—यांत एकाच स्थानाच्या व्यंजनाची आवृत्ति येते. जसें,

मालिनी. वर-नृ-पति विराजे भीम हें नाम ज्याला ॥
वर दमन ऋषीनें–दीधला कीं तयाला ॥
रघु. पं. वर-सुत–दम नामा, दांत नामा द्वितीय ॥
वर–तनु दमयंती नंदिनी हे तृतीय ॥ १ ॥

यांत **प भ म** या ओष्ठ्य वर्णांची व **त द न ल** या दंत्य वर्णांची आवृत्ति आली आहे.

**अंत्यानुप्रास:**—यांत पदांतीं आद्यस्वरासह पुढील व्यंजनाची तशीच आवृत्ति येते. जसें,

प्रभुवर राम हृद्विश्राम ॥ गातां नाम दे सुखधाम ॥ १ ॥

यांत पदांतीं आद्यस्वरासह **म** या वर्णांची आवृत्ति आली आहे.

२ यमक:--यांत ज्या क्रमानें एकवार वर्ण आले त्याच क्रमानें त्यांची आवृत्ति येते. जसें,

गीति. उच्चैःश्रवा ह्मणावा पार्थाच्या कां न नीच तुरगांनीं ॥

मोरोपंत. ज्या पूर्जी तो ज्याचें यशनंदन काननीं चतुर गानीं ॥ १ ॥

यांत कां न नी च तु र गां नीं या आठ अक्षरांची त्याचक्रमानें दुसऱ्या चरणीं आवृत्ति आली आहे.

हा यमक कवितेच्या चरणांचे अंतीं व यतीचे ठिकाणीं साधलेला असतो. या यमकांनीं मराठी काव्यांत इतकी अघाडी मारली आहे कीं ते त्याचें सौंदर्यच होऊन बसले आहेत असें ह्मटल्यास चालेल. आणि मराठी भाषेच्या मोडणीकडे सामान्यतः पाहिलें असतां प्राचीन महाभाग कवींनीं मराठी काव्यास यमकाचें लेणें घालून सजविलें हें योग्य केलें. परंतु सांप्रतकाळीं कांहीं कवींना या यमकाच्या लेण्याला दूर फेंकून देऊन स्वेच्छेनें काव्य करावें अशी अनिवार हौस होऊं पहात आहे. तें इष्ट नाहीं असें माझ्या अल्प मतीस वाटतें. असो, हा यमक यतीचे ठिकाणीं, चरणाचे अंतीं वगैरे अनेक प्रकारें साधतात. त्यांतून येथें कांहीं देतों.

**पुष्पयमक:**—हा चरणांत येणाऱ्या यतींवर साधला जातो. जसें,

शा. वि. तारी हा भव-घोर थोर हरुनी सद्भक्त ते तोषुनी ॥ १ ॥

यांत यतीवर न हा वर्ण आवृत्तीनें आला आहे.

**दामयमक:**—हा जवळचे दोन्ही चरण साधतो. जसें,

शिखरिणी. कर-स्पर्शें झालें परम सुख त्या दैत्यतनया ॥

वा. पं. न या संसाराचें स्मरण उरलें त्या सुविनया ॥ १ ॥

यांत न या या अक्षरांनीं दोन्ही चरण जोडले आहेत.

**अश्वघाटीयमक:**—हा घोड्याच्या दौडीसारखा चालत असल्याचा भास होतो. जसें,

गीति. तो शर गर-घर-वर-सा पवि-सा रवि-सा स्मरारि-सायक-सा ॥
मोरोपंत. पार्थभुजांतरिं शिरला वल्मीकामाजि नाग-नायकसा ॥ १ ॥

यांत **र** हा यमक **श, ग, घ, व** या अक्षरांवर आणि **विसा** हा यमक **प** आणि **र** या अक्षरांवर उड्या मारित चालला असल्याचा भास होतो. याचप्रमाणें प्रथम पदाची तृतीय पदांत आणि द्वितीय पदाची चतुर्थ पदांत आवृत्ति आली असतां त्यास अनुक्रमें **संदेशयमक** व **संदृष्टकयमक** असें ह्मणतात.

३ **चित्रः**—यांत चक्र, कमल, नाग वगैरे कोणत्याही आकारांत कविता रचतात. आणि तींत कांहीं वर्ण अगर पंक्ति साधतात. जसें,

स्रग्विणी. **सर्वदां श्रीपती चिंति तो ध्यानिं रे । हिंडसी रानिं कां बोध घे नीट रे**
**सौख्यधामा जरी इच्छिसी, आर्द्रता । ठेवि ना ते तुवां चित्तिं आणी अतां ॥**

यांत '**श्रीरामातें ध्यानीं आणी**' हीं अक्षरें स.घर्मी आहेत. आंकडे पहावेत.

४ **श्लेषः**—यांत एका पदाचे इच्छित असे अनेक अर्थ उत्पन्न होतात. मात्र त्या अनेकार्थसूचक पदाचा पर्यायशब्द योजला असतां श्लेषहानि होते. जसें,

व. ति. होतील **नंदन-विलास** जयास तो हा ॥
आहे **धनंजयहि, धर्महि** जाण तो हा ॥
रघु. पं. **रत्नाकरीं तुज विराजविता विहारी** ॥
हा पाहिजे तरि वरीं **नळ-रूप-धारी** ॥ १ ॥

यांत विदर्भराजसभेंत **इंद्र, अग्नि, यम,** व **वरुण** हे चौघजण दमयंतीस वरण्यासाठीं नळाचें रूप घेऊन आले होते व त्या शेजारींच खरा नळही बसला होता. त्यामुळें खरा नळ कोणता हें दमयंतीस समजावें यासाठीं तिची सखी जी शारदा तिनें तिला **नंदनविलास, धनंजय, धर्म** आणि **रत्नाकरीं तुज विराजविता** या पदांनीं अनुक्रमें इंद्रादि चौघेही नळ, **रूप-धारी** या पदानें नळाचें

रूप धारण करणारे असून वरण्यास अयोग्य आहेत असें सुचविलें. वरील श्लेष शब्दांच्या ठिकाणीं दुसरे पर्याय शब्द आले तर तेथें श्लेष राहत नाहीं. हें शब्दश्लेषाचें उदाहरण होय. याशिवाय याचा भंगश्लेष ह्मणून आणखी एक प्रकार आहे. त्यांत प्रत्येक अर्थाच्या वेळीं श्लेषयुक्त पदाचे निरनिराळे अवयव घ्यावे लागतात.

गीति. नय न टाकितां रामा सुर-रम ती आवरी नवी रमणी ॥
नयन टाकितां रामा सुरस मती आवरीन वीरमणी ॥ १ ॥

अर्जुन त्रिदंडी संन्याशाचा वेष घेऊन सुभद्रेसाठीं द्वारकेस बळिरामाच्या येथें असतां सुभद्रेच्या प्राप्तीविषयीं आतुर होऊन ह्मणतो 'जर ती प्राप्त झाली तर मी ती सुंदर रमणी नीतिमार्गाचें उल्लंघन न करितां हे बळिरामा देवाप्रमाणें रक्षीन' हें त्याचें पुटपुटणें श्रीकृष्णानें ऐकतांच तूं असा स्त्रैण होणार काय? असा त्यास प्रश्न केला तेव्हां खजील होऊन श्लेषार्थानें पदें फिरवून ह्मणतो, छे! छे! श्रीकृष्णा तुझ्या सांगण्याप्रमाणें मी तिला रथांत घालून नेल्यावर जर बळिराम शस्त्र घेऊन आला तर 'बुद्धिमान् असा मी त्या वीरश्रेष्ठ रामाला डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच जिंकीन' असें ह्मणत होतों. पण तूं माझ्या ह्मणण्याचा विपर्यास केलास. हा भंगश्लेष होय. वक्रोक्ति—यांत बोलणारा एका अर्थानें बोलतो तर दुसरा शब्दश्लेषानें त्याचा दुसराच अर्थ उत्पन्न करितो. जसें

गीत्यर्ध. ध्याई तो मनिं रामा मग कैसा आठवील देहातें? ॥

यांत बोलणारा दुसऱ्यास ह्मणतो 'तो श्रीरामाला ध्यातो' तर दुसरा रामाचा ईश्वरपर अर्थ न करितां शब्दश्लेषानें स्त्रीपर अर्थ करून उत्तर करितो कीं 'जर तो स्त्रीचें चिंतन करितो तर मग तो शुद्धीवर असा असेल?

## अर्थालंकार.

अर्थचमत्कारानें काव्यास मनोहरत्व आल्यास त्यास अर्थालंकार ह्मणतात. हे शंभरावर आहेत. विस्तारभयास्तव येथें त्यांचें संक्षेपतः विवेचन करितों.

१ **उपमाः—** ह्यांत अमुक एक वस्तु अमक्यासारखी आहे वगैरे रीतीनें स्पष्ट वर्णितात. ह्मणजे एका वाक्यांत दोन वस्तूंचा सारखेपणा समान धर्मानें सुंदर व सयुक्तिक रीतीनें वर्णितात. ह्याचीं चार अंगें आहेत. **१ उपमान—** ज्याची उपमा द्यावयाची त्यास ह्मणतात. कविसंकेतानें हीं बहुतेक ठरलीं आहेत. जसें चंद्र, सूर्य, सिंधु, कमल, मलयानिल वगैरे. एखाद्या प्रतिभा-संपन्न कल्पक कवीनें ह्या जुन्या कविसंकेतप्रणीत उपमानपदांत अनुरूप अशीं कांहीं नवीन उपमानपदें शोधून भर टाकिली असतां मोठी बहार होईल. २ **उपमेय**-ज्यास उपमा द्यावयाची त्यास ह्मणतात. ३ **साधारणधर्म** उपमान व उपमेय ह्या दोहोंमध्यें असणाऱ्या सर्वसाधारण गुणास ह्मणतात. आणि ४ **वाचकशब्द** तो साधारण धर्म व्यक्त करणाऱ्या शब्दास ह्मणतात. जसें, सम, सारिखा, जेंवी, तेंवी वगैरे अनेक मराठी व संस्कृत तुल्यार्थक शब्द उपमेचे वाचक असे प्रचारांत आहेत. उदाहरण.

भु. प्र. जसे दांभिक ध्यानमुद्रा धरीती । जना दाविती ज्ञान ही बोधरीती॥
वा. पं. तशी दाविती ते बकाभ्यासमुद्रा । गडी हांसविती कृपेच्या समुद्रा ॥

यांत दांभिक उपमान, गवळ्यांचीं मुलें उपमेय, ध्यानमुद्रा हा उभयतांमध्यें असणारा साधारण गुण आणि तो साधारणधर्म दाखविणारा 'तशी' हा वाचकशब्द होय.

उपमेंत सांगितलेलीं हीं वरील चारही अंगें स्पष्ट व्यक्त असलीं ह्मणजे **पूर्णोपमा** होते. वरील उदाहरणांत उपमेचीं चारही अंगें स्पष्ट व्यक्त असल्यानें ती पूर्णोपमाच होय. वर सांगितलेल्या चारही अंगांपैकीं एखादें अंग व्यक्त नसलें तर **लुप्तोपमा** होते. जसें,

साकी. अहह! सुधेसम गंगाजल हें हरुनि सकल पापातें ॥
दर्शनमात्रें, भेटवी सत्वर चिंतामणि रामातें ॥ १ ॥

यांत पहिल्या ओळींत 'सुधेसम गंगाजल' या उपमेंत **निर्मळ** हा दोहोंत सर्व-साधारण असणारा गुण लुप्त आहे. ह्मणून ही धर्मलुप्तोपमा होय. व दुसऱ्या ओळींत ' चिंतामणि रामातें ' या उपमेंत **प्रमाणें** हा सर्व साधारण गुणाचा वाचकशब्द आणि इच्छिलें देणारा हा साधारण गुण लुप्त आहे. ह्मणून ही धर्मवाचकलुप्तोपमा होय. याचप्रमाणें आणखी जाणावें. हिचे मालोपमा व रशनोपमा असे आणखी दोन भेद आहेत. १ उपमेय एकच असून उपमान-पदें अनेक असतां **मालोपमा** होते. जसें,

गीति. सार्थक पार्थ करी, ती कैरविणी तो सुधांशु गौरविता ॥
मोरो. सविता बिसनीसि वरी कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता ॥ १ ॥

यांत पार्थ व सुभद्रा हीं उपमेयें एकच असून त्यांस अनुक्रमें कैरविणी व सुधांशु, सविता व बिसनी, आणि गुणज्ञ व कविता ह्या अनेक उपमा दिल्या आहेत. ही मालोपमा होय. २. **रशनोपमा**— हींत मागील वाक्यांतील उपमेय पुढील वाक्यांत उपमान योजितात. जसें,

गीति. नांवापरि बुद्धि पहा बुद्धिपरी तत्कृती तशी ख्यात ॥
कृतिपरि फळ भोगावें करणें कां मग उगाच आकांत ॥ १ ॥

यांत एका वाक्यांतील उपमेय दुसऱ्या वाक्यांत उपमान योजिलें आहे. उपमेचीं कोणतींही अंगें स्पष्ट व्यक्त असून श्रवणसमयीं तिचा बोध झाला असतां तिला ' **श्रौती** 'उपमा ह्मणतात व अर्थबोधावरून ती समजली असतां '**आर्थी**'उपमा ह्मणतात.

२. **अनन्वय**— यांत उपमानाच्या अभावामुळें ज्याची त्याच्याशींच तुलना करून उपमान व उपमेय हीं दोन्हीं एकाच वस्तूच्या ठिकाणीं वर्णितात. जसें,

अनुष्टुप्. श्रीरामासारखा धन्य श्रीरामचि पहा झणीं ॥
श्रीसीतेसारखी साध्वी श्रीसीताच भली जनीं ॥ १ ॥

यात उपमानाच्या अभावानें श्रीरामासारखा धन्य श्रीराम, आणि श्रीसीतेसारखी साध्वी श्रीसीता असें वर्णिलें आहे. तात्पर्य उपमेयाच्या समान दुसरा पदार्थ नाहीं असें दाखविण्याचें असतां हा अलंकार होतो.

३ उपमेयोपमा—यांत उपमान व उपमेय या दोघांचें निरनिराळ्या वाक्यांत परस्परास समानत्व वर्णिलें असतें. ह्मणजे एका वाक्यांतील उपमान व उपमेय हीं दुसऱ्या वाक्यांत अनुक्रमें उपमेय व उपमान होतात. जसें,

गीति. गिरिपरि गज राजा हा, गज राजापरि तसा गिरी तोही ॥
कुमुदाकारी उडुगण, उडुसम कुमुदेंहि शोभतीं पाही ॥ १ ॥

यांत प्रत्येक ओळींत दोन भिन्न पदें आहेत व यांत दोन निराळीं उदाहरणें आहेत. पहिल्या ओळींत पहिल्या वाक्यांतील गिरि हें उपमान दुसऱ्या वाक्यांत उपमेय झालें आहे. आणि दुसऱ्या ओळींत पहिल्या वाक्यांतील कुमुद हें उपमान दुसऱ्या वाक्यांत उपमेय झालें आहे.

४ प्रतीप—यांत उपमेय उपमानास विरोधी असल्यानें तिरस्कारानें उपमानास त्याच्या जोडीस आणून ठेवितात. ह्मणजे एखाद्या प्रसिद्ध उपमानाला उपमेयाची उपमा देतात. जसें,

शा. वि. जें त्वन्नेत्रसमान सुंदर जळीं तें मग्न इंदीवर ॥
मेघीं त्वन्मुखकांतियुक्त शशि ही लोपे प्रिये सत्वर ॥
गेले वेगिं गृहीं मराळ निघुनी जे त्वद्गती भाविती ॥
कीं त्वत्साम्य विनोद तोहि सखये साहे न दैवाप्रती ॥१॥

यांत कमल, चंद्र, मराळ हीं प्रसिद्ध उपमानें असतांही त्यांस उपमेयें कल्पून व नेत्र, मुख, आणि स्त्रियांची चाल या उपमेयांस उपमानत्व देऊन त्यांच्या जोडीस तिरस्कारानें आणून ठेविलें आहे. तात्पर्य या अलंकारांत उपमेय हें उपमान होतें. कधीं कधीं उपमान बनलेल्या उपमेयाचा उपमेय

बनलेल्या उपमानाशीं तुलना करून तिरस्कार केला असतांही हा अलंकार होतो. जसें,

गीति. गर्व धरि न निजवक्त्रीं कीं तत्सम दावि तोहि विधु कांति ॥
त्यजुनी नयन-भ्रम बघ चहुंदिशिं तत्सम ह्रदीं कुमुद असती ॥

यांत तोंड व नेत्र हीं मूळचीं उपमेयें उपमानाच्या पायरीवर आलीं आहेत. व चंद्र व कमळ हीं उपमानें उपमेयें आहेत. असें असतां त्यांच्याशीं तुलना करून तोंड व नेत्र या उपमेयरूप उपमानाचा येथें तिरस्कार केला आहे. कधीं कधीं पूर्वीं केव्हांहीं उपमानपदास न पोंचलेल्यास उपमानपद देऊन त्यास तिरस्कारानें उपमेयाच्या पायरीस आणून ठेविलें असतांही हा अलंकार होतो.

साकी. क्रौर्य, दर्प कां वृथा यमा तूं प्रमुदें धरिशी चित्तीं ॥
कीं त्वत्सम जागं असंख्य वनिता पराक्रमी बा असती ॥१॥

यांत यमाला पूर्वीं केव्हांही न दिलेलें असें उपमानपद दिलें आहे व त्यास तिरस्कृत करून स्त्रियांच्या उपमेय पदांवर आणून ठेविलें आहे. कधीं कधीं मूळ उपमेय असलेलें उपमान, उपमेय बनलेल्या उपमानापेक्षां योग्यतेनें अधिक आहे असें दाखविलें असतांही हा अलंकार होतो. जसें,

साकी. चारुगात्रि तव मुखकांतीसम असें कमल तें पाही ॥
मिथ्यावाद असा जगिं देखुनि नवल वाटतें ह्रदयीं ॥ १ ॥

यांत मूळ उपमेय असून उपमान बनलेल्या मुखाचें महत्व उपमेय बनलेल्या कमळापेक्षां जास्त दाखविलें आहे. कधीं कधीं प्रसिद्ध उपमानांचें निष्फलत्व दाखविलें असतांही हा अलंकार होतो. जसें,

चौपाई. षडरि चोर हे विद्यमान जरि । वृथा निर्मिले तस्कर मी तरि ॥
असें ह्मणुनि विधि मूर्त करुनि खल । अमूर्त करि ते षडरी प्रबळ ॥

यांत षड्रिपु चोरांहून जास्त कर्तृत्ववान् असतां चोरांना मी निष्कारण उत्पन्न केलें असें ह्मणून त्यांची निष्फलता दाखविण्यासाठीं त्यांना ब्रह्मदेवानें प्रकट केलें असें दाखवून उपमेयाच्या जोडीस आणून बसविलें आहे.

५ रूपक—यांत उपमान व उपमेय यांचें अभेदत्व वर्णिलें असतें. मग तें अभेदत्व प्रत्यक्ष व्यक्त होवो किंवा उपमेय धर्मांचा आरोप उपमानावर येवो.

ओंवी. ब्राह्मण ह्मणे राया समर्था ॥ संसार-विपिनामाजी असतां ॥
मुक्तेश्वर. दारिद्र्यव्याघ्र अवचिता ॥ आतुर कंठीं झोंबला ॥१॥

यांत संसारावर अरण्याचा व दारिद्र्यावर व्याघ्राचा अभेदानें आरोप केला आहे. कधीं कधीं उपमानाचें महत्व अगर न्यूनत्व दाखवून त्याचें व उपमेयाचें अभेदत्व वर्णितात. जसें, हे राजा तूं एका क्षणांत शत्रू---नगर जाळिलेंस तस्मात् तूं प्रत्यक्ष शंकर आहेस ' ' खरेंच तृतीय नेत्र नसतांही तू शंकरच होस; ' फार काय आपल्या ' समदृष्टीनें तूं शंकरच या विश्वाचें पालन करितोस ' या तिन्हीं वाक्यांत क्रमानें उपमानाचें महत्व, न्यूनत्व व साधर्म्य दाखवून अभेदत्व वर्णिलें आहे. याशिवाय रूपकांत सावयव आणि निरवयव असे आणखी दोन भेद आहेत.

ज्यांत सर्व उपमानपदें उपमेयाप्रमाणेंच स्पष्ट आहेत अशीं परस्पर सापेक्ष अनेक रूपकें मिळून एक रूपक तयार होतें. कधीं कधीं कांहीं उपमानपदें व्यक्त नसतांही अर्थानें त्यांचा बोध होत असल्यानें त्या समग्र रूपकाचें एक रूपक मानितात. जसें,

शा. वि. आशा थोर नदी, मनोरथ तिचें पानीय, वीची तृषा ॥
स्त्रीपुत्राद्यनुराग हे जलचरें जे पूर्ण कूलंकषा ॥
वा. पं. संसारभ्रमभोंवरा गरगरी चिंताच जीचीं तटें ॥
तीतें जे तरले मुनीश न कधीं ते पावती संकटें ॥ १ ॥

यांत अनेक रूपकें असून त्या सर्वांचें आशा.नदी हें एक समग्र रूपक झालें आहे. हें सांगरूपक होय. उपमेय एकच असून अभेदरूपानें त्यावर अनेक उपमानें कल्पिलीं असतां मालारूपक होतें. याचीं उदाहरणें मराठी काव्यांत अनेक आहेत तीं तेथें पहावींत.

६ परिणाम—यांत उपमानाचें उपमेयाशीं ऐक्य अपेक्षित असतें. कांकीं तें स्वतः कार्यक्षम होत नाहीं. जसें,

गीत्यर्ध. निज नेत्रकमलिं देखे श्रीरामातें सहर्ष मदिराक्षी ॥

यांत कमल हें स्वतः पाहण्याचें कार्य करण्यास समर्थ नसल्यानें नेत्र या उपमेयाशीं त्याचें ऐक्य झालें आहे.

७ उल्लेख— यांत निरनिराळ्या धर्मांनीं एकच वस्तु वर्णितात. जसें,

शिखरिणी. गजेंद्रत्राता हा नयानें दिसला वृद्ध ह्मणती ॥
स्त्रिया ज्यातें हर्षे बघुनि मदना तुच्छ गणती ॥
अहा अज्ञानी जे बघति शिशु सालंकृत असा ॥
नमूं श्रीकृष्णा त्या शिरत मथुरीं जो सुखद सा ॥

यांत श्रीकृष्णाचें निरनिराळ्या प्रकारें वर्णन आलें आहे. अनेक प्रकारानें एकावर कल्पना केली असतांही हा अलंकार होतो, जसें,

गीति. वचनें श्रीरामचि हा, वर्तनें विख्यात तो हरिश्चंद्र ॥
भीष्म शरासनिं तेंवी दातृत्वीं कर्ण, वृत्तिनें चंद्र ॥१॥

यांत कवीनें कोणा एका राजाचें वर्णन अनेक प्रकारानें केलें आहे.

८ स्मृति--यांत एखाद्या गोष्टीच्या दर्शनानें पूर्व परिचित अशा दुसऱ्या एखाद्या गोष्टीचें स्मरण झाल्याचें वर्णितात. जसें,

साकी देखुनियां हरिणातें झाली स्मृति मज दुर्भाग्याला ॥
प्रिया मृगाक्षी सीता कोठें वदे सुमित्रा बाळा ॥१॥

यांत हरिणाला पाहून रामाला सीतेची आठवण झाल्याचें वर्णिलें आहे.

९ **भ्रांति**—यांत एकाद्या वस्तूचें दर्शन होतांच तीवर तत्सदृश अन्य वस्तूंची भ्रांति उत्पन्न झाल्याचें वर्णितात. जसें,

व. ति.

तीरीं बघोनि तरुणी-मुख रम्यहास ॥
नीरीं सरोज विलसे, बहु यद्विकास ॥
दोन्हीकडे अलिकिशोरकसंघ मुग्ध ॥
धांवोनि जाति सहसा मकरंद-लुब्ध ॥१॥

अं. प्रकाश.

यांत सरोवराच्या कांठावर उभी असलेल्या कोणा एका तरुणीच्या मुखावर कमळाची भ्रांति भ्रमरांना झाल्याचें वर्णिलें आहे.

१० **ससंदेह**—यांत सुंदर सादृश्यामुळें उपमेय हेंच उपमान होय असा संशय वर्णिला असतो. जसें,

गीति.

अर्जुन कीं हा पशुपति न कळे आह्मां रणीं यया बघतां ॥
याच्या समरजयानें संप्रति संदेह जाहला चित्ता ॥१॥

यांत अर्जुन व श्रीशंकर या दोघांच्या पराक्रमाच्या सुंदर सादृश्यामुळें हा अर्जुन अथवा श्रीशंकर आहे असा संदेहानें निर्णय करितां येत नाहीं असें वर्णिलें आहे. हें शुद्धसंदेहाचें उदाहरण होय. जेथें उपमान व उपमेय यांतील भेददर्शक धर्म गर्भित असतो तेथें निश्चयगर्भससंदेह होतो. जसें,

गीति.

हा काय भीष्म? जगतीं गाजे तद्ब्रह्मचर्य सुपवित्र ॥
कीं भार्गवरामाचि हा? क्षत्रकुलान्तक सदैव तो ख्यात ॥ १ ॥

यांत कोणी एक राजा हें उपमेय आणि भीष्म व भार्गवराम हीं उपमान पदें व्यक्त आहेत. राजासंबंधीं येथें शंका उत्पन्न झाली असून हा भीष्म अगर

भार्गवराम नव्हे एवढा मात्र निर्णय उपमानगत विशेष धर्मांनीं स्पष्ट झाला आहे आणि उपमेय संबंधीं मात्र कांहींच निर्णय नाहीं.

११. अपन्हुतिः— यांत उपमेयावर उपमानाचा आरोप करण्यासाठीं त्या उपमेयाचें रूपक अथवा त्या उपमेय धर्माचा अपलाप केलेला असतो. जसें,

शा. वि. कोणी मानिति अंक, कोणि जलधीपंकापरी मानिती ॥
सारंगापरि कोणि लेखिति, दुजे कीं भूमिछायाच ती ॥
त्या चंद्रीं स्फुटितेंद्र-नीळ-शकल-श्यामा दरी जी दिसे ॥
रात्रौ प्राशि घनांधकार गमतें तो कुक्षिमाजीं असे ॥१॥

यांत चंद्राचे ठिकाणीं जो बिंदुमात्र काळसरपणा आहे तत्संबंधीं कोणा कोणाच्या कसकशा कल्पना आहेत व कवीस त्याबद्दल काय वाटतें हें वर्णिलें आहे. त्या काळसरपणावर कलंक, समुद्रफेंस, सारंग, भूमिछाया आणि अंधार नाहींसा व्हावा ह्मणून चंद्रानें रात्रीं तो प्राशन केल्यानें त्याच्या कुशींत एकवटला आहे अशा तऱ्हेनें आरोप करून चंद्रकळंकाचा येथें अपलाप केला आहे. ही शुद्धापन्हुति होय. हेतुयुक्त उपमेयधर्माचा निषेध केला असतांही हा अलंकार होतो यास हेत्वपन्हुति ह्मणतात. जसें,

साकी. सिंधुमंथनीं मंदरगिरिनें चंद्रिं पडे व्रग बघ तो ॥
छायामृग, शश मूढ वदति, परि मिथ्यावाद असे तो ॥१॥

यांत चंद्रास व्रण पडण्याचें कारण सांगून सद्धर्माचा अपलाप केला आहे. अन्य पदार्थाच्या ठिकाणीं आरोप होण्यासाठीं एका पदार्थधर्माचा अपलाप केला असतां पर्यस्तापन्हुति होते. जसें,

"हालाहल विष न, रमा विष असतां लोक मानिती भलतें ॥
पलि शिव, कमळा स्पर्शीहि मोह ये हरितें॥१॥

यांत हालाहलाच्या प्रखरत्वाचा अपलाप करून उपमेय जी लक्ष्मी तिच्या ठिकाणीं त्याचा आरोप केला आहे. वस्तुस्थिति निवेदन करून प्रकृत विषयक शंकेचें निवारण केलें असतां भ्रांतापन्हुति होते. जसें,

साकी. जटा न वेणी, विष न कस्तुरी, विधु न कुसुम, नच विभुती ।।
कान्ताविरह-धवलता, स्मरा कां छळिसि गणुनि शिव चित्तीं ।।१।।

यांत वस्तुस्थिति निवेदन केली आहे. दुसन्यास शंका आली असतां चातुर्यानें वस्तुस्थिति लपवून तिचा निषेध केला असतां छेकापन्हुति होते. जसें,

लावणी. जल्पुनि तो संलग्न जाहला मत्पादिं सखये झणी ।।
कांत कां? नव्हे नूपुरा गणी ।।
करि सीत्कारें व्रण अधरा तनु रोमांचित होतसे ।।
नागरिक? न हिम पवन तो असे ।।

यांत कोणी एका नायिकेनें मोठ्या खुबीनें कान्तवृत्तांताचें गोपन करून नूपुर व थंड वात यांचें वर्णन केलें आहे. यांत अर्थानें हेतुगोपन केलें आहे. आतां शब्दयोजनेनें हेतुगोपन केल्याचें उदाहरण:—

शा. वि. चिंतीं मी तव नित्य नेत्रकमलें, तन्नीलसत्कुंतळीं ।।
ओढें चित्त न युक्ति, खास जितधी सद्विभ्रमीं गुंतली ।।
राधा, स्वप्नवच श्रवूनि सरुषें निर्भर्त्सना ती करी ।।
तैं सांगे स्मरिलें तुलाचि सखये, तो रक्षु तुह्मां हरी ।।१।।

यांत कमल शब्दांत श्लेष आहे. त्यानें हेतूचें गोपन होतें. कधीं कधीं कपट, मिष, रूप वगैरे शब्दांनीं हेतूचें गोपन होतें. जसें,

मात्रासमक. बघुनि अयोध्या, अमरपुरी ही । घे श्रृंगारा नित नव पाही ।।
छं. गंगा. दिव्य तप फळें जधीं पुर-मिषें । सुविश्वकर्मा नाचत तोषें ।।१।।

कधीं कधीं विषयान्तर योजनेनें हेतूचें गोपन होतें. जसें

साकी. सखि समजुनि निशिं, निज पतिला कथि जारवृत्त तों पति हा ॥
जाणुनि बोले 'सखे तदा मी जागृत झाल्यें' पाहा ॥ १ ॥

१२. उत्प्रेक्षाः— यांत हें उपमानच आहे कीं काय असें अभेदरूपानें उपमेयावर भासविलें जातें. हिचे स्वरूपोत्प्रेक्षा, हेतूत्प्रेक्षा आणि फलोत्प्रेक्षा असे मुख्य तीन भेद आहेत. भासे, वाटे, जणु, जणुकाय वगैरे हिचें वाचकशब्द होत.

**स्वरूपोत्प्रेक्षाः**— हींत एका वस्तूवर अभेदानें दुसऱ्या वस्तूची कल्पना करितात. हिचे उक्तविषया व अनुक्तविषया असे भेद आहेत. जेथें उपमेय उक्त असतें तेथें उक्तविषयास्वरूपोत्प्रेक्षा होते आणि जेथें तें उक्त नसतें तेथें अनुक्तविषयास्वरूपोत्प्रेक्षा होते. जसें,

गीति. रंगीं सर्व मिळाले तेव्हां आली तयांत दमयंती ॥
मोरो. जाणों चकोर ते ती मूर्तज्योत्स्नाचि ताप दमयंती ॥ १ ॥

यांत सभेंत जे सर्व राजे मिळाले होते त्यांवर चकोराची व दमयंतीवर चंद्रिकेची कल्पना अभेदरूपानें केली आहे. यांत दमयंती हें उपमेय उक्त असल्यानें ही उक्तविषयास्वरूपोत्प्रेक्षा होय.

**हेतूत्प्रेक्षाः**— यांत हेतू नसतांही त्यावर हेतूची कल्पना केली असते. जसें,

दिंडी. अहा सीते तव मृदुल चरण-कांति । कशी होई आरक्त मज वदे ती
जनक-नंदिनि भू-स्पर्श पदा होतां । येइ तत्क्षणिं रक्तता गमे चित्ता

यांत सीतेच्या चरणाची स्वाभाविक कांति लालसर आहे. पण ही लाली स्वाभाविक नसून तिनें भूमीवर पाय ठेविल्यानें आली असें उत्प्रेक्षेनें वर्णिलें आहे. ह्मणजे भूमि-स्पर्श हा कांहीं सीतेच्या पायाच्या लालीचें वास्तविक कारण नव्हे. असें असतां येथें अहेतूवर हेतूची संभावना केली आहे.

फलोत्प्रेक्षाः— यांत फळाचें कारण नसतांही त्यावर फळाची कल्पना करितात. जसें,

साकी. गमे तवपदीं ऐक्य व्हावया कमळ जलीं तप करितें ॥
त्वन्मुखसाम्यास्तव विधु सोडी कर शीतल भूवरि ते ॥ १ ॥

येथें कमळाचें तप करण्याचें फळ आकाशकमळाची स्पर्धा हें असतां स्त्रीच्या पदाशीं ऐक्य होणें असें वर्णिलें आहे. ही फलोत्प्रेक्षा होय.

जेव्हां उत्प्रेक्षावाचक स्पष्ट असतात तेव्हां वाच्योत्प्रेक्षा होते. वरील उदाहरणें वाच्योत्प्रेक्षेचीं होत. जेव्हां उत्प्रेक्षावाचक स्पष्ट नसतात तेव्हां गम्योत्प्रेक्षा होते. जसें,

छंदो. गं. शंतनू सेवुनी दोषि गंगा परी माथिं घेतां तिला शास्त्र वर्णी ज्रणी
त्वत्कृपाशीतल द्रोहि चंद्रासि दे भाळिं थारा तदा मानिती त्या जनीं

गंगा व चंद्र मस्तकावर धारण करण्याचें कारण वेगळें असून येथें निरालेंच वर्णिलें आहे. व यांत उत्प्रेक्षेचीं वाचक पदेंही नाहींत.

१३. अतिशयोक्तिः— यांत उपमेय नसतां उपमान वाचकशब्दानें त्याचा बोध होतो. जसें,

गीति. श्वान स्वपोषकाच्या सदनाच्या आश्रयें उभा राहे ॥
मोरोपंत. जिकडे वनांत गर्जे शार्दूल तया दिशेकडे पाहे ॥ १ ॥

हें शल्याचें कर्णास भाषण आहे. यांत कर्ण व अर्जुन हीं उपमेयें व्यक्त नाहींत. श्वान व शार्दूल या उपमानांनीं यांचा बोध होतो.

भेदकातिशयोक्तिः— हींत उपमान व उपमेय यामध्यें तत्वतः भिन्नता नसतांही उपमेयाचें लोकप्रसिद्धत्व दाखविण्यासाठीं भेदत्वानें वर्णितात. जसें,

साकी. विभीन्न ही सौंदर्य-संपदा तशी चतुरता—रीति ॥
गमे नलिनपत्राक्षी विधिचीं इतर सृष्टि सम नच ती ॥ १ ॥

यांत भेदरूपानें उपमेय जें 'नलिनपत्राक्षी' त्याचें लोकोत्तरत्व वर्णिलें आहे.

**संबंधातिशयोक्तिः**— यांत संबंध नसतांहि उपमेयाचा उत्कर्ष दाखविण्यासाठीं असंबंधीय वस्तूवर संबंध वर्णितात.

व. ति. जो अंबरीं उफळतां खुर लागलाहे ॥
तो चंद्रमा निजतनूवरि डाग लाहे ॥
र. पं. जो या यशास्तव कसें धवलत्व नेघे ॥
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥१॥

यांत नळाच्या घोड्याचा उत्कर्ष दाखविण्यासाठीं त्याच्या चालण्याचा आणि चंद्रकलंकाचा वस्तुतः संबंध नसतांहि संबंध वर्णिला आहे.

**असंबंधातिशयोक्ति**—यांत संबंध असूनहि असंबंध वर्णितात. जसें,

आर्या. पाहुनिया त्वन्मुख तें सांग सखे कोण आदरी शशिला ॥
बघतां तव नयनाला, तुच्छ गमे नीलकमल तें मजला ॥ १ ॥

यांत मुख व नयन यांचा अनुक्रमें चंद्र व कमळ यांशीं संबंध असतांही त्यांचा अनादर केला आहे.

**अक्रमातिशयोक्ति**—यांत कार्य व कारण हीं दोन्हीं एकदम घडल्याचें वर्णितात. जसें,

चौपई. रघुकुलमुकुटमणिश्रीरामें ॥ करिं घेतां धनु जगाभिरामें ॥
चापमुक्तशर समयिं रिपु-धृति ॥ पळे जाय ती तशिं तत्कीर्ति ॥

यांत शरपतन व शत्रूचें धैर्य व कीर्ति यांचें पलायन हीं दोन्हीं एकदम घडल्याचें वर्णिलें आहे.

**चपलातिशयोक्ति**— यांत हेतूची उत्पत्ति होते न होते तोंच कार्योत्पत्ति वर्णितात. जसें,

आर्या. आणिन परतुनि सत्वर गोधन ऐसें मनांत जों येतें ॥
जिंकुनि कुरुचमुदुर्गा आलें यश खास उत्तरा वाटे ॥१॥

यांत गोधन आणावयास जाण्याचा विचार मनांत येतो तोंच कौरवसैन्य जिंकून आपणास खास यश आलें असें उत्तरास वाटलें असें वर्णिलें आहे.

अत्यंतातिशयोक्ति—हींत कार्य व कारण यांची व्युत्क्रमदशा वर्णिली असते. ह्मणजे आधीं कार्य होऊन मग कारण झालें असें वर्णितात. जसें,

शिखारिणी. कदा नेणो वोढी शराधितुनिं काढी शर कदा ॥
कदा धन्वी जोडी वरिवा हि सोडी शर कदा ॥

र. पं. विपक्षाच्या वक्षावरि विवर लक्षास्तव रणीं ॥
कळे राजेंद्राची त्वरित शर-संधान-करणी ॥१॥

यांत नळाचें धनुर्विद्यानिपुणत्व वर्णिलें आहे. तो भात्यांतून बाण केव्हां काढी व केव्हां सोडी हें कळत नव्हतें. मात्र शत्रुहृदय विदारण झाल्यावर नळाची अघटित शर-संधान-करणी कळे. तात्पर्य, प्रथम शत्रुहृदय विदारण होणें हें कार्य व नंतर शरसंधान हें कारण झाल्याचें वर्णिलें आहे.

१४ तुल्ययोगिता—यांत वर्णनीय अथवा अवर्णनीय वस्तूवर एकच क्रियारूप समानधर्मत्व वर्णिलें असतें. जसें,

ओवी. माधुर्यें चंद्रिका । सरशी राया रंका ॥
ज्ञाने. तैसा जो एकाळिकां । भूतां समु ॥१॥

यांत राजा व रंक या दोघांना चंद्रिकेचा माधुर्य हा एकच क्रियारूप गुण असल्याचें वर्णिलें आहे. आणखी उदाहरण,

इं. व. कीं सज्जना देउनि मुक्तताही ॥
दुष्टासि नेणें यम लोकिं पाही ॥

ज्यासी असा मानसिं भाव नाहीं ॥
तो मृत्यु सर्वां अति दुःख देई ॥१॥

शत्रु, व मित्र यांच्या ठिकाणीं समभाव वर्णिला असतांही हा अलंकार होतो.

गीति. कीं हा पालनकर्ता कीं हा स्वप्राण-घातिं उद्युक्त ॥
व्याघ्र-मनीं हें न वसे उभयांचा तो करूं बघे घात ॥१॥

यांत हा पालन कर्ता व हा हंता असा भेद-भाव वाघाच्या मनांत येत नाहीं. तो उभयतांस सारखेंच लेखितो असें वर्णिलें आहे.

१५. **दीपकः**— यांत वर्ण्य व अवर्ण्य वस्तूंचें एकाच क्रियारूप धर्मानें वर्णन असतें. ह्मणजे यांतील क्रियारूप धर्म वर्ण्य व अवर्ण्य या दोहोंनाही प्रकाशित करितो. जसें,

साकी. शरें भिन्न तनु समरवीर तो मदक्षीण करि, शशि ही ॥
कलाहीन, शोभतो याचकीं गलित विभव नृप तोही ॥ १ ॥

यांत वर्ण्य राजा; अवर्ण्य हत्ती व चंद्र यांचें 'शोभणें' या एकाच क्रियारूप धर्मानें वर्णन आलें आहे.

१६ **आवृत्तिदीपक**—यांत दीपक अशा पद, अर्थ व पदार्थ यांची आवृत्ति येते. जसें,

साकी. मेघमालिका मयुरवर्ग करि उत्कंठित सत्वर ती ॥
तरुणहृदय उत्कंठवि तोही मकरकेतु घे चित्तीं ॥१॥

यांत 'उत्कंठित' ह्या पदाची आवृत्ति अर्थ भेदानें आली आहे. जसें मयुरास उत्कंठित करि ह्मणजे मेघांना पाहून ते वर तोंड करितात या अर्थी ऊर्ध्वमुख करी असा अर्थ होतो आणि तरुण-हृदय याला उत्कंठवि ह्मणजे उत्सुक करी असा अर्थ होतो.

गीति. चातक-तृषा शमवि ती जलधर धारा क्षणांत वर्षून ॥
वधु-लोचन-जलधारा लोपवि कामीप्रज्ञसरुचि तूर्ण ॥१॥

यांत शमवि व लोपवि या भिन्न शब्दांनीं नाहींसें करणें या एकाच अर्थाची आवृत्ति आली आहे.

गीति. त्वन्मुखनिर्जित शशि तूं लोपविसी मेघपंक्तिमाजि पहा ॥
लोपविसी त्यापरि त्या अरविंदासहि जलाशयांत अहा ॥१॥

यांत लोपविणें या अर्थासह 'लोपविसी' या पदाची आवृत्ति आली आहे.

१७ प्रतिवस्तूपमाः--उपमान व उपमेय यांच्या वाक्यांत एकच समान धर्म निरनिराळ्या पदांनीं व्यक्त असतो. जसें,

दिंडी. नभीं शोभे रवि तापयुक्त पाही। समरिं चापें साजतो भूप तोही ॥
विनय दाक्षिण्यें वंद्य बुधहि लोकीं। दान सत्कर्मैं हस्त धन्य हा कीं

यांत शोभणें, साजणें व तसेंच वंद्य व धन्य या भिन्न पदांनीं एकच समान धर्म दर्शित झाला आहे. विपम धर्मानें सुद्धां हा अलंकार होतो. जसें,

गीति. जरि आहेत गुण नरीं तरि येतील स्वयें विकाशाला ॥
वा. केमकर. कस्तूरिच्या सुगंधा सिद्ध करायासि शपथ का शाला ॥१॥

१८ दृष्टांतः—यांत प्रकृत गोष्टीच्या स्पष्टीकरणार्थ अप्रकृत गोष्टीचें उदाहरण देतात. जसें,

मंदाक्रांता. वाग्देवीचे जनक असती भूतलीं या अनेक ॥
ल. लेले. जाणे तीचें हृदय सगळें बाण तो मात्र एक ॥
सिंधू गेले तरुनि सगळे घेउनी रामनामा ॥
मंथाद्रीला परि समजली सिंधुगांभीर्यसीमा ॥१॥

यांत सरस्वतीच्या अनेक भक्तांपैकीं एका बाणासच तिचें स्वारस्य कळलें या प्रकृत गोष्टीच्या बोधासाठीं मथाद्रीची अप्रकृत गोष्ट वर्णिली आहे.

१९ निदर्शना—यांत दोन भिन्न वाक्यार्थांचा अभेद वर्णिला असतो ह्मणजे उपमेमध्यें त्यांचा अंतर्भाव करितात. जसें,

शा. वि. सर्पातें बिसतंतुंनीं सुदृढ जो बांधावया इच्छितो ॥
वा. पं. किंवा वज्रमणी शिरीषकुसुमें भेदावया धांवतो ॥
किंवा तो मधुबिंदुनें मधुरता क्षीराब्धिसी आणितो ॥
जो मूर्खासि सुभाषितें वश करूं ऐसें मनीं बोलतो ॥ १ ॥

यांत सर्पास बिसतंतूंनीं बांधणें, शिरीषकुसुमानें वज्रमणी भेदणें, मधुबिंदूनें समुद्रास मधुरत्व आणणें ह्या गोष्टी व मूर्खास सुभाषितांनीं वश करूं पाहणें एकच असें अभेदत्वानें वर्णिलें आहे.

निदर्शनेचे सदर्थनिदर्शना व असदर्थनिदर्शना असे दोन भेद आहेत.

**सदर्थनिदर्शना:**— हींत अपल्या सद्व्यापारानें दुसऱ्यास तसें करण्याविषयीं उत्तेजित करितात. **असदर्थनिदर्शना:**— हींत आपल्या निंद्य व्यापारानें निंद्यव्यापाराचा बोध करितात, जसें,

गीति. फलभारें तरु लवुनी सुचवी व्हा नम्र भाग्य तें येतां ॥
उच्चस्थ अधम पतनें सुचवी नच योग्य गर्व तो धरितां ॥१॥

यांत पूर्वार्धांत तरु आपल्या चांगल्या व्यापारानें दुसऱ्यास भाग्योदयकाळ प्राप्त झाला असतां नम्र व्हा असें शिकवितात. असें वर्णिलें आहे. व उत्तरार्धांत नीच मनुष्य कितीही वैभवास चढला तरी त्याचें अधःपतन होतें यावरून गर्वाचें घर खालीं असें सुचविलें आहे.

**२० व्यतिरेक**—यांत उपमानापेक्षां उपमेय गुणसंबंधानें अधिक महत्वाचें आहे असें वर्णितात. जसें,

गीति.   मंदारपल्लवाहुनि तव कर महिमा गमे अधिक नृपते ॥
भूषवि पल्लव कर्णा, परि करि तव कर विषण्ण कर्णातें ॥१॥

यांत कर्ण हा श्लेषयुक्त शब्द आहे. कर्ण ह्मणजे कान हा एक व कर्ण ह्मणजे दानशूर कर्ण हा एक असे याचे दोन अर्थ होतात. अर्थात् कर या उपमेयाचें कल्पतरु पल्लव या उपमानापेक्षां गुणाधिक्य वर्णिलें आहे. उपमान व उपमेय यांमध्यें साधर्म्य दाखवून शेवटीं उपमेयाची न्यूनता दाखविली असतांही हा अलंकार होतो. जसें,

शा. वि.   होसी रक्त सुपल्लवीं मधुरशा मीही प्रियेच्या गुणीं ॥
येती तूज शिलीमुख स्मर तसा सोडी मला पाहुनी ॥
दे कांता-पद-घात तोष उभयां, ही तुल्य दोघां सरी ॥
राखो नाम तुझें अशोक, विधि पैं कष्टी मला कां करी? ॥१॥

कोणा एका विरही मनुष्याचे अशोकास उद्देशून हे उद्गार आहेत. यांत रक्त, शिलीमुख व कांता-पद-घात या शब्दांत श्लेष आहे. रक्त ह्मणजे लाल व अनुरक्त; शिलीमुख ह्मणजे भ्रमर व बाण; आणि कांता--पद--घात ह्मणजे स्त्रियांच्या पदाघातानें अशोक वृक्ष फुलतो असा कविसंकेत आहे. दुसरा अर्थ उघड आहे. तात्पर्य अशोक व विरही मनुष्य यांचें साधर्म्य वर्णूनही अशोक हा आनंदी व विरही शोकयुक्त असें त्यांमध्यें न्यूनत्व व्यक्त केलें आहे.

२१ सहोक्तिः---यांत एकाचवेळीं दोन अथवा अधिक वस्तू एकच व्यापार करितात असें वर्णितात. जसें,

चौपाई. जाई जनक-गृहिं हर्षुनि मुनिसह । सहज भंगि धनु जें जगिं असह ॥
छं. गंगाधरी. रामेतर-नृप-कीर्तिसह रमा । अभिरामा वरि मेघःश्यामा ॥१॥

यांत सीतेनें इतर राजांच्या कीर्तिसह श्रीरामाच्या कंठांत माळ घातल्याचें वर्णिलें आहे. ह्मणजे सीतेनें माळ घालणें व इतर राजांचा अपमान होणें ह्या दोन गोष्टीनी एकाच वेळीं एकच क्रिया केल्याचें वर्णिलें आहे.

२२ विनोक्ति.—यांत अमक्यावीण अमुक वस्तु शोभत नाहीं किंवा शोभते असें वर्णितात. जसें,

अभंग. तु. भक्तीवीण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखमूळ ॥

यांत भक्तीवांचून जिणें व्यर्थ असें वर्णिलें आहे.

२३ समासोक्तिः—प्रस्तुताचें वर्णन कर्तव्य असतां श्लेषयुक्त अशा विशेषण साम्यबलानें अप्रस्तुताचें थोडक्यांत कथन होतें. जसें,

गीति. पीयूषमधुर पय तव सेवुनि मोदें पुनःपुन्हां गंगे ॥

ल. लेले. विगतश्रमउत्संगीं निद्रित होईन मी कधीं सांगें ॥ १ ॥

यांत पुनः पुनः पयःसेवन, वगैरे विशेषण सामर्थ्यानें तान्हें मूल व आई या अप्रस्तुताचें वर्णन आलें आहे. कधीं कधीं सादृश्यामुळेंही हा अलंकार होतो. जसें,

शिख. नदी होती जेथें पुलिन दिसतें आजि नयनीं ॥
विपर्यासें व्यापें तरु-समुह हा कीं बहुगुणी ॥
बहू कालें पाही अपर वन ऐसें गमतसे ॥
निवेशें शैलांच्या स्मरत परि तें पूर्विल असें ॥१॥

यांत सीतात्याग केल्यावर कोणे एके वेळीं वनास सहजगत्या श्रीराम गेले असतां त्यास पाहून त्यांनीं जे उद्‌गार काढिले त्याचें, वर्णन आहे. या प्रस्तुत वर्णनाच्या सादृश्यावरून धनसंतानादि समृद्धियुक्त पूर्वी असून सांप्रत अपकृष्ट दशेस पोचलेलें कुटुंब या अप्रस्तुताचें येथें कथन झालें आहे.

२४ परिकर—यांत अभिप्राय युक्त ह्मणजे सहेतुक विशेषण असतें. जसें,

दिंडी. जरी कुसुमायुध वदति मजसि लोकीं । तरी शक्रा सामर्थ्य मम विलोकीं
करिन निश्चयें हतधैर्य पिनाकीला । कोण पुसतो मग अन्य धन्वियाला

यांत कुसुमायुध व पिनाकी हीं साभिप्राय विशेषणें होत. कुसुमायुध ह्मणजे पुष्प हें ज्याचें हत्यार त्याला पिनाकीसारख्या तपस्वी वीराला जिंकितां येणें शक्य नाहीं असें जरी आहे तरी त्याची गर्वोक्ति स्पष्ट आहे.

२५ परिकरांकुर--यांत साभिप्राययुक्त विशेष्याचें वर्णन असतें. जसें,

व. ति. वर्णावया पटु फणीश तुझ्या गुणांशी ॥
अ. प्रकाश. तो हैहयाधिप शिकेल लिहावयासी ॥
पाहावया बळ तयाचि सहस्र नेत्रा ॥
कोठें तुझे सुगुण? मीहि कुठें पवित्रा? ॥१॥

यांत फणींद्र, हैहयाधिप व सहस्रनेत्र हीं साभिप्राय विशेष्यें होत.

२६ अर्थश्लेष—यांत वाक्यांतील एकाच शब्दाचे अनेकार्थ संभवतात. मात्र तो शब्द बदलून तदर्थसूचक दुसरा शब्द आला असतांही अर्थहानि होऊं नये.

गीति. तूं मलिन कुटिल नीरस जडहि पुनर्भवपणेंहि कच साच ॥
मोरोपंत. धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि नाम कच साच ॥

यांत कुटिल शब्दाबद्दल 'वक्र' शब्द आला तरी चालतो. या अलंकारांतील बहुतेक चमत्कार शब्दार्थश्लेषानें चमकतात. ह्मणून त्यास उभयश्लेष असें ह्मणतात. छंदोगंगाधरी पृ. ६५ यांतील उमावृत्ताचें उदाहरण पहा. त्यांतील आप्त, भव, लोक, भग, श्री, शिव वगैरे शब्द श्लेषयुक्त आहेत. त्यांत आप्त याबद्दल भक्त असा पर्यायशब्द आला तरी चालतो ह्मणून तें उभयश्लेषाचें उदाहरण होय.

२७ अर्थांतरन्यास—प्रस्तुत गोष्टीच्या बोधार्थ अप्रस्तुत गोष्ट वर्णितात.

गीति. टाकुनि चंपककलिका कण्हेरिच्या कां फुलास भुललास ॥
कृ. चि. अथवा नवल कशाचें रे तुजला हेंच योग्य मधुपास ॥१॥

यांत भ्रमराच्या अप्रस्तुत वर्णनानें 'स्वस्त्री सोडून परस्त्रीशीं रत होणें योग्य नव्हे' अशा प्रस्तुतार्थाचा बोध होतो. या अलंकारांत कोठें कोठें प्रस्तुत वस्तु कार्यरूपानें असते. ह्मणजे कारण अप्रस्तुत्वानें सांगितलें असतें. कोठें कोठें ती कारणरूपानें असते. कोठें ती विशेषरूपानें असते. कोठें सामान्यअर्थी असते.

२८ प्रस्तुतांकुर—यांत प्रस्तुत अर्थाच्या वर्णनानें अन्य इष्ट अशा प्रस्तुत अर्थाचा बोध होतो.

गलितधं. 'भ्रमरा मालति असतां कंटकयुत केतकी तुज कशास ॥१॥'

यांत वाच्यार्थ उघड असून तो प्रस्तुत आहे यावरून दुःखकारक परवनिताभिलाष कशाला? ह्या प्रस्तुत अशा अन्य अर्थाचाही बोध होतो.

२९ पर्यायोक्त—यांत वाच्य व वाचक या शब्दांचे साहाय्य न घेतां पर्यायानें वर्णन असतें. जसें,

व. ति. ज्या शापिती रिपुवधू बहुतापरींनें ॥
तैशीच जाय विलया रिपुकीर्ति भीनें ॥
त्याही यमासि सुटला थरकांप बा तो ॥
मंदोदरी गतधवा करि तो नमीतों ॥१॥

यांत शत्रूंचा नाश, त्यांच्या कीर्तीचें हरण, यमापेक्षां जास्त पराक्रम व रावणाला मारणें असें श्रीरामाचें पर्यायानें वर्णन आलें आहे.

३० व्याजस्तुति—यांत निंदेनें स्तुति अथवा स्तुतीनें निंदा व्यंजित असते ह्मणजे बाहेरून निंदा आंत स्तुति किंवा बाहेरून स्तुति व आंत निंदा गर्भित असते. गर्भित स्तुतीचें उदाहरण.

दिंडी. सुजनसंनिध बसवुनी पापियाला । स्वर्गी नेसी देवोनि सत्सुखाला ॥
अहा जान्हवि गे काय ह्मणों याला । सांग कोठें टाकिशी विवेकाला?

यांत सज्जनाप्रमाणेंच दुर्जनालाही गंगा स्वर्गास नेते अशी तिची वरून निंदा असून ती महापातक्यासही उद्धरिते अशी तिची गर्भित स्तुति आहे. उ.२

साकी. अहा समुद्रा पूर्ण धन्य तूं क्षारजलें बा होसी ॥

कोणि न याचक तुज त्रास दे काय वानुं मी तुजसी ॥१॥

यांत वरून समुद्राची स्तुति आहे खरी परंतु त्याच्या क्षार पाण्यानें कोणाचीहि तृषा भागत अशी त्याची गर्भित निंदा आहे.

३१ व्याजनिंदाः—यांत एकाच्या निंदेनें दुसऱ्याची निंदा व्यक्त होते. जसें,

गीति. विधिचाच दोष येथें करि काका ध्वनि तुझा न अन्याय ॥

जो दे सहवास तुझा सरल पिका आम्रवृक्षिं वदुं काय ॥१॥

यांत विधीच्या निंदेनें काकनिंदा व्यक्त झाली आहे.

३२ आक्षेपः——यांत आपण प्रथम सांगितलेल्या गोष्टीचा विचारानें फिरून स्पष्ट अगर गर्भित निषेध केला असतो. जसें,

मालिनी. त्यजुनि मजसि जासी जाय कांतारिं रामा ॥

पळभरि नच राहे प्राण माझा सुकामा ॥ १ ॥

यांत दशरथानें वनांत जाण्यास रामास सांगितलें खरें पण जाऊं नको असा गर्भित निषेध आहे.

३३. विरोधाभासः—यांत वास्तविक विरोध नसून त्याचा भास होतो

गीत्यर्ध. नोहे कदन भयंकर कंदुकलीलेपरी तया वाटे ॥ १ ॥

यांत मनुष्यहनन भयंकर असतांही कंदुकलीलेप्रमाणें तें मनोरंजक वाटतें असा विरोधाभास वर्णिला आहे. केव्हां केव्हां श्लेषयुक्त शब्दानेंहि हा अलंकार होतो. जसें, ‘ तें शेत राईएवढें आहे ’ यांत राई हा श्लिष्ट शब्द आहे. राई ह्मणजे मोहरी व राई ह्मणजे बाग. राईएवढें शेत आहे ह्मणजे बागेएवढें आहे असा वस्तुतः अर्थ असतां तें मोहरीएवढें आहे असें वाटतें.

३४ विभावना—यांत कारणावांचून कार्योत्पत्ति वर्णितात. जसें,

स्रग्धरा. राज्यावांचोनि गाजे अवनितळिं पहा कीर्तिदुंदूभि ज्याचा ॥
कळतें धाक वाटे शर, चमु नसतां शांत ऐशा मुनीचा ॥१॥

यांत राज्य, सेना, बाण वगैरे नसतां काळाला मुनीचा धाक वाटतो असें वर्णिलें आहे. कधीं कधीं सामुग्री पुरी नसतांही कार्योत्पत्ति झाल्याचें वर्णितात.

शिखरिणी. फुलांचें कोदंड, भ्रमरमय मौर्वी, शर तसे ॥
लक्ष्मण शास्त्री सरोजादी पंच स्फुट सुरभि साह्यप्रद असे ॥
लेले. सुखस्पर्शी भारी रथ मलयजोद्भूत पवन ॥
अशा सामग्रीनें रतिरमण जिंकी त्रिभुवन ॥ १ ॥

त्रिभुवन जिंकण्याला पुष्कळ सामुग्री पाहिजे. पण तितकी नसूनही मदनानें तें कार्य साधलें. यांत मदनाचा विलक्षण पराक्रम दिसून येऊन विरोधपरिहार होतो. प्रतिबंधक सामुग्री असूनही कार्योत्पत्ति वर्णितात. जसें,

गीति. राया गमे तुझा हा आश्चर्यकरप्रतापमय रवि, तो ॥
अलं. ग्र. छत्ररहित रिपु सोडुनि छत्रधरांतेंचि फार तापवितो ॥१॥

यांत तापप्रतिबंधक सामग्री असूनही कार्योत्पत्ति झाल्याचें वर्णिलें आहे. अकारणापासूनही कार्योत्पत्ति वर्णितात. जसें,

साकी. इंदीवरयुगुलांतुनि निघती कैंवि शिलीमुख पाही ॥
तिलपुष्पांतुनि चन्दनसौरभ वायु घेउनि येई ॥ १ ॥

यांत इंदीवरांतून शिलीमुख निघणें व तिळपुष्पांतून सुगंध निघणें या अकारणापासून कार्योत्पत्ति वर्णिली आहे. विरुद्ध कारणांपासूनही कार्योत्पत्ति वर्णितात.

गीति. जार्जरवे उदयें तव कुवलयिं उल्लास कांति नक्षत्रां ॥
संकोच येइ नवलचि परराजकुमारपाणिशतपत्रां ॥ १ ॥

यांत सार्वभौम जार्ज बादशहांच्या प्रतापरवीचें वर्णन आहे. यांत रवीपासून चंद्रविकासी कमलांना उल्हास, नक्षत्रांना कांति व सूर्यविकासी कमळें मिटणें अशी विरुद्ध कारणांची सामग्री असतांही कार्योत्पत्ति वर्णिली आहे. वस्तुत: जार्ज रवीच्या उदयानें कुवलयास ह्मणजे भूगोलास दीपविणें, इतर क्षत्रिय कुळें न चमकणें आणि इतर राजकुमार बद्धांजुलि होणें हीं कार्यें यापासून सूचित होतात. कधीं कधीं कार्यापासून कारणोत्पत्ति झाल्याचें वर्णितात. जसें,

गीत्यर्ध. त्वत्कीर्तिकामधेनूपासुनि निपजे नृप पहा सिंधू ॥

यांत सिंधूपासून कामधेनूची उत्पत्ति असतां उलट वर्णिलें आहे.

३५ **विशेषोक्ति**—यांत भरपूर कारण सामग्री असतांही कार्योत्पत्ति होत नाहीं असें वर्णितात. जसें,

शिखरिणी. तुझ्या पाशीं ऐशी विपुल जललक्ष्मी असुनिया ॥
म. भा. वि. तडागा येईना अणुहि तृषितांची तुज दया ॥
निदाघीं चण्डांशु प्रखर किरणीं आग पसरी ॥
तदा कां तत्तृष्णा करिशिल कृशांगा वद तुरी ॥१॥

यांत विपुल पाणी असूनही तृषिततृप्तिकार्य होत नाहीं असें वर्णिलें आहे.

३६ **असंभव**—यांत एकाद्या घडलेल्या गोष्टीची असंभाव्यता वर्णितात. जसें,

दिंडी. जया उचलाया त्रिशत गण शिवाचे । झटति यत्नें नुचलेंचि तरी साचें
शिरिष-कुसुमांगीं राम, परी ऐसें । कुणा ठावें उचलील कुसुम जैसें ॥

यांत लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत.

३७ **असंगति**—यांत कारण एका ठिकाणीं व कार्य एका ठिकाणीं झाल्याचें वर्णितात. जसें,

साकी. कालियसर्पें कृष्ण वेढितां गोप गणां भी वाटे ॥
तनुहि थरथरे रोमांचें ये अश्रू नयनांवाटे ॥ १ ॥

यांत सर्पाचा विळखा हें कारण श्रीकृष्णाचे ठिकाणीं व भीति वाटणें गोप-गणांचे ठिकाणीं असा भिन्नस्थळीं कारणकार्यसंबंध वर्णिला आहे.

३८ विषम—यांत अननुरूप अशा वस्तूंचा योग वर्णिला असतो. जसें,

अनुष्टुब. शिरीषकुसुमा कोठें? कोठें? तो मदनज्वर ॥
पिनाकीचाप हें कोठें? कोठें? कोमळ राम हा ॥ १ ॥

यांत निरनिराळ्या अननुरूप अशा दोन वस्तूंचा संबंध वर्णिला आहे. कार्य व कारण यांत गुणविरोध असतांही हा अलंकार होतो. जसें,

साकी. कृष्ण खड्ग तव धवल कीर्ति ही प्रसवे बहुपरि जगतीं ॥
नाम कृष्ण तव हृदय धवळ ही त्र्यैलोक्यीं अशि ख्याति ॥१॥

यांत खड्गवर्ण काळा व तज्जन्य कार्य कीर्ति हिचा रंग धवल त्याचप्रमाणें नांव कृष्ण व हृदय शुद्ध असा यांत गुणविरोध वर्णिला आहे. इष्टकार्य करावयास प्रवृत्त व्हावें तों अनिष्टप्राप्ति होते. असेंहि वर्णितात.

आर्या. अहिमंजूषिं शिरे अखु भक्ष्यासाठीं करोनि तळमळती ॥
खाय तया सर्प परी काय असे ही विचित्र दैवगती ॥ १ ॥

यांत लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत. कधीं कधीं दुसऱ्याचें अनिष्ट इच्छावें तों उलट आपलेंच अनिष्ट घडतें असेंहीं वर्णितात. जसें,

साकी. धन-लोभें कुणि धनिक-वधास्तव पाषाणीं कर घाली ॥
कडकडुनी परि अहि डंखे त्या विपरित करणी झाली ॥ १ ॥

भावार्थ उघड आहे. कधीं कधीं अनिष्टप्राप्ति असूनही आनंद मानिल्याचें वर्णितात. जसें,

दिंडी. जरी सुजनातें छळिति दुष्ट लोक । परी अंतरिं मानिती परम तोख ॥
आत्मसंयमना साधिती तयानें । विपत्कालिंहि वर्तती बहु सुखानें ॥

लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत. कधीं कधीं अनिष्टपरिहार करावयाचा यत्न केला असतांही तें कायम राहिल्याचें वर्णितात. जसें,

व. ति. जावा कलंक ह्मणुनी मृगलांछनानें । त्वद्वक्त्ररूप धरिलें, तिलकच्छलानें
अ. प्र. तेथेंहि लाविशि कलंक तयास तन्वी । नारी समाश्रित जनासि कलंक लावी

भावार्थ उघड आहे. कधीं कधीं मनोरथसिध्यर्थ एकाद्यास पाठविलें असतां तो पाठविणाऱ्याच्या कार्याला बाजूस ठेवून स्वकार्य साधतो असेंही वर्णितात. जसें,

साकी. प्रियाराधनीं दूति धाडितां तों ती त्या रत झाली ॥
मूढपणा मम दैवगती ही माझी मजला फळली ॥ १ ॥

भावार्थ उघड आहे. दुसऱ्याचें अहित करण्याच्या हेतूची असिद्धि वर्णिली असतांही हा अलंकार होतो. जसें.

व. ति. अद्यापि पुत्रमुखपंकज जो न पाहे ॥
रघुवंश. त्वच्छाप त्या मज अनुग्रह सत्य आहे ॥
कीं क्षेत्रभूमि जरि पेटुनि अग्नि जाळी ॥
बीजांकुरोद्भवकरी करि तेचि काळीं ॥ १ ॥

ही आपणास शाप देणाऱ्या श्रावणाच्या बापास उद्देशून दशरथाची उक्ति आहे. दशरथाला पुत्र नसल्यानें शापापासून पुत्रप्राप्ति होणें हा लाभ झाला अर्थात् अनिष्ट हेतूची असिद्धि झाल्याचें वर्णिलें आहे.

**३९ सम**–यांत अनुरूप अशा वस्तूंचा योग वर्णिला असतो. जसें,

गीत्यर्थ. सुंदर रतिसम सीता तोही तैसाचि राम सुकुमार ॥

भावार्थ उघड आहे कार्याची कारणाशीं सादृश्यता दाखविली असतांहि हा अलंकार होतो. जसें,

साकी. नीच-सेवनीं दक्ष रमे तूं उचित तुला जलजेला ॥

जलापासून लक्ष्मी उत्पन्न झाली आहे. जलाचा गुण अधोभागीं जाण्याचा आहे. आणि लक्ष्मीहि नीचांचें सेवन करिते अर्थात् कार्य जें लक्ष्मी तिचें कारण जें जल त्याच्याशीं सादृश्यता दाखविली आहे.

४० विचित्र—यांत फलेच्छेविरुद्ध प्रयत्न केल्याचें वर्णितात जसें,

गीति. खलमुख मलिन कराया विमल करी तव सुकीर्ति सकळ मही ॥
अ. वि. मित्राल्हाद कराया मित्राशीं द्रोह करि पराक्रम ही ॥१॥

भावार्थ उघड आहे. यांत मित्र शब्दांत श्लेष आहे.

४१ अधिकः—यांत आधेय व आधार यांपैकीं एकाद्याचें विस्तृतत्व वर्णन करण्यासाठीं एकास लघुत्व दिल्याचें वर्णितात. जसें,

गीति. ज्या उदरांत सकळही लोकत्रय सावकाश राहतसे ॥
मोरो. त्यांतचि मुनिवर दर्शन होतां आनंद तो न मावतसे ॥ १ ॥

यांत आधारापेक्षां आधेयाचें महत्व वर्णिलें आहे. उदाहरण २ रें.

अभंग. अनंत ब्रह्मांडें ॥ एका रोमीं ऐशीं पेंडें ॥
तुका. तो हा गौळीयाचे घरीं ॥ उंबरा चढतां टेंका धरी ॥ १ ॥

यांत आधेयाहून आधाराचें महत्व वर्णिलें आहे.

४२ अल्पः— यांत अल्प अशा आधेयापेक्षां आधाराचें लघुत्व वर्णितात.

सु. का. विरहकर्शिता होसि तूं किती । कठिण ही दशा त्या नसे मिती ॥
सुजपमालिका थोर ही जशी । तव करीं दिसे मुद्रिका तशी ॥१॥

४३. अन्योन्यः— यांत दोन वस्तु परस्परांवर क्रियेच्यायोगें उपकार करितात असें वर्णितात. जसें,

गीति. महिमान वाढवीती भक्त विभूचें विभूहि भक्तांचें ॥
अतुल्प्रेमें हृदयीं चिंतिति निशिदिनिं परस्परां साचें ॥ १ ॥

यांत भक्त व प्रभू हीं परस्परांस उपकारक आहेत असें वर्णिलें आहे.

४४. **विशेषः**— यांत प्रख्यात आधाराशिवाय आधेयाचें वर्णन करितात.

स्वागता. स्वर्गिं सत्कविमणी जरि जाती । लोकिं या स्ववचनें सुख देती ॥
न्याय जैं रवि वधूसदनास । दीपिं तत्कर करी तमनाश ॥ १ ॥

यांत सत्कवि हे प्रख्यात आधार विद्यमान नसले तरी त्यांच्या काव्याची स्थिति वर्णिली आहे. व त्यास दृष्टांतादाखल जी गोष्ट सांगितली आहे तींत सूर्य हा प्रख्यात आधार अस्तंगत झाल्यावर त्याच्या किरणांना दीप हा अन्य आधार वर्णिला आहे. कधीं कधीं प्रसिद्ध अशी एकच वस्तु एकाच वेळीं सर्वत्र आहे असें वर्णितात. जसें,

दिंडी. जळीं काष्ठीं पाषाणीं भूवरींही । नभिंहि कृष्णा दशादिशा दिससि पाहीं
ध्यानिं मनिंही मी स्वप्निं तुला पाहीं । स्वरिपु यास्तव हा ध्यास मना होई

यांत श्रीकृष्ण हीं प्रसिद्ध वस्तु एकाच वेळीं सर्वत्र असल्याचें कंसास दिसत आहे असें वर्णन आहे. कधीं कधीं कर्ता एकादें कार्य करित असतां त्याचे हातून महत्वाचें दुसरेंच कार्य घडतें असें वर्णितात. जसें,

साकी. सृष्टिविलोकन करितां न्यूटन फिरे रम्य वनराजीं ॥
शोधि गुरुत्वाकर्षण तैं तो तरुफल पडतां सहजीं ॥ १ ॥

लक्षण समन्वय हीं स्पष्ट आहेत.

४५. **व्याघातः**— यांत एकादा मनुष्य कोणतेंहीं कार्य एका साधनानें साधतो तर त्याच साधनानें दुसरा त्यास विघात करितो असें वर्णिलें असतें. जसें,

अभंग. वाघें उपदेशिला कोल्हा । सुखें खाऊंदेरे मला ॥ १ ॥
तुकाराम. अंतीं मरसी न चुके । मजही मारतोसी भुके ॥ २ ॥
येरु ह्मणे भला भला । निवाड तुझ्या तोंडें झाला ॥ ३ ॥
देह तव जाणार । घडेल हा उपकार ॥ ४ ॥

यांत कोल्ह्यानें वाघास त्याच्याच ह्मणण्यानें त्या निरुत्तर केलें आहे.

४६ कारणमाला:—यांत प्रथम सांगितलेली वस्तु तिच्यापुढील वस्तूचें कारण होतें अगर पुढील वस्तु तिच्या मागील वस्तूस कारण होतें. जसें,

दिंडी. विषयचिंतनिं सहवास हवा, त्यानें। काम वाढतसे क्रोधही तयानें ॥
मोह तेणें भ्रम तयें बुद्धिनाश। तयें होई बा घात तो स्वतास ॥

लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत.

४७ एकावलि:—यांत पुढें सांगितलेली वस्तु मागील वस्तूचें विशेषण रूपानें समर्थन अगर निषेध करीत चालली आहे असें वर्णितात.

उपजाति. धर्में नृपा बुद्धि तुझी विशुद्धा ॥ लक्ष्मी तिच्याशीं सहसा निबद्धा ॥
ल. लेले. लक्ष्मी करी सर्व जनांस तुष्ट ॥ कीर्ती करी ती जन सर्व तुष्ट ॥१॥

यांत धर्मबुद्धीचें लक्ष्मीनें व लक्ष्मीचें सर्व जनास संतोष देण्यानें असें क्रमानें विशेषणरूपानें समर्थन केलें आहे. उदाहरण २ रें.

फटका. देई न चित्ता विनय, शांति जरि नच विद्या मग ती ॥
नच जरि विद्या व्यर्थ जनन मग जननि शीणली ती ॥ १ ॥

यांत प्रथम वस्तूचा पुढील वस्तूनें निषेध केला आहे.

४८ मालादीपक:—दीपकाचा हा एक प्रकार आहे. यांत क्रमानें एक वस्तु दुसरीस दुसरी तिसरीस अशा क्रमानें उपकारक होते. जसें,

शा. वि. येवोनीं रणिं तूं नृपा गुण जधीं चापासि तो लाविला ॥
भूपा ऐक तदा कुणी कुणि कसा तो शुभ संपादिला ॥
कोदंडें शर ते, शरीं अरि-शिरें, त्यांहीं तशी ती मही ॥
तीनें तूज, तुवां सुकीर्तिहि, तिनें त्र्यैलोक्य तें सर्वही ॥

यांत 'संपादिला' हा क्रियारूप धर्म एकदांच वर्णिला आहे. यांत कोदंड या प्रथम वस्तूनें शर या दुसऱ्या वस्तूस अरिशिरें प्राप्त करून उपकृत केलें. शर

या दुसऱ्या वस्तूनें ' मही ' प्राप्त करून देऊन ' अरिशिरें ' या तिसऱ्या वस्तूला उपकृत केलें आहे याच क्रमानें पुढें जाणावें.

४९ **सार:**—यांत एकाहून दुसऱ्या वस्तूचा अशा क्रमानें उत्कर्ष किंवा अपकर्ष वर्णितात.

शा. वि. प्राण्यांतें वसुधा, तिला जल, तया तो अग्नि, वायू तया ॥
व्यापे जें नभ तें तवोदरिं वसे गातों तुला स्वामिया ॥१॥

यांत क्रमानें एकाहून एका वस्तूचा प्रकर्ष दाखविला आहे. उदा. २ रें.

अ. वि. ब्रह्म विशाल तयाहुनि आशा ब्रह्माहुनींहि अति गहन ॥१॥

यांत क्रमानें अपकर्ष वर्णिला आहे.

५० **यथासंख्य:**—यांत ज्याप्रमाणें पदांचा क्रम असतो त्याच क्रमानें त्यांचा अन्वय असतो. जसें,

उपजाति. तृणें मृगाला सलिलें झषाला ॥ संतोष हे वृत्ति महाजनाला ॥
वा. पं. तयास निष्कारण तीन वैरी ॥ किरात, कैवर्तक, दुष्ट भारी॥१

५१ **पर्याय:**—यांत एकाच पदार्थाला अनेक आश्रय क्रमाक्रमानें वर्णितात.

साकी. सुरलोकाहुनि गंगा येउनि शिवजटिं झाली गुप्त ॥
प्रगटे तेथुनि पतितोद्धारा भूतलिं हर्षें सत्य ॥१॥

यांत लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत. उत्तरोत्तर आश्रयाचा संकोच वर्णिला असतां संकोचपर्याय अलंकार होतो; जसें,

व. ति. आधीं फिरोनि बहुधा वसुधाहि सारी ॥
अ. वि. छायेंत घेइ तरुच्याहि उसंत भारी ॥
हा प्रौढ चंडकर मध्य दिनास येतां ॥
तें शैत्य जाय उदकांत हळूंच आतां ॥ १ ॥

यांत शैत्याचा उत्तरोत्तर संकोच वर्णिला आहे. एक आश्रय कायम असूनही दुसऱ्या आधाराची स्थिति वर्णिली असतां विकासपर्याय अलंकार होतो. जसें,

दोहा. व्यापे सर्वहि चराचर जरि तो राम दयाळ ॥
मम हृदयीं नित वास करि काय करिल मग काळ ॥ १ ॥

भावार्थ व विवेचन हीं स्पष्ट आहेत. एकाच वस्तूच्या ठिकाणीं क्रमानें अनेक वस्तूंची स्थापना केल्याचें वर्णिलें असतांही हा अलंकार होतो. जसें,

दोहा. जिथें मनोहर आज हें पुळिन दिसे नयनास ॥
नदिस्त्रोत बहु रम्य तैं वाहत होता खास ॥ १ ॥

भावार्थ व विवेचन हीं स्पष्ट आहेत.

**५२ परिवृत्ति**—यांत समसमान अथवा उण्या अधिक वस्तूंची अदलाबदल झाल्याचें वर्णितात. जसें,

रथोद्धता. मर्त्य जर्जर जटायुषास्तव । व्यर्थ शोक करिसी रमाधव ॥
युद्धि अर्पुनि तनूसि जीर्णशा । जोडि इंदुकिरणोज्वला यशा ॥१॥

यांत जटायूनें क्षीणदेहत्यागानें स्वर्ग संपादिला असें वर्णन आहे.

**५३. परिसंख्या**:— यांत समान अशा अनेक पदार्थांतून एकाचें ग्रहण करून बाकीच्यांचा स्पष्ट अथवा गर्भित त्याग वर्णिला असतो. केव्हां केव्हां त्यामध्यें प्रश्नही पण असतो. कधीं प्रश्न नसून निषेध स्पष्ट असतो. जसें,

पद. प्रपंच ह्मणजे काय? दिसत जी विराट पुरुषाकृती ॥
वै. पद्य. मा. माया ह्मणजे? समजुनि उमजुनि मोहिं भुले बघ मती॥१

यांत ज्या वस्तूची पृच्छा केली आहे ती प्रश्नरूपानें विचारली आहे. उ. २रें

गीति. शूर भुजांनीं क्षत्रिय, शब्दांनीं विप्र, पार्थ चापानें ॥
मोरोपंत. केवळ मनोरथांनीं, कर्णा तूं शूर न प्रतापानें ॥ १ ॥

यांत प्रश्न नाहीं, पण अन्य सदृश पदार्थांचा निषेध गर्भित आहे.

५४ विकल्पः—यांत परस्परविरुद्ध अशा समबल गोष्टी एकत्र वर्णितात.

अनुष्टुब्.

निजमाथा धनू किंवा नमवोत महीभुज ॥
दुःखांतासी करो आज कांत किंवा कृतांत तो ॥१॥

यांत लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत.

५५ समुच्चयः—यांत इष्ट हेतूच्या सिद्ध्यर्थ एकच गोष्ट पुरे असतां आणखी अनिरुद्ध गोष्टींचा संभव वर्णितात. जसें,

द्रु. वि.

व्यसनिं धैर्य, सुदैविं सहिष्णुता, । विबुधिं वाक्पटुता, रणिं वीरता
रुचि यशीं, मति शास्त्रि सदा अहा ॥ सहज सद्गुण सज्जनिं हे सहा ॥

यांत विपत्कालीं धैर्य धरणें ही एकच गोष्ट थोर मनुष्याचा मोठेपणा सिद्ध करण्यास पुरे असतांही आणखी अनिरुद्ध अशा गोष्टी अनुषंगानें वर्णिल्या आहेत. कधीं कधीं एकच कारण पुरें असतां इर्ष्येनें अन्य कारणेंही पुढें येतात. जसें,

शिखरिणी.

प्रगूढा दे दाना, सदनिं कुणि ये आदर करी ॥
कृताभिष्टीं मौनी, परकृति मुदें वानित परी ॥
निगर्वी जो द्रव्यीं, करि न परनिंदा, स्तवि गुणां ॥
रुची मोठी शास्त्रीं प्रकटवि कुलीना नित जनां ॥ १ ॥

भावार्थ उघड आहे. यांत गुप्त दान देणें हा एकच हेतु कुलीनत्व सिद्ध करण्यास पुरेसा आहे तथापि अनुषंगानें इतरही गोष्टींचें वर्णन आलें आहे.

५६ कारकदीपकः—यांत क्रियापदें अनेक असून कारक एकच असतें.

साकी.

श्रीरामा कुरवाळी चुंबे, अवघ्राणि शिर क्षणिं ती ॥
निजांकिं घेई, करि कुरवंडी तें कौसल्या सुमती ॥ १ ॥

५७ समाधिः—यांत प्रारंभित कार्यास अन्य कारणांनीं सौलभ्य वर्णितात.

मालिनी. उदित भरत हेंई भेटण्या राजनाथा ॥
तंव पवन, सुतानें आणिली रम्य वार्ता ॥ १ ॥

यांत लक्षण व समन्वय हीं उघड आहेत.

५८ प्रत्यनीकः—यांत पराक्रमी अशा शत्रूचा नाश करणें अशक्य वाटून शत्रुपक्षाकडील इतर कोणाचाही सूड उगविल्याचें वर्णितात. जसें,

स्वागता. छेदि जो स्वशिर त्या यदुराया ॥ राहु शक्त नव्हताचि वधाया ॥
ल. लेले. तन्मुखच्छवि विधूमधिं राहे ॥ त्यासि राहु ह्मणुनी छळिताहे ॥ १ ॥

यांत लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत.

५९ काव्यार्थापत्तिः—यांत असें आहे तर असें कां न होईल? असें वर्णितात.

गीति. क्षुद्रा पशु पक्ष्यांची काय कथा? पांचही महाभूतें ॥
इ. चिप. ज्ञानबळें आवळुनी केलें मनुजें स्वदाससम त्यांतें ॥ १ ॥

यांत मनुष्यांस जर पांचही महाभूतांना दासाप्रमाणें वागवितां येतें तर क्षुद्र अशा पशुपक्ष्यांची कथा काय? असें वर्णिलें आहे.

६० काव्यलिंगः—यांत प्रतिपाद्य अशा अर्थाचें युक्तीनें समर्थन करितात.

अनुष्टुभ. वृथा रिणासि कंदर्प वसे श्रीहर मन्मनीं ॥
रणनिधीं तो शुक्राचार्य फिरे मागें गड्या त्वरें ॥ १ ॥

यांत कोणा एका मुनीनें स्वमनोनिग्रहाचें युक्तीनें समर्थन केलें आहे.

६१ अर्थांतरन्यासः—यांत सामान्य व महत्वाच्या अशा अर्थांनीं परस्परांचें महत्व वर्णितात. जसें,

उ. जा. आली जरी कष्ट दशा अपार ॥ न टाकिती धैर्य तथापि थोर ॥
दा. पं. केला जरी पोत बळेंचि खाले ॥ ज्वाळा तरी ते वरती उफाळे ॥ १ ॥

यांत थोर लोक प्रसंगीं धैर्य टाकित नाहींत या महत्वाच्या गोष्टीचें समर्थन पोत बळेंच खालीं केला तरी ज्वाळा वर येतात या सामान्य गोष्टीनें केलें आहे.

शालिनी. सिंहाचा जो बाल तोही चपेटा ॥ मारी त्याला जो करी मत्त मोठा ॥
म. ४ थें पु. तेजस्वी जे वृत्ति ऐशी जयाची ॥ तेथें कांहीं चाड नाहीं वयाची ॥

यांत सिंहाचा लहानसा छावा, माजलेल्या अशा मोठ्या हत्तीसही मारतो. या सामान्य अर्थाचें समर्थन तेजस्वी माणसांना वयाची चाड असत नाहीं या विशेष अर्थानें केलें आहे.

६२ **विकस्वरः**—यांत विशेष अर्थाच्या समर्थनासाठीं सामान्य अर्थ सांगतात व तो स्पष्ट व्हावा ह्मणून पुन्हां विशेष अर्थाचें प्रतिपादन करितात. जसें,

शा. वि. कर्णाला कटु शब्द सोडुनि उगा बा बैससी तूं जरी ॥
काका आम्रतरूवरी मग तुला कोकील मानूं तरी ॥
म. क. पु. कीं वस्तु स्थलवैभवें करुनिया मोठेपणा पावतो ॥
नेपालेश्वरभाललग्नचिखला कस्तूरिका मानिती ॥ १ ॥

यांत प्रथमार्धांत कथन केलेल्या विशेष अर्थाच्या समर्थनार्थ तिसऱ्या ओळींत सामान्य अर्थ सांगितला असून पुन्हां तो स्पष्ट व्हावा ह्मणून चतुर्थ ओळींत विशेष अर्थाचें प्रतिपादन केलें आहे.

६३ **प्रौढोक्तिः**—यांत उत्कर्षास वस्तुतः कारण नसूनही दुसऱ्या पदार्थांवर उत्कर्षाच्या कारणाची संभावना करितात असें वर्णिलें असतें. जसें,

गीति. चिंतामणि कल्पतरू घेउनि तशि कामधेनु सांगाती ॥
नारायणभूपाला रचिली विधिनें तुझी धवल कीर्ति ॥ १ ॥

यांत चिंतामणि, कल्पतरु व कामधेनु हीं नारायणनामक राजाच्या विमल कीर्तीला कारण नसून त्यांवर त्या हेतूची स्थापना केली आहे.

६४ **संभावनाः**—यांत अमुक असें असतें तर असें होतें असें सांकेतिक वर्णन असतें. जसें,

गीत्यर्थ. जरि मी असतों पंडित हरला असता तरी तुझा गर्व ॥

यांत लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत.

६५ मिथ्याध्यवसातिः—यांत एकाद्या दुर्घट अगर मिथ्या कार्याच्या सिध्यर्थ दुसऱ्या दुर्घट अगर मिथ्या कार्याची कल्पना करितात. जसें,

शिख. बळानें काढूं ये मणि मकरदाढेंत दडला ॥
महा सिंधूल्लाटातरण करुं येई भुजबळा ॥
वा. पं. महासर्पातें ही सुमसम धरूं ये निजशिरीं ॥
परंतु क्षुद्राचें हृदय धरवेना क्षणभरी ॥ १ ॥

यांत मूर्खाचें समाधान करणें या दुर्घट कार्याच्या सिध्यर्थ सुसरीच्या दाढेंत गेलेला मणि बाहेर काढणें वगैरे इतर दुर्घट कार्यांची कल्पना केली आहे. जसें,

६६ ललितः—यांत प्रस्तुत वर्णनीय अर्थाचें वर्णन न करितां तत्प्रतिबिंबभूत विषयाचें वर्णन असतें. जसें,

गीत्यर्ध. प्रदिप्त मंदिर झाल्या होई कूपखननीं उद्युक्त ॥

यांत घरास आग लागल्यावर विहीर खणण्याचा उद्योग करणें अशा प्रतिबिंबानें वर्णन आलें आहे.

६७ प्रहर्षण :—यांत यत्नावांचून फलाची साध्यता, अगर इच्छिल्यापेक्षां अधिक फलप्राप्ति किंवा फलार्थ यत्नास प्रारंभ करतां तोंच प्रत्यक्ष साध्यता झाल्याचें वर्णितात. जसें,

शा. वि. व्यापे अंबर मेघिं हें वन-मही श्यामा तमालीं, पहा ॥
झाली रात्रहि भीरु हा तरि यया ने तूंचि राधे गृहा ॥
ऐसा नंद-निदेश तों प्रतितरूखालीं सुलीलाऽद्भुत ॥
राधामाधव ते सहर्ष करिती कालिंदि-तीरीं श्रुत ॥ १ ॥

यांत राधा व कृष्ण यांना परस्परांचा सहवास इष्ट आहेच. त्यांत नंदानें सावेला श्रीकृष्णास घरीं पोंचविण्यास अनायासें आज्ञा केली त्यामुळें त्यांचा हेतु साध्य झाला असें वर्णिलें आहे. २ रें उदाहरण.

रथोद्धता. अल्प बिंदु जरि चातक याची ॥ मेघ भू जलमया करि साची ॥
होय तृप्ति अवघ्याहि जगाची ॥ धन्य वृत्ति अशि थोर जनाची ॥

यांत चातकास इष्टार्थापेक्षां अधिक लाभ झाल्याचें वर्णिलें आहे. उ. ३ रें.

साकी. भूगत-धन-निधिसाठीं नयनीं घालुनि अंजन, खननीं ॥
होई जों उद्युक्त येइ तैं इच्छित साध्य घडोनी ॥ १ ॥

यांत इच्छित अर्थाच्या प्राप्तीसाठीं यत्न केला तोंच द्रव्यनिधि सांपडल्याचें वर्णन आहे.

६८ **विषादन**:–यांत इष्ट हेतूविरुद्ध परिणाम घडल्याचें वर्णितात. जसें,

व. ति. जावोनि रात्र रवि येइल सुप्रभातीं ॥
हर्षें फुलेल मग पंकज होय मुक्ति ॥
ऐशा मनोरथिं गढे अलि कोशयुक्त ॥
तैं हाय नाशि नलिनी गज तो प्रमत्त ॥ १ ॥

यांत लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत.

६९ **उल्लास**:–यांत एकाच्या गुणदोषांनीं दुसऱ्यास गुणदोषाची प्राप्ति झाल्याचें वर्णिलें असतें. जसें,

साकी. आम्रमंजरी-गंध देत बहु कोकिळगाना रंग ॥
परि संतापा कारण होई विरहि जनां तो चांग ॥ १ ॥
पिकासमिप दे स्थल काकाही काय वदूं सौजन्य ॥
अशा कुशब्दें काक करित जरि पिक-गानासि अपाय ॥१॥

यांत चार ओळींत चार उदाहरणें आहेत. पहिल्या ओळींत आम्रमंजरीच्या सुगंधानें कोकिळगानास रंग आला अर्थात् गुणांनीं गुण; दुसरींत आम्रमंजरीनें विरही जनास संताप होतो म्हणजे गुणानें दोषप्राप्ति, तिसरींत कोकिला शेजारीच कावळ्यास आश्रय देणें हा दोष, पण त्यानें समदृष्टि दिसून येऊन सौजन्य व्यक्त

होतें अर्थात् त्यापासून गुणप्राप्ति व चवर्थीत कावळ्याच्या कर्कश शब्दानें कोकिलगानास व्यत्यय येऊन दोषानें दोषप्राप्ति झाल्याचें वर्णिलें आहे.

७० **अवज्ञा** :—यांत एकाच्या गुणदोषांनीं दुसऱ्यास त्याची अप्राप्ति वर्णितात.

गीति. वर्षे शशी अमृत बहु परि सेवित अल्पसें चकोर पहा ॥
तैं मिटती पंकजतति हानी ती काय होय विधुस अहा ॥१॥

यांत चंद्राचें दातृत्व मोठें असून चकोरास तितकें स्वीकारण्याचें सामर्थ्य नाहीं ह्मणजे त्यास चंद्राची गुणप्राप्ति नाहीं व चंद्रोदय होतांच कमळें मिटतात ह्मणजे त्यांपासून चंद्रास दोषप्राप्ति नाहीं असें वर्णिलें आहे.

७१ **अनुज्ञा** :—यांत दोषामध्यें कांहीं गुण असला तर त्याची याचना केल्याचें वर्णितात. जसें,

अभंग. नलगे मुक्ति धनसंपदा । संत-संग देई सदा ॥
तुकाराम. तुका ह्मणे गर्भवासी । सुखें घालावें आह्मासी ॥१॥

यांत गर्भवास हें परम दुःखाचें मूळ आहे खरें पण संतसंग हा त्यांत गुण दाखविला असल्यानें त्याची याचना केली आहे.

७२ **लेश** :—यांत दोषास गुणाची व गुणास दोषाची कल्पना केली असते.

तुकाराम. बरा कुणबी केलों । नाहीं तरि दंभेंचि असतों मेलों ॥

यांत कुणबी होणें दोषमय असतां ब्राह्मण्यांत अहंभावाचा प्रादुर्भाव होतो तो त्यांत होत नाहीं ह्मणून त्यावर गुणत्वाची कल्पना केली आहे.

७३ **मुद्रा** :—यांत प्रस्तुत सूचक शब्दानें अप्रकृत सूचनीय अर्थ प्रकटतो.

वै. दे. एका विष्णूची भक्ति ही वैश्वदेवी । मायाद्वैताला सारुनी चित्तिं ठेवी ।
छं. गं. पावे अन्यांतें शास्त्रही दे प्रमाण । ये सिंधूमाजी जैं नदीतोय जाण ।

यांत श्रीविष्णूच्या वैश्वदेवी ( वसुधैव कुटुंबकम् ) अशा भक्तीचें वर्णन आहे. तथापि वैश्वदेवी, मायाद्वैत, शास्त्र व प्रमाण या शब्दांनीं वैश्वदेवी नामक वृत्त म म य य हे गण व शास्त्र ह्मणजे सहा आणि प्रमाण ह्मणजे

सहा मिळून बारा वर्णांनीं युक्त असें एक वृत्त आहे अशा अप्रकृत अर्थाची सूची झाली आहे. नाटकाच्या आरंभीं पुढें कोणतें नाटक होणार हें असेंच सुचविलें असतांही हा अलंकार होतो.

७४ **रत्नावली:**—यांत लोकप्रसिद्ध अर्थाचें क्रमानें वर्णन असतें.

मंदाक्रांता. लीलाब्जांना नयन-कमळें **पत्र** वादार्थ देती ॥
कुंदाशीं हे दशनहि तिचे **पूर्वपक्षा** करीती ॥
अ. प्र. भ्रूवेष्टांचा मदनधनुशीं जैं **अनूवाद** झाला ॥
वक्त्रज्योत्स्ना हिमकररुचीलागि दे **दूषणाला** ॥ १ ॥

यांत विद्वान् लोकांत प्रसिद्ध अशा क्रमानें, पत्रदान, पूर्वपक्षाचा उपन्यास, अनुवाद व दूषण हीं वर्णिलीं आहेत. याचप्रमाणें हे राजा तूं '**ब्रह्मा विष्णु महेश्वर**' आहेस यांत लोकप्रसिद्ध '**ब्रह्मा विष्णु महेश्वर**' हा क्रम उक्त आहे. प्रसंगोपात्त या क्रमांत बदल झाला तरी चालतो.

७५ तद्गुण:--यांत एकादी वस्तु आपला गुण टाकून संनिध असलेल्या दुसऱ्या वस्तूच्या गुणाचा स्वीकार करिते असें वर्णन असतें. जसें.

गीति. सुयश-निधे **जार्जनृपा** कधिं न घडे तव रिपूसि जल-पान ॥
स्थीर तुझी कीर्तिरुची पडतां भासोनि शुभ्र पाषाण ॥१॥

जार्ज राजाची स्थीर अशी कीर्ति सर्वत्र पसरली असून तिचा गुण पाण्यानें ही घेतला असें यांत कवीनें वर्णिलें आहे. कीर्तीचा रंग शुभ्र असतो असा कवि-संकेत आहे.

७६ **पूर्वरूप:**–यांत स्वगुण त्याग झाल्यावर पुन्हां त्याची प्राप्ति होते किंवा वस्तु विकृत होऊन पुन्हां ती पूर्ववत् होते असेंहि वर्णितात. जसें,

दिंडी. लिप्त शेषाहि शिव-कंठ-किरणिं पाही ॥ धवळ परि तो तव कीर्तिनेंच होई ॥
जरी रवि शशी निशि लुप्त पहा होती ॥ कीर्ति-किरणीं तव दिसे तेई चित्तीं.

यांत शितकंठ-संसर्गानें यद्यपि शेषास नीलिमा आला तरी कीर्तीनें त्यास पूर्ववत् धवलता प्राप्त झाली आहे असें पूर्वार्धांत वर्णिलें आहे. उत्तरार्धांत सूर्य व चंद्र हे जरी लोपले तरी तुझ्या कीर्तीनें दिसत आहे ह्मणजे विकृति झाल्यावर ही पूर्वस्थिति झाल्याचें वर्णिलें आहे.

७७ **अतद्गुणः**—यांत उत्कृष्ट अशी वस्तु सांनिध्यास असूनही एकादी वस्तु तिचा गुण घेत नाहीं असें वर्णितात.

गीति. आम्रतरूवरि बैसुनि त्या पिक-संनिधि खुशाल काकारे ॥
श्रुतिसुंदर तद्ध्वनि गुण अझुनी चित्तीं न घेसि तो कां रे? ॥१॥

यांत कोकिळाचें सान्निध्य असूनही त्याचा मधुर ध्वनि कावळ्यास घेतां आला नाहीं असें वर्णिलें आहे.

७८ **अनुगुणः**—यांत एकाद्या नैसर्गिक गुणाचा दुसऱ्या वस्तूच्या सान्निध्यानें उत्कर्ष वर्णितात. जसें,

साकी. आधि धनुर्धर वीर धनंजय, कृष्ण सारथी वरि तें ॥
भीष्मद्रोणासम अरि समरीं स्फुरण सहज मग ये तें ॥

यांत अर्जुनाचा इतरांच्या सान्निध्यानें उत्कर्ष वर्णिला आहे. 'आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला' वगैरे उदाहरणें अशींच जाणावीत.

७९ **मीलितः**—यांत सादृश्यामुळें प्रस्तुत वस्तूंतील भेद कळून येत नाहीं. ह्मणजे उभय साधारण धर्मामुळें एखादी वस्तु दुसरीवर आपलें वर्चस्व करिते असें वर्णितात. जसें,

स्रग्विणी. मल्लिका मालिका बालिका घालिती । सर्व अंगीं चंद्रचंदना लेपिती ॥
अ. वि. नेसतां ज्या सित क्षौम त्या चांदणी । माजि कीं ओळखूं येति ना भामिनी ॥

यांत चंद्रिका व श्वेतवस्त्र परिधान केलेल्या एका तरुणीचा पांढरेपणा यांचा धर्म समान असल्यानें उभयतांचा भेद कळून येत नाहीं असें वर्णिलें आहे.

८० सामान्यः—प्रस्तुत व अप्रस्तुत अशा समान धर्मीय वस्तूंतील प्रस्तुत गोष्टीचा भेद कळत नाहीं असें वर्णितात. जसें,

शा. वि. रूपें जे सम आकृतीं, वयहि तें, पांचानळां देखुनी ॥
लैं तो नैषधराज कोण नुमगे वैदर्भबाळे मनीं ॥ १ ॥

यांत पांचही नळांच्या सादृश्यामुळें खरा नळ कोणता हें दमयंतीस ओळखेना असें वर्णिलें आहे.

८१ उन्मीलितः—यांत एखाद्या विशिष्ट कारणानें दोन वस्तूंमधील भेद जाणिला जातो असें वर्णितात. जसें,

दिंडी. शाहु सुविमल तव यशोगिरी पाहीं । तसा सुंदर हिमगिरी असे दोही
परी आशंका नको, हिम तयांत । असे जाणति हे सुजन पहा नित्य ॥

यांत श्रीछत्रपति शाहूमहाराज कोल्हापूर यांचा यशोगिरी व हिमालय पर्वत हे दोन्हीही शुभ्र आहेत. पण हिमालय पर्वतांत नित्य थंडी असते या विशेष गुणानें त्याचा भेद समजला जातो असें वर्णिलें आहे.

८२ विशेषकः—यांत दोन पदार्थांमधील फरक कांहीं विशेष कारणानें स्पष्ट होतो असें वर्णितात. जसें,

गीति. हंस तसा बक शुभ्रचि भेद असे सांग काय उभयांत ॥
जलमिश्रित-पयसेवनिं हंसाचि तो हंस, बकाहि बक सत्य ॥ १ ॥

८३ उत्तरः—यांत कांहीं अभिप्राययुक्त उत्तर असतें अथवा उत्तरावरून प्रश्नाची उत्पत्ति होते असें वर्णितात. वस्तुतः अनेक प्रश्नोत्तरांचीं अपेक्षा असतांही एकच प्रश्न व एकच उत्तर हीं असलीं व त्यांतून एकांत कांहीं विशेष चमत्कार असला ह्मणजे झालें. जसें,

गीत्यर्ध. हीं येथें वेतासि तरि जाया परतीरिं मार्ग उत्तम हा ॥

यांत नदी उतरून जाण्याचा मार्ग विचारणाऱ्यास त्याजवर प्रेम करूं इच्छिणाऱ्या कोणा एका स्त्रीचें उत्तर वर्णिलें आहे. २ रें उदाहरण.

गीति. उत्तर काय जरीं? या सज्जनसंगति तसें सदाचरण ॥
भूतदया, धृति विपदीं, बांधव-मैत्री, सदा समाधान ॥ १ ॥

यांत एकच प्रश्न असून उत्तरें अनेक आहेत.

८४ सूक्ष्मः—यांत दुसऱ्याचा गूढ असा आशय जाणून स्वमतदर्शक एकादा व्यापार कोणी करितो असें वर्णितात.

गीति. कवणा शर विंधावा? शंकेनें पाहि कृष्णमुख पार्थ ॥
जाणुनि तदाशय प्रभु कर्णावरि ठेवि दोन्ही ही हात ॥ १ ॥

यांत श्रीकृष्णानें अर्जुनाचा अभिप्राय जाणून आपल्या कानांवर हात ठेविले व त्या व्यापारानें तूं कर्णावर हा बाण सोड असें स्वमतसूचित केलें आहे.

८५ पिहितः—यांत एकाद्याच्या मनांतील गुप्त हेतु आपणास कळला हें त्यास जाणण्यासाठीं एकादी क्रिया केल्याचें वर्णितात. जसें,

सत्क्यर्ध. प्रभातिं पति गृहिं येतां कांता शयन देइं त्या वेगीं ॥ १ ॥

यांत नवऱ्याच्या पहांटेच्या येण्यानें त्यानें सवतीच्या घरीं रात्र काढली हें आपणास समजलें हें दर्शविण्यासाठीं कोणी एक स्त्री त्यास अंथरूण घालून देती झाली. असें वर्णन आहे.

८६ व्याजोक्तिः—यांत एकादी गोष्ट स्पष्ट असतां कांहीं तरी निमित्तानें तिच्या स्वरूपाचा अपलाप केल्याचें वर्णितात. जसें,

कमदा. कोप युक्त ना होय कोणता? ॥ सव्रणाधरा पति पाहतां ॥
भृंगयुक्त तूं पद्म हुंगिलें । वारिलें तरी त्वां न ऐकिलें ॥ १ ॥

यांत कोणा एका जारिणी स्त्रीच्या सखीनें तिच्या जारकृत अधरव्रणाचें भ्रमर निमित्तानें गोपन करून तिच्या नवऱ्यास चकविल्याचें वर्णिलें आहे.

८७ गूढोक्तिः—एकाद्यास कांहीं सांगावयाचें असतें. पण तें जवळच्या कोणास समजूं नये म्हणून श्लिष्टयुक्त रीतीनें दुसऱ्यास उद्देशून सांगितल्याचें यांत वर्णन असतें. जसें,

साक्यर्ध. गुजगोष्टि चक्रवाकी सारुनि ये सदनिं रात्र ही आली ॥ १ ॥

शकुंतला बागेंत दुष्यंताबरोबर एकटीच बोलत आहे, तेंव्हां तिला ' अपलें भाषण आटप, कण्वऋषि आश्रमांत येण्याची वेळ झाली असें चक्रवाकीच्या निमित्तानें तिच्या सखीनें दुसऱ्या कोणास कळूं नये ह्मणून युक्तीनें कळविल्याचें कवीनें वर्णिलें आहे.

८८ विवृतोक्तिः—यांत एकाद्या गूढ असलेल्या अर्थास कवीनें स्पष्ट केल्याचें वर्णितात. जसें,

स्रग्धरा. बाळे सोडी **विषादा, श्वसन** चपल हा टाकि उर्ध्व-प्रवृत्त ॥
सांडी **कंपा गुरूही** त्यजुनि **बलहरी** जृंभिता येइ येथ ॥
देवांतें वंचुनी जो भय-हरण-मिषें मंथ-संभ्रम सिंधु ॥
ज्या दे लक्ष्मी मुदें तो हरुं अत्र तुमचें श्रीहरी दीनबंधु ॥१॥

मंथनकाळीं उत्पन्न झालेल्या लक्ष्मीस समुद्र गूढार्थानें ह्मणतो ' मुली तूं शंकर, वायु, वरुण, बृहस्पती व इंद्र वगैरे देवांना न वरतां श्रीविष्णूस वर ' हा त्याचा गूढार्थ कवीनें ' देवांतें वंचुनी ' वगैरे पदांनीं तृतिय चरणांत व्यक्त केला आहे. **विषाद** ह्मणजे खेद व शंकर; **श्वसन** ह्मणजे श्वासोच्छ्वास व वायु; **कंप** ह्म० कांपरा, व **कं** ह्मणजे जल, **प** ह्मणजे पिणारा अर्थात वरुण; **गुरु** ह्मणजे मोठा व बृहस्पति; **बलहरी** ह्म० शक्तिनाश करणारी अथवा बलनामक दैत्यास मारणारा इंद्र; व **येइ येथ** या पदानें समुद्रासंनिध असणारा विष्णु सूचित होतो.

कोठें कोठें अर्थमूलक गूढोक्ति असते. जसें,

शा. वि. जातों त्वत्पद सोडुनी गुरुवरा तैं लाभ तो कोणता? ॥
संसारा त्यजुनी वृथा भटकणें साजे न हें तत्वता ॥
वांच्छोनी गुरुचा प्रसाद ह्रदयीं आर्तस्वरें बोलतां ॥
हर्षोत्फुल्ल निजांकिं घेउनि दिली गंगाधरें शांतता ॥१॥

यांत 'जातों त्वत्पद सोडुनी' या भाषणावरून गूढ असलेल्या अर्थास कवीनें उत्तरार्धांत आविष्कृत केलें आहे.

८९ युक्ति:–यांत आपली गुह्य कृति लपविण्यासाठीं एकाद्या अन्य व्यापारानें दुसऱ्याची वंचना केल्याचें वर्णितात. जसें.

दिंडी. रूच्या प्रेमें तव चित्र काढितां ते ॥ येइ संनिधिं कुणि पाहुनी तयातें ॥
अन्य हस्तीं दे कुसुम-चाप तूर्ण ॥ किती वानूं चातुर्य-गुण-निधान ॥ १ ॥

कोणी एक आपल्या मित्रास ह्मणतो 'तुझी सखी तुझें चित्र काढित असतां कोणी अन्य मनुष्य तेथें आला, त्यास तुझ्या विषयींचें प्रेम समजूं नये ह्मणून तिनें चटदिशीं त्या चित्राचे हातीं पुष्पधनुष्य दिलें अर्थात् हें चित्र मदनाचें आहे असें तिनें त्यास भासविलें. असें यांत वर्णन आहे.

९० लोकोक्ति:–यांत प्रसिद्ध अशा लोक-प्रवादाचें वर्णन असतें. जसें,

गीति. दूर असो दीन असो दासाची विठ्ठलासि आठवण ॥
मोरोपंत नामचि पुरे, न घ्यावे अष्टांगीं नमन करुनि आठवण ॥ १ ॥

यांत नमस्कार आठ अंगांनीं युक्त असतो अशा लोकप्रवादाचें वर्णन आहे.

९१ छेकोक्ति–यांत प्रसिद्ध अशा लोकप्रवादाचें अर्थांतरानें वर्णन असतें.

गीत्यर्ध. रे कालकूट विष हें सेवावें श्रीहरींचि आनंदें ॥

यांत लक्षण व समन्वय हीं उघड आहेत. यांत संकटांत टिकणें हें भल्या माण सांचें काम आहे या अर्थांतराचा बोध होतो. उ. २ रें.

तु. पाण्यामध्यें मासा । झोंप घेतो कैसा । जावें त्याच्या वंशा । तेव्हां कळे ।

यांत लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत.

९२ वक्रोक्ति:–यांत ध्वनि निकरानें श्लेषयुक्त अर्थांतराचें वर्णन असतें.

साकी. वद कोठें भिक्षार्थी? बळिमखिं, तांडव तेंहि अपर्णे ॥
वृंदावनीं, वद मृग-शिशु कोठें? वराह मी नच जाणें ॥ १ ॥

कुठें देखिला जरठ वृषपती? तो ठावें गोपांतें ॥
लक्ष्मी-पार्वति संवादचि हा रक्षो चिर आह्मांतें ॥ २ ॥

यांत भिक्षार्थी, तांडव, मृगशिशु, वृषपति या शब्दांत श्लेष आहे व तो समजणारा आहे. त्या पदांचें ध्वनि निकरानें उच्चारण केल्यास विलक्षण माधुर्य येतें.

९३ **स्वभावोक्ति** :--यांत पदार्थांच्या अंगीं असणारे नैसर्गिक गुण, क्रिया व रूप वगैरेचें यथार्थ वर्णन असतें. जसें,

ओंवी. मुक्तेश्वर.

वनश्री वर्णावी कवणें । उपमे नंदनवन उणें । नाना वृक्षीं फळें सुमनें । रससुवासें दाटलीं ॥१॥ एक सरळ शाखाविहीन । एक ते शाखामंडित पूर्ण । तया ग्रीवा लतिकावेष्टन । करुनी जाती सुरवाडें ॥ २ ॥ कर्पूर कर्दळीं नारिकेळीं । चूतवृक्ष लवले फळीं । कंटकी फळांची नव्हाळी । लागश्री मुळीं असंख्य ॥३॥ द्राक्षीमंडपातळीं दाट । वाहती अमृतरसाचे पाट । फणसफळें त्यागुनी देंठ । दाविती वाट सिंधूची ॥ ४ ॥ जाई जुई चंपक मालती । बकुल मोगरे कांचन शेवती । केतकीवनें मघमघतीं । पराग क्षिति सुगंध ॥५॥

यांत वनश्रीचें यथार्थ व सुंदर वर्णन आलें आहे. नळ व दमयंती हीं हंसास धरीत असल्याचें सुंदर वर्णन रघुनाथ पंडितकृत नळदमयंती आख्यानांत पहावें.

९४ **भाविक** :—यांत मागें झालेल्या अथवा पुढें होणाऱ्या गोष्टी प्रत्यक्ष होत आहेत असें वाटल्याचें वर्णितात. जसें,

साकी.

पंचवटी ती सरिता गौतमि आश्रमवास्ति मुनीची ॥
गगनचुंबि वनवृक्ष लतांसह स्मृति ये मृगकुलतातिची ॥ १ ॥
पुढां सखिविणें जाति कसे ह्या हतभाग्याचे दिन ते ॥
विधुर मानुनी कोण देइ? मज मान निंदितिल जन ते ॥ २ ॥

यांत पहिल्या साकींत मागें झालेल्या गोष्टी व दुसरींत पुढें होणाऱ्या गोष्टी आतांच घडत आहेत असें वाटल्याचें वर्णिलें आहे.

९५ **उदात्त**:—यांत एखाद्या योग्य वस्तूच्या उन्नतीचें वर्णन असतें. जसें

साकी. असंख्य याचक-विहग तुष्टती प्रशांत गुणिं-जनिं छाया ॥
लाभे श्रीमन्नारायणनृप-सुर-तरु-तालिं नित सखया ॥१॥

यांत श्रीनारायणनामक कल्पतरूच्या ऐश्वर्याचें वर्णन आहे.

९६ **अत्युक्ति**:—यांत शौर्य औदार्य वगैरेचें अद्‌भुत वर्णन असतें.

साकी. श्रीमन्नारायण भूपा तव चारु-कीर्ति अति धवल ॥
नभःप्रांगणीं दिव्य रविशशी फलें प्रसवती अढळ ॥१॥

यांत लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत.

९७ **निरुक्ति**:–यांत नामाचा अवयवार्थसाहाय्यानें दुसरा अर्थ कल्पितात.

उपजाति. पूर्वीं कवींच्या गणनावकाशीं । कनिष्ठिका घालिति कालिदासीं ॥
अ. वि. अद्यापि तत्तुल्य कवीच नाहीं । अनामिका यास्तव सार्थ पाहीं ॥

यांत कनिष्ठिका अर्थात् अनामिका ह्मणजे शेवटलें बोट हा एक अर्थ व जिला नांव नाहीं ती असा दुसरा अर्थ होतो. तात्पर्य, अवयवाच्या साहाय्यानें यांत दुसरा अर्थ योजिला आहे.

९८ **प्रतिषेध**:—यांत उपहासपूर्वक प्रसिद्ध अशा निषेधाचा अनुवाद करितात. जसें,

गीति. द्यूत नव्हे नृपपुत्रा क्रीडा केवळ सुतीक्ष्ण बाणांची ।
स्त्रीसम नच बडबडणें करणें रणरंगिं मात शौर्याची ॥१॥

यांत द्यूत खेळणें व स्त्रियांचें बडबडणें ह्या प्रसिद्ध निषेधांचा अनुवाद केला आहे. अर्जुनाचें, विराटपुत्र जो उत्तर त्यास हें भाषण आहे.

९९ **विधि**:—यांत सिद्ध अशाच गोष्टीचें विधान करितात. जसें,

दिंडी. कृष्णवर्णी कोकील काक दोन्ही ॥ अज्ञ उपहासा पवे पिक ह्मणोनी ॥
गाय जेव्हां मधुमासिं पंचमा तो ॥ तदा कोकिलगुण सहज सिद्ध होतो ॥ १॥

यांत कावळा तो कावळाच व कोकिल तो कोकिलच असें वर्णिलें आहे. याचप्रमाणें काच ती काच व मणि तो मणि. वगैरे उदाहरणें जाणावीत.

१०० हेतुः—यांत कार्यासह कारण वर्णितात. केव्हां केव्हां हेतु व कार्य हीं एकरूपही असतात. जसें,

गीत्यर्ध. गर्वाचि हरावया तव राधेया जिष्णु जन्मला सुगुणी ॥
शर सोडितां तयें तो झाला बघ मूर्तिमंत कल्पाग्नि ॥ १ ॥

अर्जुनाचा जन्म कर्ण-गर्व हरण्यासाठीं झाला असें कार्यासह कारण पूर्वार्धांत व उत्तरार्धांत शर व त्याचें कार्य प्रळयाग्नि हीं दोन्हीं एकरूप वर्णिलीं आहेत.

१०१ चेतनगुणोक्तिः—यांत अचेतन पदार्थांवर चेतन पदार्थांचे गुण वर्णितात. जसें,

साकी. अत्युत्कंठा हिंदवासि-जनें पंचम जार्ज नृपांना ॥
पाहुं कधीं अशि धीर देइ तों 'मदिना' बोट तयांना ॥
मुंबापुरिं पाही ॥ सुर-वसु-शशि-शक ते समयीं ॥ १ ॥

यांत मदिना बोट अचेतन असून धीर देण्याचा चेतन पदार्थांचा धर्म तिच्यावर वर्णिला आहे. ( अंकानां वामतो गतिः असा नियम आहे. )

१०२ विरुद्ध-गुणन्यासः—यांत परस्परविरुद्ध गुणांच्या पदार्थांविषयीं एकत्र अभिप्राय व्यक्त करून त्यांतील भेद स्पष्ट करून दाखवितात. जसें,

गीत्यर्ध. तुज सम नसे मलिन मम विद्या, मी नाहिं भीरु तैसा रे ॥ १ ॥

यांत स्वतांची व दुसऱ्याची विद्या व वक्तृत्व या दोहोंविषयीं एकत्र अभिप्राय सांगून त्यांतील भेद स्पष्ट केला आहे.

१०३ आशीः—यांत आशीर्वचन असतें. जसें,

मदनललिता पत्यर्थी जैं मदनललिता प्रार्थीत गिरिशा ॥
मा भी नामा नगपतिचिया ठेवी भरंवसा ॥
छं. गंगाधरी. आश्वासोनी बहुपरि वदे भूतेश तिजला ॥
लाभे तूझा पति यदुकुळीं कृष्णात्मज मला ॥ १

मदन भस्म झाल्यावर रतीनें शंकराचे पाय धरिले तेव्हां तिला शं
आशीर्वाद दिला आहे. तो चतुर्थ चरणांत व्यक्त आहे.

१०४ प्रश्नः—यांत आपणच सिद्धांत बांधावयाचा पण दुसऱ्याच्या
रानें तो खरा दाखवावयाचा. जसें,

इं. व. येतां गृहा घालवि नंदिनीला ॥ हें कां बरें होय? वदा अम्हाला

यांत कामधेनु घरीं आली असतां तिला घालविणें बरें नाहीं असा स
सिद्धांत बांधला असून तो खरा असें दाखविण्यासाठीं दुसऱ्यास विचारिलें

१०५ असमः—यांत 'उपमाच नाहीं' असें वर्णिलें असतें. हा अनन्वय
व्यक्त होत असला तथापि उपमाच नाहीं या ह्मणण्यानें उपमेयाचा अ
साधारण प्रकर्ष द्योतित होतो. वाच्यार्थामध्यें हा स्वतंत्रपणें दृग्गोचर होतो

गीति. उपमाच नाहिं तुजसी श्रीगुरु गंगाधरा त्रिलोकीं ती ॥
धाता जरी प्रसंगें करि दुजि सृष्टी तरी न गवसल ती ॥

लक्षण व समन्वय हीं स्पष्ट आहेत.

१०६ तिरस्कारः—गुणानें प्रसिद्ध असूनही प्रसंगोपात्त वाईट प
होतो ह्मणून गुणवान् वस्तूंचा तिरस्कार केल्याचें यांत वर्णितात. जसें,

दिंडी. मुळुनि ऐश्वर्यो मत्त करी जैसा ॥ विषयगर्तीं मी पडुनि पाहि तैस
दूरि होइल गुरुराज मला साचा ॥ नको वारा क्षणमात्र तरि धना

संपत्तीनें ऐहिक कार्यभाग अत्यंत सुखकर होतो खरा, पण मोह पडून स
सेवा मुकते यासाठीं तिचा तिरस्कार येथें दाखविला आहे.

## रसवदादि अलंकार.

रस व रसाभास आणि भाव व भावाभास हे प्रधानत्वानें न येतां दुसऱ्याच्या अंगत्वानें आले असतां त्यांस अलंकार मानितात. हे सात आहेत. त्यांचें खालीं थोडक्यांत वर्णन देतों.

१०७ **रसवान्**:—शृंगार, हास्य वगैरे रस परस्परांच्या किंवा भावांच्या अंगत्वानें आले असतां हा अलंकार होतो. जसें,

गीति. अति धन्य अंजनीसुत ह्मणे जो जन्मतांचि रवि-कमळ ॥
एका उडींत जाई शतयोजन सिंधु-पैठ हें नवल ॥ १ ॥

यांत रति हा भाव असून अद्भुतरस हा त्याचें अंग होय.

१०८ **प्रेयान्**:—यांत भाव रसाच्या किंवा भावाच्या अंगत्वानें येतो. जसें,

तुकाराम. ऐसें वाटे माझ्या जिवा । कधीं भेटसी केशवा ॥१॥

यांत उत्कंठा हा श्रीपांडुरंगविषयक व्यभिचारीभाव भक्तिरसाचें अंग आहे.

१०९ **ऊर्जस्वित्**—यांत रसाभास व भावाभास दुसऱ्याच्या अंगत्वानें येतात.

स्रग्धरा. भूपा तुझ्या भयानें तव अरि मुनिचा वेष घेवोनि सांग ॥
कांतारीं जाउनी ते बसुनि गुहिं ह्मणी चिंतिती ईश चांग ॥
तारीं आह्मांसि ईशा ह्मणुनि वरिवरी प्रार्थनेतें करीती ॥
चिंताग्लानिप्रकर्षे तनुहि थरथरे भीतिनें कांपताती ॥१॥

यांत निर्वेद हा रतिभाव शुद्ध संसारवीट येऊन झाला नाहीं. येथें शांतरसाभास असून ईश्वरविषयक रतिभावाचें अंग आहे.

११० **समाहित**:—यांत दुसऱ्याच्या अंगत्वानें भावशांति झाल्याचें वर्णितात.

शा. वि. कोपें रुष्टहि रुक्मिणी थरथरा कांपे न बोले मुळीं ॥
प्रेमें हंसुनी हरी उरीं धरी तैं शांत कोपानळीं ॥१॥

यांत शृंगाररसाच्या अंगत्वानें कोपशांति झाली आहे.

१११–११३ भावोदय भावसंधि व भावशबलता हे तीन दुसऱ्याचे अंगत्वानें येतात. जसें,

व. ति. भृंगें विराजित नवीं अरविंदपत्रें ॥
पाहूनि मानुनि तिचीच विशाल नेत्रें ॥
र. पं. घालीन अंजन अशा मतिनें तटाकीं ॥
आहा! वृथा उतरलों! भिजलों विलोकी ॥ १ ॥

यांत नळाचा दमयंतीविषयक उत्कंठारूप भाव शृंगाररसाच्या अंगत्वानें आला आहे. ह्मणून हा भावोदय अलंकार होय.

गीति. त्वरित सुमंता आणुनि श्रीरामा धाडि आजिं वनवासा ॥
हेतु फिटो दुष्टेचा, होइन मी वचन-मुक्त तेवि तसा ॥ १ ॥

यांत विषाद व अमर्ष ह्या भावांचा संधि असून रामविषयक रतिभावाच्या अंगत्वानें आला आहे. ह्मणून हा भावसंधि अलंकार होय.

गीति. केव्हां मारिन रिपु तो परि शरणागत कसा वधावा हो ॥
र. प्र. ह्मणतिल कीं हतबल मज अस्तु न अनयांत मन्मती वाहो ॥ १

यांत औत्सुक्य, विचार, वितर्क आणि मति या भावांचें मिश्रण झाल्यानें एकेकांचा उदय होऊन शांति झाली आहे ह्मणून हा भाव-शबलता अलंकार होय.

प्रसंगोपात्त शास्त्रांत अगर व्यवहारांत एकादी गोष्ट सिद्ध करण्यासाठीं प्रत्यक्ष अनुमानादि जीं प्रमाणें मानितात त्यांच्या स्वरूपावरून खालील अलंकार कुवलयानंदांत दिलेले आहेत. कोणी कोणी ह्यांस अलंकारांत गणीतही नाहींत. पण प्रसंगोपात्त ते खालीं देतों.

११४ प्रत्यक्ष:—यांत नेत्रादि इंद्रियांनीं एकाद्या गोष्टीचें प्रत्यक्ष ज्ञान झाल्याचें वर्णितात. जसें,

साकी. श्रीगुरुनें मज धरितां निजहृदिं इंद्रियवर्ग सुखावे ॥
स्वात्मानंदीं बुडोनि गेलों कोण सरी ती पावे ॥ १ ॥

यांत श्रीगुरूच्या अंगस्पर्शानें इंद्रियांस स्वात्मसुख झाल्याचें वर्णन आहे.

११५ **अनुमान**:—यांत जर धूम आहे तर अग्नि आहे अशा रीतीनें कार्यावरून कारणाचें ज्ञान झालें असें वर्णन असतें. जसें,

शा वि. सौमित्रा चल सेवुया तरुतलां चंडांशु दे ताप हा ॥
ये चंडांशुकथा निशीं कशि विभो? हा चंद्र आहे पहा ॥
वत्सा होय कसें तुला विदित हें? सेवी कुरंगास कीं ॥
कांते कैं वससी? कुरंनयने चंद्रानने जानकी ॥ १ ॥

सीताविरहाकुल श्रीरामाची लक्ष्मणास ही उक्ति आहे. रात्र असणें व मृगांक धारण करणें या दोन अनुमानानें हा चंद्र आहे असा निर्णय यांत वर्णिला आहे.

११६ **उपमान**:—यांत सादृश्यावरून वस्तूचा बोध झाल्याचें वर्णितात.

गीत्यर्ध, नभिं तीच रोहिणी जो शकटाकारी सुतारकान्यास ॥

रोहिणी नक्षत्र वस्तुतः ठाऊक नाहीं पण शकट ह्मणजे गाडा त्या आकाराच्या सादृश्यावरून आकाशांत रोहिणी नक्षत्र कोणतें हें समजतें, असें यांत वर्णन आहे.

११७ **शब्दप्रमाण**:—यांत आप्त, ह्मणजे यथार्थवादी. अर्थात् सत्य भाषण करणाऱ्याच्या वाक्याचें प्रमाण मानून निर्णय करितात.

दिंडी. खळे वाणी तव जया निंदितां ही ॥ तसा स्पष्टचि तव बोल तो असेही
अहा विधिलाही होय जो निमित्त ॥ कदे शोधिल कैं त्यासि अल्प चित्त

बटुवेषधारी शंकरास ही पार्वतीची उक्ति आहे. 'शिवः परमेष्ठिनोऽपिकारणम्' या श्रुतिरूप आप्तजनित शब्दप्रमाणाचें प्रतिबिंब तृतीय चरणांत आलें आहे.

११८ **स्मृतिः**—यांत शास्त्रग्रंथांतील वचनांचा आधार घेतात.

घ. ना. महाजनांचा आचार ॥ निज नामाचा उच्चार ॥
र. पं. करूं नये हें साचार ॥ शास्त्राधार आहे कीं ॥ १ ॥

इंद्राचा दूत होऊन आलेल्या नळाची ही दमयंतीस उक्ति आहे. स्वनामोच्चार करणें शास्त्रविहित नाहीं असें यांत वर्णन आहे.

११९ आत्मस्तुष्टिप्रमाणः—यांत सज्जन व थोर लोकांच्या आत्मविश्वासाच्या योगें निर्णय झाल्याचें वर्णितात. जसें,

साकी. निःसंशय ही क्षत्रकुलोचित जिस इच्छी मम सुमन ॥
सुजनचित्तवृत्तीच निश्चयें प्रमाण संशायिं जाण ॥ १ ॥

माझें पवित्र मन ज्या अर्थी शकुंतलासक्त झालें आहे त्याअर्थी ती खरोखर क्षत्रकुलोचित आहे. असें दुष्यंताचें आत्मविश्वासयुक्त प्रामाण्य भाषण यांत आहे.

१२० श्रुतिः—आर्यलोकांचा ईश्वरप्रणित जो पवित्र वेदग्रंथ त्यांतील वचनावरून एकाद्या सिद्धांतास वर्णितात. जसें,

गीति. प्राणप्रयाणिं निजहृदिं दमयंती-मन शिरो, न इच्छि शशो ॥
नल-मुख-चंद्रिं शिरें श्रुति-सार कथी विबुध काम मजासि असें ॥ १ ॥

मेल्यानंतर मन चंद्रामध्यें प्रवेश करितें असें वेदांत सांगितलें आहे. त्यास अनुसरून नळविरहानें व्याकूळ झालेल्या दमयंतीचें चंद्रास हें भाषण आहे.

१२१ अनुपलब्धिः—यांत एकादी वस्तु दिसत नसली तर ती नाहीं असें वर्णितात. जसें,

मालिनी. करिसि न शर-संधानासि पार्था कदांही ॥
वदति जन रणीं तूं स्तब्ध देखोनि पाही ॥
खचित अरि तनूचीं मिथ्य रक्तक्षतें तीं ॥
कुतुहल तव नामाचेंच हें घेइ चित्तीं ॥ १ ॥

यांत अर्जुनाचें शरसंधान अलक्ष्य असल्यानें त्याची अनुपलब्धि वर्णिली आहे.

१२२ ऐतिह्यः—यांत एकाद्या दंतकथेचा अनुवाद करितात. जसें,

गीति. श्रीराम आजि येती वार्ता श्रवुनी वदे भरत कपितें ॥
' जरि नर जिवंत राहे तरि तो पावेल हर्ष वर्षशतें ' ॥ १ ॥

यांत ' अहो मनुष्य जगला तर त्याला शंभर वर्षांनींही आनंद प्राप्त होईल ' अशा दंतकथेचा भरतानें अनुवाद करून आपण चौदा वर्षें त्रास सोसल्याचें सार्थक झालें असें मानिल्याचें वर्णन आहे.

## अलंकार-संमेलन.

केव्हां केव्हां एकाच पद्यांत एकाहून जास्त अलंकार येतात त्यांस अलंकार-संमेलन ह्मणतात. याचे **संसृष्टि** व **संकर** असे दोन भेद आहेत.

१२३ संसृष्टिः—यांतील अलंकार परस्पर निरपेक्ष असतात. जसें,

नलिनी. मधु-लोलुप हा अलि सेवि मुदें नलिनी ॥
सुगती मनिं मानुनि कोशिं शिरेच ह्मणी ॥
छं. गंगा, निजछंदें परी उपडी तिजला करिणी ॥
जरि दैव फिरे सुखलेश न तो अवनीं ॥ १ ॥

सुखास्तव कोशांत भ्रमर शिरला असतां नलिनीस हत्तीणीनें उपडिलें. त्यामुळें येथें **विषम** अलंकार होतो. भ्रमरवर्णन स्पष्ट असतांही **नलिनी**, **सुगती**, **छंद**, व **करि** हीं पदें श्लिष्ट व यथार्थ असल्यानें **श्लेष** अलंकार होतो. भ्रमराचें वर्णन करितांना त्याच शब्दांनीं नलिनीनामक वृत्ताची सूचना होत असल्यानें **मुद्रा** अलंकारही होतो. आणि भ्रमराच्या प्रस्तुत गोष्टीच्या बोधार्थ दैव प्रतिकूल असतां पृथ्वीवर कोठेंच सुख नाहीं या अप्रकृत गोष्टीचा बोध केल्यानें येथें **अर्थांतरन्यासाचीही** प्रवृत्ति होते.

**संकरः**---यांत परस्परास संबंधीं असलेले अलंकार येतात. याचे **अंगांगिभाव, समप्राधान्य** व **संदेहसंकर** असे मुख्य भेद आहेत.

१२४ **अंगांगिभावः**--यांत एक दुसऱ्याचा उत्पादक अगर पोषक असतो.

चंद्रमौळी. मोहाया सगण येई मदन बघ हा चंद्रमौलीस गर्वें ॥
मानी तो नयि यया कां ? स्वबल बघुनी श्रेष्ठवैरा धरावें ॥

छं. गंगा. जिंकाया गुण गिरिशा धनुसि चढवी थोर केला प्रयास ॥
होई तो परि हवी तत्तृतियनयनोत्पन्नवैश्वानरास ॥ १ ॥

यांत **मुद्रा** व **श्लेष** हे अलंकार आहेतच शिवाय '**मानी तो नयि यया कां**' या वाक्यांत **प्रश्नालंकार** असून त्याचें नाहीं असें उत्तर येतांच '**स्वबल बघुनी श्रेष्ठ वैरा धरावें**' या वाक्यांत वैधर्म्ययुक्त **अर्थांतरन्यास** आणि प्रयत्नाविरुद्ध फल मिळाल्यामुळें चतुर्थ चरणांत **विषमालंकार** झाला आहे.

१२५ **समप्राधान्य**--यांत दोन अगर अधिक अलंकार प्राधान्येंकरून येतात.

हरिणी. गरिब हरिणी आक्रोशें मी किती निजपाडसां ॥
न समरस लागे मातें हा क्षणैक सुकल्पसा ॥

छं. गंगा. तनयविरहाग्नि-ज्वाला ही जिवा बहु पोळते ॥
अहह करुणा क्रूरा येई कशी मज सांगते ॥ १ ॥

यांत **श्लेष** व **मुद्रा** हे दोन अलंकार तर आहेतच तसेंच '**तनय-विरहाग्नि ज्वाळा** यांत **रूपक** व चतुर्थ ओळींत **अर्थांतरन्यास** हे प्राधान्येंकरून आहेत.

१२६ **संदेहसंकर**:--यांत कोणता अलंकार स्वीकारावा याचा संदेह असतो.

दिंडी. सतत विद्याव्यासंग व्हावयासी ॥ न करि चिंता त्यज मना झणिं तियेसी
देइ आश्रय जो ग्रंथि तुला जाण ॥ सुखद उगवे तो **सुरतरु** प्रसन्न ॥

यांत चवथ्या ओळींत बरेच अलंकार आले आहेत. त्यांत **सुरतरु** या **उपमानावरून भूप** या उपमेयाचा बोध होतो म्हणून येथें **अतिशयोक्ति** मानावी तर **भूप** व **सुरतरु** या उपमेयोपमानाचें अभेदरूपानें वर्णन आल्यानें **रूपकाची**

प्राप्ति येते, बरें तसेंहि कल्पिलें तरीही **उपमान व उपमेय** हीं दोन्हीं एकच धर्मानें वर्णित झाल्यानें **तुल्ययोगिता** पुढें येते, तिलाहि बाजूस ठेवून सुरतरु या अवर्ण्यानें भूप या वर्ण्याचा बोध होत असल्यानें **अप्रस्तुतप्रशंसा** पुढें सरसावते तिलाही मागें लोटून सुखद या विशेषणसामर्थ्यबलानें **समासोक्ति** बाहेर पडते तात्पर्य अशा तऱ्हेनें संदेहात्मक अनेक अलंकार एकाच पदांत येतात.

---

## भाग ८ वा.

## अलंकार-विवेचन.

**उपमा:**—सर्व अलंकारांत हा श्रेष्ठ आहे यापासून अनेक अलंकार उत्पन्न होतात. यांत उपमेय व उपमान हीं दोन्हीं भिन्न दाखवितां येतात. तीं एकाच वाक्यांत येऊन त्यांना सुंदर सादृश्याची अपेक्षा असते. २ **अनन्वय:**—यांत उपमेयोपमेप्रमाणें दोन वाक्यांची जरूर असत नाहीं. समान सादृश्याच्या अभावानें ज्याची त्याच्याशींच तुलना करितात. यांत उपमेय व उपमान हीं अभिन्न असतात तशीं तीं त्याच शब्दांनीं व्यक्त करितात. ३ **उपमेयोपमा:**—उपमान व उपमेय यांच्या सारखी अन्य दुसरी वस्तुच नाहीं ह्मणजे दोन्हीही सारखींच आहेत असें वर्णितात. रशनोपमेमध्यें **उपमेय** उपमान होतें परंतु **उपमान** उपमेय होत नाहीं. तसें यांत नाहीं. ४ **प्रतीप:**—व्यतिरेक अलंकारांत उपमानाहून उपमेयाचा उत्कर्ष वर्णिला असतो तरी त्यांतील तुलना गृहीत असते यांत उपमानास उपमेय प्रतिकूल असतें. ५ **रूपक:**—यांत अतिसादृश्यास्तव उपमान व उपमेय यांच्यांत अभेद मानिला जातो; वस्तुतः नसतो. अतिशयोक्ति अलंकारांत उपमान व उपमेय हीं एकच शब्दानें जाणलीं जातात. यांत भिन्न पदांनीं व्यक्त होतात. भ्रांतिमान् यामध्यें ज़री अत्यंत सादृश्य आहे तरी कल्पनामय असें भान नसतें व यांत तें स्पष्ट असतें. उपमान व उपमेय यांमधील हा अभेद कार्यकारण-संबंधी नसतो. अपन्हुतिमध्यें उपमेयाच्या स्वरूपाचें गोपन होतें तसें यांत होत नाहीं. ६ **परिणाम:**—यांत उपमानाला अंगभूतता असतें. रूपकांत तसें

असत नाहीं. ९ भ्रांतिमान्ः—रूपक व पहिल्या प्रकारच्या अतिशयोक्तींत उपमान व उपमेय यांचें कल्पित अभेदत्व असतें, व त्याबद्दल भानही असतें. या अलंकारांत सादृश्यावरून एकाच ठिकाणीं दुसरी वस्तु आहे अशी मिथ्या कल्पना होऊन तिचें भान असत नाहीं. संदेहामध्यें सादृश्यास्तव पदार्थ-निर्णयाचे कामीं संशय होतो. आणि यांत प्रस्तुताचें ज्ञानच होत नाहीं. तद्गुणामध्यें गुणैकरूपता वर्णितात. त्यामुळें ऐक्य वर्णिलेल्या पदार्थांचें ज्ञान असतें आणि मीलितामध्यें तर अप्रस्तुत वस्तूच असते. यासाठीं त्याहून हा अलंकार भिन्न आहे. १० ससंदेहः—उत्प्रेक्षा अलंकारांत उपमानाचा उत्कर्ष द्योतित असतो. व्यतिरेकांत उपमेयाचा उत्कर्ष व्यक्त असतो. आणि यांत सुंदर सादृश्यामुळें वस्तुनिर्णयाविषयीं संशय उत्पन्न होतो. ११ अपन्हुतिः—एका पदार्थाचें गोपन व दुसऱ्या पदार्थाचें उद्घाटन हें हिचें लक्षण आहे. ह्मणजे प्रसंगोपात्त उपमानाचेंही गोपन यांत होतें आणि उपमेयावर कल्पित असा उपमानाचा आरोप असतो. रूपकांत प्रस्तुताचा निषेध असत नाहीं. आक्षेपमध्यें एका वस्तूचा अपलाप असला तरी दुसऱ्या वस्तूचें प्रकटीकरण नसतें. १२ उत्प्रेक्षाः—यांत उपमानाचेंच महत्त्व उपमेयापेक्षां मानितात. पण उपमेय ही खरी वस्तु पाहिजे. उपमान कधीं खरें व कधीं कल्पनायुक्त असतें. ससंदेहांत दोन्हीं सारखींच असतात. यांत उपमेय हें उपमान होऊं शकत नाहीं. १३ अतिशयोक्तिः—यांत उपमेय व्यक्त नसतें. त्याचा उपमाना-वरून बोध होतो. रूपकांत दोहोंचें अभेदानें जरी वर्णन येतें तरी तीं दोन्हीं स्पष्ट व्यक्त असतात. १७ प्रतिवस्तूपमाः—ही प्रस्तुत व अप्रस्तुत वस्तूंची होते. निदर्शना व दृष्टांत यांत समानधर्म वस्तुतः निराळे असतात. तसे ते यांत असत नाहींत. यांत प्रतिवाक्यांत सामान्य धर्म व्यक्त असतो १८ दृष्टांतः—प्रतिवस्तूपमेंत सामान्यधर्माचें ऐक्य असतें. यांत अर्थांतरन्यासा-प्रमाणें सामान्यविशेषभाव असत नाहीं. उपमान व उपमेय यांचा निदर्शनें-प्रमाणें जरी बिंबप्रतिबिंबभाव असला तरी वाक्याचें उपमेंत पर्यवसान होत नाहीं.

यांतील अर्थ स्वतंत्र असून दृष्टांत वाक्यांतील अर्थास अधिक स्पष्ट करतात. २१ **सहोक्तिः**–एकाच वेळीं क्रियैक्य होणें हा या अलंकाराचा प्राण होय. यांत सह किंवा त्याचे पर्यायशब्द यांचा ज्याशीं अन्वय असतो तें अप्रधानपद असून मुख्य पद प्रथमान्त असतें व त्याचा क्रियेशीं स्पष्ट संबंध असतो. तसा सहशब्दयुक्त पदाचा नसतो, तो गर्भित असतो. समुच्चयांत दोन्हीं पदें प्रधान असून त्यांचा क्रियासमन्वय स्पष्ट असतो. २३ **समासोक्तिः**–यांत विशेषण-सामर्थ्यानें जरी अप्रस्तुत वस्तूची प्रतीति होते तथापि वस्तुत: प्रस्तुत वस्तूवर तिचा आरोप होतो. अप्रस्तुत अलंकार याच्या उलट आहे त्यांत अप्रस्तुत वस्तूवरून प्रस्तुत वस्तूचें ज्ञान होतें, रूपकामध्यें प्रस्तुतावर अप्रस्तुताचा केवळ रूपानेंच आरोप होतो. २७ **अप्रस्तुतप्रसंशाः**–यांत अप्रस्तुत वस्तूच्या वर्णनानें प्रस्तुत वस्तूचें ज्ञान होतें व समासोक्तिमध्यें प्रस्तुतावरून अप्रस्तुत–वस्तुज्ञान होतें हा दोहोंमधील भेद आहे. २८ **प्रस्तुतांकुरः**–प्रस्तुत वस्तु–वर्णनानें इच्छित अशा अन्य प्रस्तुत पदार्थांचा यांत बोध होतो. तथापि यांत अप्रस्तुत-प्रशंसा आणि समासोक्ति ही संभवतात. यासाठीं जेव्हां स्पष्ट अशा अन्यप्रस्तुत पदार्थांच्या बोधाची जरूर असेल तेव्हां या अलंकाराचा उपयोग करतात. ३४ **विभावनाः**–यांत कारणाचा निषेध असूनही कार्योत्पत्तीचें वर्णन असतें. यावरून विरोध अलंकार येथें संभवेल कारण कांहीं अप्रसिद्ध कारण मानून त्याचें निरसनही यांत संभवतें; पण तसें नाहीं. विरोधांत दोन सारख्या वस्तूंचा विरोध स्पष्ट असतो आणि यांत कारणाचा अभाव असूनही कार्याचा बोध होतो ह्मणजे कार्यावरून कारणांचा अभाव व्यक्त होतो. ३७ **असंगतिः**–यांत कार्य व कारण यांमध्यें जो विरोध असतो तो त्यांच्या स्थानभेदामुळें होय. विरोध अलंकारांत निरनिराळ्या ठिकाणीं राहणारे विरुद्ध धर्म एकाच जागीं आहेत. असें वर्णिल्यामुळें विरोध होतो एवढाच या दोहोंमध्यें भेद आहे. ४४ **विशेषः**–पर्याय अलंकारांत क्रमाची अपेक्षा असते यांत एकाच काळीं एकच वस्तु एकच रूपानें असल्याचें वर्णितात हा या दोहोंमध्यें भेद आहे. ४९ **सारः**–या अलंकारांत शेवटीं उत्कर्ष अगर अपकर्षाचें सार सांगितलें असतें. परिसंख्येंत अन्य

तत्सदृश वस्तूचा निषेध असतो. **कारणमालेंत** पुढें येणाऱ्या वस्तूंचें पूर्वोक्त वस्तूच कारण असतें, एकावलींत पुढील वस्तु मागील वस्तूचें स्थापन अगर निषेध करिते आणि मालादीपकामध्यें एक वस्तु दुसरीस, दुसरी तिसरीस अशी उपकारक होते. तात्पर्य या अलंकारांची ही एक प्रकारची सांखळी आहे असें दिसेल. ५५ **समुच्चयः**—यांत कार्य-सिद्धीला एकच कारण पुरें असतां इतर अनेक कारणें मुख्याइतकीं प्रबळ नसतांही त्यांचा अकस्मात् योग होऊन ती सुलभ होते. यांत एकाच वेळीं क्रिया घडावी लागते. दीपकांत क्रिया क्रमानें घडतात. काव्य-लिंगांत मुख्य अगर अप्रधान हा भेद न धरितां हेतूचीच अपेक्षा असते. ६१ **अर्थांतरन्यासः**—यांत प्रस्तुत व अप्रस्तुत भाव विशेष आहे. काव्यलिंगांत तो समान असतो. प्रतिवस्तूपमेंत एकच समानधर्म विषय व विषयी यांत असतो यांत सादृश्याची अपेक्षा व समर्थनही असतें ६२ **विकस्वरः**—हा अर्थांतरन्या-साच्या संकरानें होतो. ६३ **प्रौढोक्तिः**—असंबंधातिशयोक्तिमध्यें संबंध असून वर्णितात व यांत नसून तो कारणत्वानें वर्णितात. संबंधातिशयोक्तींत संबंध व कारण हीं वर्णितात. ६६ **ललितः**—निदर्शनेंत प्रस्तुत व अप्रस्तुत हीं व्यक्त असून त्यांचें उपमेंत पर्यवसान होतें. यांत प्रस्तुतानें प्रतिबिंबित अशा अप्रस्तुताचें वर्णन असतें. ६७ **प्रहर्षणः**—समाधींत प्रयत्न असूनही इतर कारणांनीं कार्यसिद्धि होते. ती यांत यत्नावांचून होते. ६८ **विषादनः**—यांत इच्छेविरुद्ध प्राप्ति वर्णितात व विषमांत अननुरूप वस्तुयोग वर्णितात. ७९ **मीलित** यांत एक वस्तु आपल्या गुणानें दुसऱ्या वस्तूचें ज्ञान नसतांही तीवर वर्चस्व करिते. व्याजस्तुति व अपन्हुति यांत वस्तूंचा जाणून बुजून निषेध असतो. ८३ **व्याजोक्ति** यांत सादृश्य अशा दोन्ही वस्तु प्रस्तुत असून निषेध कशाचाच नसतो. अपन्हुतींत वर्ण्यावर्ण्य यांमध्यें उपमानाची सिद्धता व उपमेयाचा निषेध असूनही साम्य असतें. यांत भाषणाच्या फिरवाफिरवीनें अर्थ न बदलतां अन्य साधनानें हेतूचें गोपन करितात. ८९ **युक्तिः**—व्याजोक्तींत हेतुगोपन वस्तूचा निषेध न करितां अन्य निमित्ताचा आश्रय करून भाषणानें करितात. यांत एकाद्या क्रियेनें करितात.

---

## भाग ९ वा.

## कवीच्या आंगचे गुण व काव्यासंबंधीं सूचना.

**कवि** शब्द कु-शब्दे किंवा गाने या धातूपासून झाला आहे. याचा रचना करणारा अथवा विशेष महत्वयुक्त बोलणारा असा यौगिक अर्थ होतो. मम्मटादि विद्वान साहित्यशास्त्रकारांच्या मतें सहृदय (रसिक) हृदयाल्हादक वाक्यें बोलणारा तो कवि व त्याचीं वाक्यें तें काव्य होय. कविहृदय परचित्ताकर्षक असलें पाहिजे. अर्थात् कोणत्याही रसाची दृष्टादृष्ट होतांच सर्वथैव तद्रूप बनून अपूर्व काव्यौघ प्रकट करण्याचें सामर्थ्य त्यास असलें पाहिजे. एवढेंच नव्हे, पाहिजे त्या रसाशीं तादात्म्य पावून पुन्हां मूळ वृत्तीवर येण्याचें सामर्थ्य त्यास असलें पाहिजे. कवि हा जसा सहृदयी तसाच तो सारासारविचारी व विद्वान् ही असावा. नुसत्या सहृदयत्वानें लोकोत्तर आणि लोकोपयोगी काव्य निर्माण होणार नाहीं. कवीच्या अंतःकरणावर संसारांतील अनेक घडामोडींचे प्रसंग व मानवी दृष्टीस अगम्य असे ईशकृत असंख्य सृष्टचमत्कार वगैरेचा ठसा सुंदर असावा. ह्मणजे त्यास फोनोग्राफप्रमाणें वाटेल त्या प्रकारचा सुंदर ध्वनि इतरांच्या अंतःकरणावर उमटवितां येईल.

अहाहा! उत्कृष्ट काव्यलेखन करणारे सत्कवि हे सरस्वति देवीचे भाग्यवान पुत्र, निसर्गसुंदरीचे जिवलग मित्र व सकल प्राणिमात्रांचे परम हितकर्ते होत. **श्रीसमर्थरामदासांनीं 'नाना कळांचें जविन' 'कवि प्रेमळाची प्रेमळ स्थिति' ' कवि सृष्टीचा अलंकार ' कवि देवाचे रूपकर्ते ' ' कीं हे अमृताचे मेघ बोळले '** वगैरे तऱ्हेनें मोठ्या बहारीनें कवीचें वर्णन केलें आहे तें अगदीं यथार्थ होय. सारांश सत्कवीच्या अपार महत्वाविषयीं सर्वांचें मतैक्य आहे.

सत्कवीच्या अंगीं मुख्यत्वें **प्रतिभा** हा गुण असला पाहिजे. **प्रतिभा** ही सुखदुःखकारुण्यादि कोणत्याही गोष्टींनीं कोंडलेल्या वाफेप्रमाणें मनाच्या उकळी सरशी हर्षशोकादि स्थायीभाव मूर्तिमंत प्रकट करणारी अंतःकरणवृत्ति होय. ही

दिव्य व मूर्त असावी लागते. अप्राप्य वस्तु प्राप्त होणें, देव, साधु, अगर संत यांचा कृपाप्रसाद मिळणें, महत्संकटांतून सुटणें वगैरे सौख्यकारक गोष्टी अगर एकाद्या खात्री असलेल्या महत्वाच्या कार्यांत एकाएकीं अपयश येणें अकस्मात् भयंकर संकटांत सांपडणें वगैरे दुःखकारक गोष्टी अथवा त्रिविध तापांनीं अनिवार पोळणें, एखाद्याचें अमानुष घोर कर्म पाहणें वगैरे कारुण्यजनक गोष्टी ह्या प्रतिभेच्या जनक होत. इंद्रियगोचर वस्तूंच्या अंतर्बाह्य छाया अगर प्रतिमा मनोभूमिकेंत सांठविणें, वाटेल त्या क्षणीं त्यांना पुढें आणणें, परचित्त-प्रवेश करणें, परिचयानें अक्लेस पोहोंचलेलें सौंदर्य पुन्हां आदरार्ह करणें, भोगलेलें पुन्हां भोगणें, अनुभवणें, आणि निरस झालेल्यास पुन्हां रसत्व आणणें, आणि परिचय व आदर असतांही कोणत्याही वस्तूविषयीं अधिकाधिक परिचय व आदर उत्पन्न करणें वगैरे प्रतिभेचीं कार्यें होत. सत्कवीची दिव्य प्रतिभा ही **‘ कर्तु अकर्तु अन्यथा कर्तु ’** सामर्थ्यवती, जाज्वल्य व शोधक आणि तसेंच **‘ नित्य नव नवोन्मेषशालिनी ’** ह्मणजे नित्य श्री नित्यमंगलाप्रमाणें प्रतिक्षणीं नवीन नवीन दिव्य काव्यविचार प्रसवणारी कामधेनु होय. तिला अगम्य व अगोचर असें कांहीं नाहीं. ही प्रतिभा झाली तरी ईशकृत अगाध लीला-सिंधूचें अप्रतिहत असें आमूलाग्र मंथन करणारी, सकल प्राणिमात्रांच्या उन्नतीस पोषक शुचि व उदात्त अशी असावी. अशी दिव्य प्रतिभा जागृत झाल्यावर काय उणें आहे? तिनें प्रसन्नांतःकरणानें ज्यांच्या कंठांत माळ घातली ते सत्कविराज खरोखर धन्य होत. प्रतिभेप्रमाणेंच कवीच्या अंगीं परमतसहिष्णुता सदाचरण, सत्य व प्रियकर भाषण, निर्लोभता आणि परिशीलनवृत्ति इत्यादि गुणही अवश्य असावेत.

**काव्यासंबंधीं सूचनाः**—पद्यात्मक काव्यलेखनाचीं पदरचना व अर्थरचना अशीं दोन प्रधान अंगें आहेत.

**१ पदरचनाः**—हींत विषय व प्रसंग यास अनुसरून शब्दांचा साधेपणा व आपल्या मनांतील भावार्थ सहज समजेल असा अन्वयाचा सरळपणा हीं

अवश्य असावींत. त्यांनीं रससौरस्य उत्कृष्ट प्रकट होऊन काव्यास माधुरी येते. ही माधुरी येण्यास आपण शब्दांचें हृद्गत ओळखण्यास शिकलें पाहिजे. मनुष्याच्या अंतःकरणाप्रमाणेंच शब्दहृद्गतही कोमल, कठोर, संथ, उथळ, व गंभीर वगैरे असतें. हा शब्दरसचमत्कार उत्कृष्ट प्रतिभासंपन्न कवीच्या काव्यांत उत्तम दृष्टीस पडतो. पुढें दिलेल्या उदाहरणांतील जाड शब्दांतील रस-माधुर्य अवश्य चाखावें. 'घेई घेई माझे वाचे । **गोड** नाम विठोबाचें ॥ '**सांठविला** हरी । जिहीं हृदय-मंदिरीं ॥ तुकाराम. ' घरिंहुनि मज बाई **सो-हळे** काननाचे ॥ वामन. 'तळमळ **निववीरे** राम **कारुण्यसिंधु**' ॥ रामदास. 'चाले जसा **मद-धुरंधर इंद्रदंती** ॥ रघु. पं. 'तेथुनि वत्स पहातां गाईला नावरे **कृपा-पूर** ' ॥ मोरोपंत. 'शांति अहिल्या ती **जागविली**' ॥

सारांश समयास योग्य असे शब्द योजावेत. यद्यपि समानार्थक शब्द असले तथापि साऱ्यांचें रससामर्थ्य सारखेंच असतें असें नाहीं. जसें रवि, सूर्य, चंडांशु अगर भानु; अथवा कुसुम, सुम, सुमन व पुष्प, हे शब्द समानार्थक आहेत तरी त्या प्रत्येकांतील रससामर्थ्य निरनिराळें आहे. कवितेंत जाड जाड संस्कृत शब्द योजून व कूट कल्पना काढून काव्य कठिण व निरस करूं नये. द्राक्ष जसें कोमल, मनोहर सर्वथैव आनंददायी असतें तसें काव्य सर्वांस समजणारें गोड व हितपरिणामी असावें. प्रास अनुप्रास अगर यमक हें जरि कवित्वाचें अंग नाहीं तथापि त्याचा तिरस्कार करूं नये व केवळ त्याच्याच मागेंही लागूं नये. काव्यांतर्गत अर्थसौष्ठव कायम ठेवून त्यास शब्द-चमत्कृतीची जोड दुग्धशर्करान्यायानें द्यावी. या शब्दचमत्कृतीचा श्लेष म्हणून एक भाग आहे याचें विवेचन मागें आलेंच आहे. श्लेष चांगला साधतां आला अथवा अंगीं विद्वत्ता असली म्हणजे काव्य साधतें असें नाहीं. तें साधण्यास अंतःकरणाचा कोमलपणा, सरळता व विषयाशीं तल्लीन होऊन स्फटिकाप्रमाणें अलग होतां येणारी अंतःकरणवृत्ति हीं मुख्यत्वें हवीं आहेत. काव्यलेखक सन्मार्गगामी, प्रेमळ मनाचा, ईश्वरभक्त, आत्मसंयमी व व्यवहारचतुर असावा. कविता लिहिण्यापूर्वी शुद्धांतःकरणानें ईशस्तुति करावी. व्यवहार

व सृष्टि यांचें अव्याहत निरीक्षण करण्याचा क्रम त्यानें ठेवावा. छंदस् व साहित्य या शास्त्रांची चांगली माहिती करून घ्यावी. ज्यावेळेला मन प्रसन्न असेल त्याचवेळीं ओघानें येणाऱ्या शब्दौघास बाहेर पडूं द्यावें. अर्थात रला र व टला ट जोडण्याच्या भरीस पडूं नये. प्राचीन महाभाग कवींच्या काव्यांचें परिशीलन करावें. 'अपिमाषं मषं कुर्यात् छंदोभंगं न कारयेत्' हें जरी कांहीं अंशीं खरें असलें तथापि 'निरंकुशाः कवयः' या म्हणीसही पात्र न होण्याविषयीं विशेष जपावें. लोकसांप्रदाय व कविसमय यांचा सहसा त्याग करूं नये. कवि हा नैसर्गिक असतो व त्याच्या आंगची प्रतिभा ही नैसर्गिक असते, तथापि नेहमी काव्यव्यासंग असावा. प्रयत्नेंही बरेंच चांगलें कवित्व होतें. तरी शास्त्रग्रंथांचें उत्तम अध्ययन करावें. ज्या काव्यापासून धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारही अर्थ थोड्याबहुत रीतीनें प्राप्त होतील व ज्यायोगें प्राणिमात्रांच्या उन्नतीस साहाय्य होईल असें काव्यलेखन करावें.

१ अर्थरचनाः—हीही चांगल्या प्रकारें साधली पाहिजे. ज्याप्रकारें उत्तम अर्थबोध होईल अशा नैसर्गिक रीतीनें काव्यलेखन झालें पाहिजे. ही अर्थरचना होण्यास उत्कृष्ट विचारसंगति व प्रेमळता हीं काव्यांत प्रकटलीं पाहिजे सारांश काव्यलेखनाचे तीन प्रकार दृष्टीस पडतात ते असे १ सहृदयांतःकरणांतून प्रकटलेले परचित्ताकर्षक निसर्गकाव्योद्गार ह्यांत शब्दचमत्कृतीचें लेणें नसतांही आपल्या अपूर्व बलवत्तर शक्तीनें दुसऱ्याचें मन तल्लीन करितां येतें. २ शास्त्राध्ययनजन्य-काव्योद्गारः—यांत दुसऱ्याचें मन वेधण्यासाठीं शब्दचमत्कृतींचें साहाय्य घेतात. ३ रा प्रकार म्हटला म्हणजे सहृदयशून्यतेनें निघालेले उष्टे, उसने, व क्लिष्ट असे काव्योद्गार. यांत केवळ शब्दचमत्कृति असते.

## भाग १० वा.

### कवि-समय.

पूर्वापार काव्यांत कवींचे कांहीं संकेत ठरले आहेत त्यांस कविसमय म्हणतात. त्यांतून येथें कांहीं सांगतों. प्रीति, हसणें, पुण्य व कीर्ति यांचा रंग पांढरा,

क्रोधाचा तांबडा आणि आकाश, भय व पाप यांचा रंग काळा असतो. बगळ्या आकाशांत उडत असतां मेघदर्शन झालें म्हणजे त्या गर्भिणी होतात. हंसांचें निवासस्थान मानससरोवर आहे. तरुण स्त्रीच्या स्पर्शानें वाघांटी, मद्याच्या चुळीनें बकुळी, लत्ताप्रहारांनीं अशोक, अवलोकनानें तिळवा, आलिंगनानें कोरांटी, मृदुभाषणानें मंदार, उत्तम हास्यानें चंपक, फूत्कारानें आम्र, गायनानें देवसुरंगी आणि अग्रभागीं नृत्य केल्यानें पांगारा हे वृक्ष फुलतात. प्रवाळाला अंकुर असतात. अशा तऱ्हेचे कविसमय काव्यावलोकनानें समजतात.

---

अनुष्टुब्. गंगाधर गुरूरायें कृपा केली म्हणोनिया ॥
हा साहित्य-लक्ष्मी नाम उत्तरार्धहि संपला ॥ १ ॥

शा. वि. श्रीगंगाधर[1] आत्महैमगिरिच्या सत्कल्पवृक्षातळीं ॥
श्रीनारायणपादपद्मिं निपजे जी त्या सुरीं वंदिली ॥
घेई शंकर माथिं जीस नमुनी जी ये महीं सौख्यदा ॥
ती ही अज्ञ-मला हरोनि सुखवो साहित्यगंगा सदा ॥२॥

ज्यांहीं जन्म दिला मला निजकुशीं सद्बुद्धि देवोनि ती ॥
श्रीगंगाधर-पाद-पद्म अलि हा केला दिली सद्गती ॥
माता रुक्मिणि तात विष्णु कुलही तें देशपांडे जयां ॥
गोत्रें कौशिक विप्र जन्म नमितों अत्यादरें मी तयां ॥ ३ ॥

साकी. विभो घडावि मम करीं अशिच ही चिर निज-वाङ्मय-सेवा ॥
सुखवुनि जन सकलार्थीं देइ मज सुरुचिर निज-सुख-ठेवा ॥
गंगाधरनत हा । विनवी लीनपणें तुज पाहा ॥ ४ ॥

शुभं भूयात्.

---

१ यांतील जाड्या शब्दांत श्लेष आहे तो पुढील पृष्ठावर व्यक्त केला आहे.

(मागील पृष्ठावरील दुसऱ्या श्लोकांतील जाड शब्दांत श्लेष आहे तो असा.)

१ **गंगाधर**–कवीच्या गुरूचें नांव अथवा श्रीशंकर. २ **नारायण**–कवीचे आश्रयदाते जे श्री० नारायणराव ऊर्फ बाबासाहेब घोरपडे संस्थान इचलकरंजी हे अथवा श्रीविष्णु. ३ **सुरीं**-पंडितांनीं ( विद्वान लोकांनीं प्रेमपुरस्सर प्रशंसा केलेली ) अथवा देवांनीं. ४ **शंकर**–कल्याण करणारी अथवा श्रीशंकर. ५ **साहित्य**–वाङ्मय ( काव्यालंकार ) अथवा योग अर्थात् पवित्र.

यावरून त्या श्लोकांतील दोन्हीही भावार्थ वाचकांच्या सहज लक्ष्यांत येतील.

---

## शुद्धिपत्र व शोध.

( यांत अगदीं महत्वाचें तेवढें शुद्धिपत्र दिलें आहे तरी वाचकांनीं क्षमा करावी. )

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १२ | शेवटची. | ह्मणावेंवें. | ह्मणावें. |
| ४८ | ८ | ता ता. | ताता. |
| ५० | १२ | तिजला. | हिजला. |
| ११२ | १० | एकजण | एक स्त्री |
| ,, | १० | प्रियसखीचें | प्रियतमाचें |
| ११५ | ८ | ग्रीवाभगें | ग्रीवाभंगें |
| १२४ | ८।१५।२१ | पुरुषा. | परुषा. |

पृष्ठ ८२ यांत २२ व्या ओळींत ‘ यांतील ’ या शब्दापुढें ‘ व पुढील भाग १०।११।१२ यांतील ’ हे शब्द घालून वाचावें.

पृष्ठ १२६ यांत शेवटच्या ओळींत ‘लाटानुप्रास’ या शब्दापुढें ‘ श्रुत्यनुप्रास व अंत्यानुप्रास ’ हे शब्द घालून व तीन याबद्दल पांच हा शब्द घालून वाचावें.

पृष्ठ १३५ यांत २३ व्या ओळींत ‘ महत्त्व न्यूनत्व व साधर्म्य ’ या ऐवजीं ‘ अनुभयोक्त न्यूनत्व व आधिक्य ’ असें वाचावें.

पृष्ठ १३६ यांत १५ व्या ओळींत ‘ वर्णन आलें आहे.’ या पुढें ‘ एकानेंच ’ हा शब्द घालून वाचावें.